


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

मार्च - एप्रिल २००७

## महिला :
## काही समस्या
## काही उत्तरे


















अनुक्रमणिका

# ।। नातिचरामि ।।

**ग्रंथलेखन : मेघना पेठे**

**समीक्षा : प्रमोद मुनघाटे**

*क्षणाक्षणाला उसळणाऱ्या वासना, भावना, इच्छा, तहान, भूक आणि वेड लावणाऱ्या सौंदर्याच्या संवेदना तिला समरसून भोगायच्या आहेत. भोवतालचे वास्तव स्वीकारताना किंवा नाकारताना दरक्षणी जी अगतिकता नायिका अनुभवते, ती कोणत्याही संवेदनशील माणसाला अस्वस्थ करून सोडणारी आहे.*

'नातिचरामि' या कादंबरीचे नेमके वर्णन करायचे, तर ही कादंबरी म्हणजे स्त्रीत्वाच्या अंतर्बाह्य मागण्यांचा एक कॅलिडोस्कोप आहे. हा कॅलिडोस्कोप एकाच स्त्रीला एकाच आयुष्यात आलेल्या स्त्री-पुरुष संबंधातील तथाकथित अनेक नात्यांचा आहे. नायिका घटस्फोटित आहे. पूर्वजीवनातील सूक्ष्म तपशील पिंजून पिंजून पुनःपुन्हा ती नवरा-बायकोच्या नात्यांमधील कॅलिडोस्कोप आकृत्या तयार करीत राहते. कॅलिडोस्कोप हलविला की, दरक्षणी मनमोहक आकृत्या तयार होतात. मेघना पेठे यांची निवेदनशैली आणि मांडणीचे तंत्र असेच आहे. वास्तवाच्या अणकुचीदार काचांचे तुकडे 'नातिचरामि' मध्ये आहेत. पण स्त्रीचे कारुण्यपूर्ण जीवन, तिचा छळ, स्त्री-पुरुष संबंधातील दुटप्पीपणा या गोष्टी केंद्रस्थानी ठेवून केलेले वैचारिक भाष्य या कादंबरीत नाही. स्वतःकडे स्त्रीत्वाची वेगळी अशी भूमिकाच मेघना पेठे येथे घेत नाहीत. या कादंबरीतील नायिका एक नागरिक आहे. एका घराची मालकीण, एका ऑफिसमधील एक कर्मचारी आणि कुटुंबातील एक व्यक्तीच आहे. स्त्री म्हणून तिला कोणत्याही सवलतींची जशी अपेक्षा नाही, तशीच तिला आपल्या स्त्रीत्वातील नैसर्गिक चैतन्यही नागरिकत्व वा कुटुंबाच्या चाकोरीत संपवायचे नाही. क्षणाक्षणाला उसळणाऱ्या वासना, भावना, तहान, भूक आणि वेड लावणाऱ्या सौंदर्याच्या संवेदना तिला समरसून भोगायच्या आहेत.

तिच्या आठवणीत कधी जुने मित्र-मैत्रिणी येतात, आईबाप, बहीणभाऊ येतात तर कधी 'लोभी' नावाचा पुरुष येतो. अर्थात नात्यांचा हा कॅलिडोस्कोप हलवून स्त्री-पुरुष संबंधाच्या अनेक शक्यता या नायिकेला निर्माण करावयाच्या नाहीत. ती आपल्या मनाचा तळ खरवडून काढते. हे करीत असताना ती वास्तवाच्या पायावर इतकी घट्ट उभी आहे की तिची नखे वाचकांच्या संवेदनांचा बोथटपणाच खरवडून काढतात. आणि ही तिची नखे म्हणजे स्त्रीत्वाच्या अंतर्बाह्य मागण्या होत. ज्या स्त्रियांनी आपल्या मागण्यांचा होम केला आहे, त्यांना अशी नखेच संभवत नाहीत. मग त्यांना वास्तवाच्या पायावर घट्टपणे उभेही राहता येत नाही.

एक स्त्री म्हणून भोवतालचे वास्तव स्वीकारताना किंवा नाकारताना दर क्षणी

(मुखपृष्ठ क्र० ३ वर)










प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६० । अंक ६-७ । मार्च - एप्रिल २००७
फाल्गुन - चैत्र शके १९२८-२९
वार्षिक वर्गणी २०० रुपये.
या अंकाची किंमत रु. ४०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोनानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्य-निष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै० शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.





**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).



अनुक्रमणिका







# अनुक्रमणिका


समाजवादी शील आणि विश्वस्तवृत्ती ५
▣ ग० प्र० प्रधान

स्त्रीसमस्या - वैचारिक प्रवास व वादविवाद ७
▣ डॉ० छाया दातार

स्त्रिया - बळी अंधश्रद्धेच्या ! २८
▣ डॉ० नरेंद्र दाभोलकर

संवाद ३२
▣ विद्या बाळ

डॉ० इरावती कर्वे यांचे
'परिपूर्ती' मधील स्त्रीविचार ३६
▣ डॉ० लता छत्रे

भारतीय स्त्री आणि तिचे स्वातंत्र्य ४०
▣ गौरी देशपांडे

कम्युनिस्टाचा जरा मुलामा काढा की... ४५
▣ लेनिन

तरुणांनी निर्विकार प्रेम कसे करावे ४६
▣ आचार्य दादा धर्माधिकारी

गृहिणी मूल्य ५२
▣ वीणा पुरंदरे - सुराणा

आदिवासी स्त्रीजीवन :
एक अल्पसा परिचय ५६
▣ डॉ० धैर्यशील शिरोळे

पारधी ५९
▣ गिरीश प्रभुणे

स्त्री-पुरुष समानता ६३

तृणमूले (पांढऱ्या मुळ्या) ६४

लीझ माईट्नर : वीणा गवाणकर ६९

सहजीवन : विवाहाशिवाय की... ७१
▣ भा० ल० महाबळ

प्रपंचरहस्य ७२
▣ श्री० मा० भावे



**मुखपृष्ठ :**
संरचना : नितीन सोहनी

**सौजन्य**
अंतराळ : सुनीता विल्यम्स
दोन ध्रुव : शीतल महाजन
पारधी : राजहंस प्रकाशन

**लेखक : सुपरिचित**
सर्व लेखक संपर्क :
द्वारा प्रा० देवदत्त दाभोलकर

# अतिथी संपादकीय

देवदत्त दाभोलकर

भयचकित नमावे तुज रमणी
जन कसे तुडविती तुज चरणी



पापाची स्मृति जाहली
जरि नरा पाहून ही सुंदरी
'धिग् धिक्' त्या कळली
अगाध हरिची नाहीच कारागिरी



त्वम् हि दुर्गा दशप्रहरणधारिणी
कमला कमलदल विलासिनी



कीर्ति: श्रीश्च नारीणाम्
स्मृतिर्मेधा धृति: क्षमा
वाणी श्री कीर्ति नारीतं
क्षमा मेधा धृति स्मृति



मैना जर आनंदात सुखात आहे
तर तिला पिंजऱ्यात बंदिस्त का करता ?
बरे, तिला बंदिस्त करायचेच असेल
तर निदानपक्षी ती आनंदात सुखात आहे
असा कांगावा तरी करू नका.



---

**महिला चर्चासत्र**
**सातारा**
**२५, २६ मे २००७**

जोडअंक व त्यावर चर्चासत्र हा सध्या तरी 'नवभारत'चा स्थायी भाव झाल्यासारखे दिसत आहे. या प्रयोगाचे मूल्यांकन हीरक महोत्सव वर्षानंतर केले जाईलच.

One-day क्रिकेट मॅचेस् ज्याप्रमाणे कालोचित ठरल्या त्याप्रमाणे एक-दिवसीय चर्चासत्रेही कदाचित् अधिक उपयुक्त होतील असाही एक अनुभव येत आहे. परंतु वेळापत्रक नीट काटेकोरपणे पाळले पाहिजे. सकाळी १०.०० ते १.०० टिपणांची मांडणी, दुपारी १.०० ते ३.०० भोजन व मोकळा वेळ व ३.०० ते ५.०० चर्चा ही रचना उपयुक्त ठरते असा अनुभव आहे. सूत्रसंचालन मात्र कठोर समंजस असे हवे.

याला पूरक म्हणून चर्चासत्राच्या आदल्या दिवशी सायंकाळपासून निवास ते चर्चासत्राच्या नंतरच्या दिवशी दुपारपर्यंत निवास भोजनव्यवस्था ठेवल्यास तेही अनेक दृष्टींनी उपयुक्त ठरू शकते. अशी व्यवस्था सध्या सातारा व वाई या दोन्ही ठिकाणच्या चर्चासत्रांसाठी करण्यात येत आहे.

यापुढचा अंक 'लोकशाही समाजवाद' मे-जून जोडअंक असेल.



अनुक्रमणिका

# चर्चासत्रांविषयी

## 'उत्तर-नव' भारत
## विकासाची विविध प्रतिमाने

संयोजक : नवभारत मासिक, प्राज्ञपाठशाळा, वाई
अलदा निकेतन, सातारा (अलदा : अच्युत लक्ष्मण दाभोलकर, १८९३-१९५५)
(या खेरीज अन्य कोणा व्यक्तीचे, संघटनेचे उत्स्फूर्त सहकार्य आल्यास त्याचाही साभार स्वीकार करण्यात येईल.)

चर्चासत्रांविषयीची निवेदने व सूचना या आधीच्या अंकातून आलेल्या आहेत. यापुढील संदर्भात :

१. 'नवभारत'चा हा अंक 'स्त्री प्रश्न : काही समस्या काही उत्तरे' यावर आहे. त्याच्या आधारे व येतील त्या नव्या टिपणांच्या आधारे या विषयावर सातारा येथे २५ मे (दुपारी २.०० ते ६.००) व २६ मे (सकाळी ९.०० ते १.००) या वेळात चर्चासत्र होईल. सूत्रसंचालन प्रा० देवदत्त दाभोलकर करतील. 'संयोजक' म्हणून सौ० शैला दाभोलकर, 'परिवर्तन', सातारा यांनी साहाय्य करण्याचे मान्य केले आहे याचा आनंद होतो.

२. 'लोकशाही समाजवाद' या विषयावरील चर्चासत्र वाई येथे दि. २७, २८ मे २००७ रोजी होईल.

३. सप्टेंबर २००७ च्या पहिल्या आठवड्यात सहभागी होऊ इच्छिणाऱ्यांच्या सर्वसाधारण सोयीच्या दिवशी जे. पी. नाईक जन्मशताब्दीच्या निमित्ताने 'उत्तर-नवभारतात भारतीय जनतेचे शिक्षण : नवे संदर्भ, समस्या व उत्तरे' या विषयावर सातारा, वाई वा पुणे येथे दोन दिवसांचे चर्चासत्र होईल. या चर्चासत्रासाठी प्रा. देवदत्त दाभोलकर यांच्याशी संपर्क साधावा.

४. 'समाजवादी शील आणि विश्वस्तवृत्ती' यावरील कृति-चर्चासत्र एस०एस० जोशी स्मृतिदिनी (१ एप्रिल २००७) पुणे किंवा सातारा येथे होईल.

कोणत्याही चर्चासत्रात सहभागी होऊ इच्छिणाऱ्यांनी आधी शंभर रुपयांची मनिऑर्डर सचिव, प्राज्ञपाठशाळा मंडळ यांच्याकडे केल्यास त्यांना चर्चासत्राविषयी टिपणे पाठविली जातील.

संपर्कासाठी पत्ते -

**प्रा. देवदत्त दाभोलकर**
**निवास :** शांतिनिकेतन
४३, गुरुकृपा हौ. सो.
शाहूनगर, सातारा ४१५००१
दूरध्वनी : (०२१६२) २२०३७८
E-mail : ndabholkar@rediffmail.com

**प्रा. यशवंत कळमकर**
**निवास :** २४१०-क, सोनगीरवाडी,
दूरध्वनी कॉलनी रस्ता, वाई ४१२८०३
दूरध्वनी : (०२१६७) २२२७०४
**कार्यालय :** सचिव, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई
दूरध्वनी : (०२१६७) २२०००६

# समाजवादी शील आणि विश्वस्तवृत्ती

## ग० प्र० प्रधान

गांधीजींनी जमनालाल बजाज यांच्याशी बोलताना, 'तुम्ही मिळवीत असलेली संपत्ती ही केवळ तुमच्या मालकीची नाही. आपला समाज हे एक कुटुंब आहे आणि म्हणून स्वतःच्या गरजा साधेपणाने भागविल्यावर उरलेल्या बाकीच्या संपत्तीचे तुम्ही विश्वस्त आहात हे लक्षात ठेवले पाहिजे. आणि या संपत्तीचा विनियोग समाजाच्या कल्याणासाठी केला पाहिजे.' अशा आशयाचे उद्‌गार काढले होते. जमनालाल बजाज यांनी गांधीजींची आज्ञा शिरसावंद्य मानली आणि त्यांनी केलेल्या प्रचंड अर्थार्जनाचे विश्वस्त म्हणूनच ते वागले. या संदर्भात आपण आपलाही विचार केला पाहिजे. आणि आपल्या जीवनातही या विश्वस्तवृत्तीने जगले पाहिजे असे मला वाटते. सर्वसाधारण मध्यम वर्गीय माणसाचे उत्पन्न मर्यादित असते आणि त्याच्या कुटुंबाच्या गरजा भागविण्यातच त्या उत्पन्नाचा बराचसा भाग खर्च होतो. त्याचप्रमाणे अडचणीच्या वेळी किंवा मुलांचे शिक्षण, मुलीचे लग्न यासाठी सर्वजणांना थोडाफार संचय करणे आवश्यक वाटते. आपण जर समाजवादी शीलाच्या व्यक्ती असलो तर आपण आपल्या गरजांच्यावर नियंत्रण ठेवले पाहिजे. कुटुंबातील व्यक्ती आजारी पडल्यास तिची हेळसांड होऊ नये यासाठी थोडेबहुत द्रव्य आपण शिल्लक ठेवीत असतो. या संदर्भात डॉ. लोहिया असे म्हणत असत 'मी आजारी पडल्यास या देशातील सर्वसामान्य नागरिकाला जो औषधोपचार मिळू शकेल त्यापेक्षा अधिक खर्च स्वतःच्या दुखण्यात करण्याचा मला अधिकार नाही. याच भूमिकेप्रमाणे प्रत्येक समाजवादी व्यक्तीचे आचरण असले पाहिजे. असा विचार केल्यावर आपल्या कुटुंबातील व्यक्तीच्या आणि आपल्या स्वतःच्याही आजारपणासाठी किती शिल्लक टाकावयाची हे ठरवता येईल.

मी स्वतःसंबंधी लिहिणे औचित्यास धरून नसल्यामुळे त्या औचित्यभंगाबद्दल प्रथमच मी क्षमा मागतो. परंतु अनौपचारिक चर्चेमध्ये माझ्यावरील समाजवादी विचारांच्या संस्कारामुळे मी कसा वागू शकलो हे मी सांगू इच्छितो. माझ्या पत्नीच्या निधनानंतर सहा खोल्या स्वतःसाठी ठेवणे योग्य नाही असे मला वाटले. मी माझ्या निवृत्तिवेतनातून दोन खोल्या भाड्याने घेतल्या आणि माझे घर साधना ट्रस्टला दिले. माझी देखभाल करणाऱ्या साने गुरुजी हॉस्पिटलला असे सांगितले आहे की माझ्या अखेरच्या आजारातही सामान्य माणसावर जितके उपचार आपल्या हॉस्पीटलमध्ये केले जातात त्याहून अधिक उपचार माझ्यावर केले जाऊ नयेत. यातून माझ्याकडे जी शिल्लक उरेल ती सामाजिक कार्य करणाऱ्या सहा संस्थांना माझ्या मृत्यूनंतर मिळेल. यात माझा वैयक्तिक मोठेपणा नाही. समाजवादी चळवळीत माझे जीवन घडल्यामुळेच मी हे करू शकलो. मजजवळ असलेली थोडीफार संपत्ती ही माझी नाही, मी केवळ विश्वस्त आहे, हा विचार गांधीजींच्यामुळे मला समजला आणि त्याप्रमाणे वागण्याचा मी थोडाफार प्रयत्न करीत आहे.

मला जे शिक्षण मिळाले ते माझ्या पिढीतील गरीब मुलामुलींना मिळू शकले नाही. या शिक्षणामुळेच मला अर्थार्जन करता आले. म्हणजे समाजाने मला दिलेले ते धन आहे, हे माझे नाही, मी त्याचा विश्वस्त म्हणूनच वागले पाहिजे. हे मला गांधीजींच्या शिकवणुकीतून उमगले. हेही खरे आहे की मला मूलबाळ नसल्यामुळे असे वागता आले. अशा रीतीने विचार करणे वा वागणे ज्यांच्यावर मुलांची जबाबदारी असते त्यांना शक्य नाही याची मला जाणीव आहे. परंतु ज्यांची मुले मार्गाला लागली असतील त्यांनी मुला-नातवंडांसाठी पैसे ठेवण्याची जरूर नाही असे मला वाटते. वैयक्तिक गरजा कमीतकमी ठेवणे हे पथ्य पाळले तरच विश्वस्त वृत्तीचे थोडेफार पालन करता येईल. माझा एक पुतण्या मला म्हणाला, 'माझ्या मुलांना उत्तम शिक्षण मिळावे यासाठी कॅपिटेशन फी देणे हे मला माझे कर्तव्य वाटते.' मला मूलबाळ नसल्यामुळे मी त्याच्याशी वाद करू शकलो नाही. परंतु 'कॅपिटेशन फी घेणे आणि देणे हे अनैतिक आहे,' इतकेच मी त्याला म्हणालो. मी एक मध्यमवर्गीय प्रापंचिक म्हणून 

अनुक्रमणिका






वर्षापर्यंत जगलो. मी ज्याला किमान गरजा मानल्या त्याही गरीब माणसांच्या मानाने कितीतरी अधिक होत्या व आहेत हे मला कबूल केले पाहिजे. प्रत्येक व्यक्तीचे जीवन वेगळे असते. त्यामुळे या प्रश्नाबाबत नियम आखणे शक्य नाही. परंतु आपल्याला आयुष्यात मिळालेल्या सुविधा बव्हंशी समाजाने दिलेल्या असतात. ही जाणीव ठेवून जगणे आणि आपल्या वैयक्तिक गरजांवर नियंत्रण ठेवून साधेपणाने राहणे आणि समाजऋण फेडणे हे सर्वांना शक्य आहे असे मला वाटते.

३० जानेवारीच्या चर्चासत्राच्या संदर्भात या विषयावर लिहावे अशी मी प्रा० प्रधान यांना विनंती केली होती. त्यांच्याकडून आलेले वरील टिपण आहे.

ते टिपण 'साधना' मध्येही २० जानेवारीच्या अंकातही आलेले आहे. अशा कृतिकार्यक्रमाची वृत्ती असणाऱ्या व्यक्तींचे चर्चासत्र १ एप्रिल २००७ (एस०एम० जोशी स्मृतिदिन) रोजी पुणे किंवा सातारा येथे आयोजित करण्यात येईल. आपल्या तीस जानेवारीच्या कार्यक्रमातून तयार होणारे टिपणही त्यावेळी उपलब्ध असेल.



ईशावास्य मिदं सर्वम्
यत्किञ्च जगत्यां जगत्
तेन त्यक्तेन भुञ्जीथा:
मा गृध: कस्यस्वित् धनम्।
यावर शंकराचार्यांचे टीकाभाष्य असे आहे :
कस्यस्वित्। कस्य। परस्य स्वस्य वा।

'माझ्याकडे जे आहे त्यातील माझे स्वतःचे किती व समाजाचे किती असा विचार मी ज्यावेळी आपल्या मनाशी करतो त्यावेळी 'न इदम् मम' असे वेगळे म्हणण्याचे कारणच पडत नाही.'

-विनोबा

## स्त्री-मुक्ति : विनोबा
('नारी की महिमा' से)

### वैवाहिक जीवन के अंतर्गत व्यभिचार

हिंदुस्थान में ऐसे कितने गृहस्थ हुए, गृहस्थों का क्या अनुभव है, पूछा जाय। इस विषय में लोग बात करते नहीं। किसीसे पूछें, बच्चे कितने हुए, तो कहेगा, पाँच। और कितने संगम हुए? तो कहेगा पाँच हजार। चालीस साल का गृहस्थाश्रम। और संगम? पाँच हजार, सात हजार - उत्तर हजार में ही मिलेगा। इसका मतलब है लायसेन्स। लोगों ने गृहस्थाश्रम को लायसेन्स माना। व्यभिचार ही है वह। खैर, यह एक बात। यह एक व्यभिचार हुआ, जौ अपनी पत्नी के साथ चलता है। इसका प्रतिकार करने की हिम्मत तो किसी पत्नी में है नहीं। क्योंकि उसको डर है पति पीटेगा, मारेगा। तो यह हुआ एक व्यभिचार।

### पत्नी-व्रत का प्रतीक क्यों नहीं?

कुछ लोग चूड़ी आदि गहनों को प्रातिव्रत्य का प्रतीक मानते हैं। मैं पूछता हूँ कि क्या पातिव्रत्य एकांगी वस्तु है? क्या पुरुषों को भी पत्नीव्रती नहीं होना चाहिए? कहाँ है पुरुषों के पत्नीव्रत के प्रतीक? पत्नीव्रत के लिए यदि किसी प्रतीक की जरुरत नहीं है, तो पातिव्रत्य के लिए जरुरत क्यों होनी चाहिए? इसमें सवाल पातिव्रत्य का नहीं है। सवाल यह है कि स्त्री पुरुष की दासी है या नहीं? उसे दासी मानना बिलकुल गलत खयाल है। इसका हम विरोध करना चाहते हैं। स्त्री एक स्वतंत्र हस्ती है, एक जीव है। पुरुष में जीवात्मा जितना बलवान् है, उतना ही बलवान् स्त्री में है। समझना चाहिए कि पत्नी का परमेश्वर के साथ सीधा सम्बन्ध है, पति की एजेन्सी के मार्फत वह सम्बन्ध नहीं है। अगर पत्नी को एजेन्सी की जरूरत है, तो पति को भी परमेश्वर के साथ सम्बन्ध जोड़ने के लिए पत्नी की एजेन्सी की जरूरत रहेगी।

### बहनें लाचार न बनें

ऐसी कम ही बहनें हो सकती हैं, जो भोग-विलास-प्रिय होती हैं। बहनों के जीवन में त्याग ही त्याग है। वे बहनें गृहस्थ बनती हैं, तो भी संयम की दृष्टि प्रधान रखकर शरीर का दुरुपयोग नहीं करने देना चाहिए। इन दिनों संतति-नियमन के कृत्रिम उपायों की बात बहनों पर दया करने की दृष्टि से की जाती है। इसके मानें हैं कि उन पर आक्रमण तो जारी ही रहता है। इस तरह के आक्रमण से बहनें लाचारी के वश हों, यह ठीक नहीं है। गृहस्थ-धर्म की भी एक प्रतिष्ठा होती है। उस प्रतिष्ठा की रक्षा के लिए बहनों को आगे आना चाहिए। अपने पर जो नाहक का आक्रमण होता हो तो उसे रोकने की ताकत बहनों में आनी चाहिए। यह ख्याल गलत है कि पत्नी को हमेशा पति के वश होना ही चाहिए। यह तो शास्त्रीय विषय है। इस विषय का लोगों को ठीक ढंग से ज्ञान देना चाहिए। जिस क्रिया का पौरुष के साथ संबंध है, उसका निष्फल प्रयोग नहीं होना चाहिए।

अनुक्रमणिका

# स्त्रीसमस्या
## वैचारिक प्रवास व वादविवाद
## डॉ० छाया दातार
('विचारवेध' संमेलन २००६ अध्यक्षीय भाषणातून)

**स्त्रीमुक्तीचे भारतीय संदर्भ**

स्त्रीमुक्तीच्या विचारांच्या पाऊलखुणा भारतीय संदर्भामध्ये जागोजागी सापडत असतात. किंबहुना भारतीय स्त्रीच्या सामाजिक स्थानाच्या स्थित्यंतराचा विचार करताना थेट ख्रिस्तपूर्व १०००० वर्षांपासून - म्हणजे वेदकाळाच्याही अलिकडे जाऊनच - मातृदेवतांच्या उदयाच्या काळापासून विचार केला जातो आणि मातृपरंपरा असलेले समाज - वैदिक कालखंडापूर्वीचे असावेत व वैदिक कालखंडापासून पुरुषसत्ता प्रस्थापित होऊन, ब्राह्मणी प्रभुत्व असलेला हिंदू धर्म मुख्य प्रवाह म्हणून कार्यरत झालेला दिसतो अशी मांडणी सर्वमान्य झालेली आहे. या मुख्य प्रवाहाच्या परिघावर आजही अनेक समाज, ज्यांना ब्राह्मणी धर्म धिक्कारतो, त्या जुन्या परंपरांशी नाळ जोडून असलेली अनेक व्रतवैकल्ये, यातुविधी करत असतात, अर्थात या विधींमध्येही अनेक प्रकारचे विकृतीकरण (Distortions) झालेली आढळतात. तरीही मातृपरंपरेचे अवशेषही सापडतात.

मुख्य हिंदू धर्मही पाच हजार वर्षांच्या इतिहासामध्ये अनेक वळणावळणांनी गेलेला आढळतो आणि त्यात वैचारिक बंडखोरीची अनेक उदाहरणे सापडतात. बौद्ध व जैन धर्म हेसुद्धा इतिहासातिल असेच महत्त्वाचे टप्पे आहेत.

वैचारिक बंडखोरीचा शोध घेताना संत वाङ्मयाकडे वळावे लागते. १२ व्या शतकामध्ये होऊन गेलेल्या महानुभाव पंथातील महादईसा पासून सुरुवात करून १९ व्या शतकातील बहिणाबाई पर्यंत संत कवयित्रींच्या हुंकारांचा मागोवाही घ्यायला लागतो. टाटा सामाजिक विज्ञान संस्थेमार्फत काही प्रमाणात हा प्रयत्न झालेला आहे. 'स्त्रीमुक्तीच्या महाराष्ट्रातील पाऊलखुणा' या मालिकेमध्ये सात पुस्तके गोवून संत कवयित्री ते गीता साने, मालतीबाई बेडेकर, कृष्णाबाई मोटे आणि शकुंतला परांजपे या आधुनिक स्त्रीमुक्ती विचारांच्या उद्गात्यांपर्यंत सर्व १९ व्या व विसाव्या शतकातील स्त्रीवादी विचारांचा मागोवा यामध्ये घेतलेला आहे.

भारतीय व पाश्चात्त्य वैचारिक प्रवाहांचा अभ्यास करताना, एका मुद्द्यावर मात्र एकमत आहे असे दिसते व तो असा की, ऐतिहासिक प्रक्रियेमध्ये स्त्रिया दबल्या गेल्या होत्या. समाजव्यवस्थेमध्ये जशी परिवर्तने होत गेली त्याचा परिणाम स्त्रियांची स्थिती बदलण्यात जरूर झाला, परंतु पुष्कळदा अन्यायाचे स्वरुप बदलले व स्त्रियांच्या दुय्यमत्वाचा गाभा तोच राहिला. हे बदल घडविताना बऱ्याच वेळा स्त्रियांनीही भागीदारी केली व काही वेळा काही अंशी 'अवकाश' मोकळे करून घेतले. परंतु दुय्यमता आणि शोषण हा समाजाच्या संरचनेचा अविभाज्य भाग राहिला. ही दुय्यमता, हे शोषण, विषमता व अन्याय यांचे अनुभव जीवनाच्या सर्व अंगोपांगी आढळून येतात. यांचा वैयक्तिक, सामुदायिक व सामाजिक पातळीवर प्रतिकार करणे आणि एका नव्या, न्याय्य समाजव्यवस्थेचा शोध घेणे हे चळवळीचे दूर पल्ल्याचे ध्येय आहे असे सर्वच विचारप्रवाह मानतात. स्त्रियांमध्ये विविध स्तर, वर्ग, जाती, वर्ण, वंश आहेतच, परंतु सांस्कृतिक विविधताही आहे. धार्मिक श्रद्धा वेगवेगळ्या आहेत. ऐतिहासिक घडामोडींमुळे - उदा. साम्राज्यवाद, नवसाम्राज्यवाद आणि जागतिकीकरणाच्या प्रचंड शक्तिखाली नव्याने घडत जाणारी देश-विदेशांच्या नातेसंबंधाची जागतिक संरचना यामुळे स्त्रियांचे परस्परसंबंध - जागतिक पातळीवरच नव्हेत तर देशांतर्गतसुद्धा झपाट्याने बदलत चालले आहेत. तरीही या सर्व बदलांच्या गाभ्याशी असलेली स्त्री-पुरुष संबंधांची गाठ - त्या गाठीच्या गाभ्याशी असलेले दुय्यमतेचे व शोषणाचे मूल्य - अजूनही जिवंत आहे, किंबहुना या बदलामुळे या मूल्याला खतपाणी मिळत आहे. काही पक्षी उडून गेल्यामुळे मुक्त झाल्याचा आभास निर्माण झाला तरी पिंजरा खिळखिळा झालेला नाही. शृंखला गंजलेल्या नाहीत. स्त्रियांना एकत्र आणू शकणाऱ्या अनेक समस्या आहेत, अनेक जाणिवा आहेत. स्त्रीमुक्ती चळवळीचा इतका परिणाम जरूर झालाय, की स्वप्ने पाहण्याची उभारी निश्चित आलेली आहे. स्त्रीवादी चळवळीतील विविध विचारप्रवाहांचे अंतर्गत ताण-

अनुक्रमणिका

तणाव, सैद्धांतिक मतभेद यांची समज येण्यासाठी आपल्याला काहीसा ऐतिहासिक पद्धतीने विचार करावा लागेल. या विचारांचा धांडोळा घेताना पाश्चात्त्य इतिहासामध्ये डोकावून पाहणे आवश्यक ठरते व यामध्ये काही वावगे नाही. औद्योगिक क्रांती पाश्चात्त्य जगामध्ये आधी झाली आणि त्याचे पडसाद तेथील वैचारिक क्रांतीमध्ये उमटले. विशेषत: आत्मभान येण्याची, व्यक्ती म्हणून स्वतःकडे बघण्याची, स्वत्त्व सापडण्याची ती प्रक्रिया होती. कोणत्याही सीमान्तीकरण झालेल्या, शोषणाचे बळी ठरलेल्या गटांच्या सामाजिक उत्थानासाठी, क्रांतीसाठी ही आवश्यक प्रक्रिया असते. १९ व्या शतकातील समाजसुधारकांवर या विचारप्रवाहांचा प्रभाव पडल्याचे दिसते यात काहीच आश्चर्य नाही. आजच्या स्त्रीमुक्ती चळवळीलाही या वारशाचा उपयोग या प्रक्रियेला गती मिळण्यासाठी झाला आहे. व्यक्ती सुटी सुटी होऊ लागली आहे. स्त्रिया म्हणून आपण वेगळ्या आहोत, स्त्रियांच्या अंतर्गततही खूप 'वेगळेपणा' आहे, वर्ग, जात, धर्म, लैंगिक वळण याचे भान येऊ लागले आहे.

## सुधारकांचा काळ

राजा राममोहन रॉय यांनी सती बंदी कायदा आणण्यासाठी प्रयत्न केले. १८२९ साली हा कायदा झाला, तेव्हापासून साधारण स्त्रीविषयक प्रश्न हे स्वातंत्र्यलढ्याचे व आधुनिकीकरणाच्या लाटेचे भाग बनलेले आढळतात. ब्रिटिशांकडून झालेल्या पराभवाचे एक कारण हिंदू धर्माचा झालेला ऱ्हास असे निदान अनेक सुधारकांनी केले आणि म्हणून वसाहतवादाविरुद्ध राजकीय लढा हा सामाजिक सुधारणांशिवाय पूर्ण होऊ शकत नाही अशी त्यांची मांडणी होती. जातीभेद व वर्णभेदापेक्षाही स्त्री पुरुषांमधील विषमता त्यांना अधिक जाणवली. वसाहतवाद हा केवळ आर्थिक व राजकीय शोषण करून थांबत नाही तर तो सांस्कृतिक वर्चस्व गाजवून वसाहतीतील जनतेच्या पराभूत मनोवृत्तीला कारणीभूत होतो असे त्यांचे विश्लेषण होते. म्हणूनच वासहतिक सत्तेला प्रतिकार करण्यासाठी हिंदू धर्माची प्रतिष्ठा परत मिळविणे, अपप्रवृत्तीचा नाश करणे व स्वाभिमानाची जोपासना करणे अशी कार्यसूत्री त्यांनी मानली होती. म्हणूनच स्त्रियांचा उद्धार ही या कार्यसूत्रीतील महत्त्वाची कडी होती. या प्रयत्नांमध्ये मूळ हिंदू धर्म म्हणजे वैदिक धर्म, किंवा ब्राह्मणी धर्म व त्याचे पुनरुज्जीवन असा अर्थही अभिप्रेत होता. या भूमिकेला उच्चभ्रूपणाचा वास होता. हिंदू धर्मातील तळागाळातील समुदायांच्या देवतांना, श्रद्धाविषयांना तेथे वाव नव्हता. त्यांची गणना अंधश्रद्धेत होत होती. ब्राह्मो समाज, आर्य समाज हे हिंदू धर्माच्या शुद्धीकरणाचे प्रयत्न होते.

महाराष्ट्रामध्ये सुधारक व राजकारणी यांच्यामधील वाद प्रसिद्ध आहे. आगरकर व टिळक यांच्या जुगलबंदीमध्ये समाजसुधारणा ऊर्फ स्त्रीसुधारणा आधी की या विषयावरून फूट न पाडता एकजूटीने इंग्रजांविरुद्ध लढाई आधी असे मुद्दे पुन्हा पुन्हा येत होते. आजही पुष्कळदा स्वायत्त स्त्रीसंघटना व डाव्या पक्षांशी संबंधित स्त्रीसंघटना यांच्यामध्ये या स्वरूपाचे वाद होत असतात. आगरकर, रानडे व इतर सुधारक जॉन स्टुअर्ट मिल च्या उदारमतवादी विचाराने भारावलेले होते. त्यांचा स्त्रीमुक्तीचा विचार प्रामुख्याने ब्राह्मण स्त्रियांपुरता मर्यादित होता. एका अर्थाने या स्त्रिया सर्वात जास्त कुंठीतही होत्या. बालविवाह, बालवैधव्य, केशवपन आणि चार भिंतींच्या आत, लक्ष्मणरेषेच्या आत वावर ही त्यांच्या वंचिततेची लक्षणे होती. शिक्षणाचा संपूर्ण अभाव त्यांच्या नशिबी होता. कष्टकरी स्त्रीला शेतीच्या कामानिमित्ताने बाहेर पडण्याची शक्यता होती, शेतीच्या ज्ञानाने येणारा स्वाभिमान होता - याही गोष्टी ब्राह्मण स्त्रीला वर्ज्य होत्या. म्हणूनही कदाचित असेल पण सुधारणांचे लोण ब्राह्मण स्त्रियांपुरते मर्यादित राहिले. त्याचबरोबर स्त्रियांना शिक्षण देण्यामागचा हेतुसुद्धा सुशिक्षित पुरुषाला बौद्धिक मैत्री देऊ शकणारी पत्नी असा काहीसा आपमतलबी होता.

महाराष्ट्रातील सुधारकांची खरी कसोटी लागली ती पंडित रमाबाईंच्या हिंदू धर्मावरील कठोर प्रहारांना सामोरे जाताना. हिंदू धर्मामधील सुधारणा रानडे, आगरकर या सुधारकांना पसंत होती. पण एका स्त्रीच्या नजरेतून हिंदू धर्म बघणे, स्त्रियांवर होणारा अन्याय अनुभवणे याचा परिणाम स्वतंत्र वृत्तीच्या, संवेदनशील स्त्रीवर अतिशय वेगळा झालेला दिसतो. स्त्रीशिक्षण एवढाच स्त्रीउद्धाराचा मार्ग न मानता समाजाने टाकलेल्या स्त्रियांसाठी काहीतरी केले पाहिजे अशी त्यांची तीव्र इच्छा होती. श्रद्धेची आवश्यकता, चांगल्या धर्माची आवश्यकता त्यांना पटत होती. म्हणूनच ब्राह्मो समाज, प्रार्थना समाज या हिंदू धर्माची सुधारणा करायला निघालेल्या पंथांचा त्यांनी अभ्यास केला. परंतु त्यांचे समाधान झाले नाही. त्यांची झेप पलीकडची होती व धर्मांतर हे त्यांनी अतिशय धीटपणे टाकलेले पाऊल होते. हिंदू धर्मातील ब्राह्मणी पुरुषसत्तेचा तो

धिक्कार होता. स्त्री-पुरुष समानतेच्या शोधात हा धर्मांतराचा निर्णय त्यांनी घेतला असे दिसते. १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात एखादी विधवा स्त्री धर्माचा चिकित्सक शोध घेते आणि एकाकी पडण्याचे भय न बाळगता देशांतर करते, धर्मांतर करते, स्त्रीउद्धारासाठी आश्रम चालविते हे सर्व अद्‌भुत वाटते. ख्रिश्चन धर्मातही ती अस्वस्थ असते कारण तेथेही तिला हव्या असलेल्या समानतेचा खरा अर्थ तिला सापडला नाही व ती खंतावली.

ताराबाई शिंदे या मराठा बाईने याच काळातील बुलढाणा सारख्या इंग्रजी सत्तेच्या प्रभावापासून दूर असणाऱ्या ठिकाणी 'स्त्री-पुरुष तुलना' पुस्तक लिहून पुरुषांच्या दुटप्पीपणावर कोरडे ओढले. हिंदुधर्मातील पुरुषसत्ता व पुरुषी वर्चस्व हे त्यांनाही जाणवले होते. संस्कृत व इंग्रजी भाषा अवगत नसतानासुद्धा केवळ अनुभवातून, रोजच्या जगण्यातून निर्माण झालेला अन्यायाबद्दलचा क्षोभ त्यांच्या जळजळीत भाषेतून दिसून येतो. पुरुष देवताची त्या उलटतपासणी करतात आणि नीतीमूल्यांचे अवमूल्यन झाल्याबद्दल जाब विचारतात. एक ब्राह्मण स्त्री व एक मराठा स्त्री स्वतंत्र वृत्तीने व वैचारिक झेपेने वीजेसारख्या चमकत जातात आणि स्त्रियांच्या दुर्दशेच्या अंधाराचे साम्राज्य किती गडद होते याचा प्रत्यय देतात.

महात्मा जोतिबा फुले आणि सावित्रीबाई फुले या जोडप्याने याच काळात एकीकडे ब्राह्मण्यावर प्रहार करत आणि स्त्रियांच्या दशेबद्दल त्यांची नाचक्की करत ब्राह्मण विधवांना मदत करण्यासाठी अनाथाश्रम काढला. बालविधवा ब्राह्मण मुलींना कोणाचाच आश्रय नसायचा. त्यांचे लैंगिक शोषण सहज शक्य असे. अशावेळी गर्भपाताशिवाय त्यांना उपाय नसे. प्रसंगी मृत्यूला सामोरे जावे लागे. केशवपन हीही चाल याच ब्राह्मण विधवांच्या नशिबी आलेली. दुसरीकडे न्हाव्यांचा संप घडवून फुल्यांनी ब्राह्मण पुरुषांना जागे करण्याचा प्रयत्न केला.

एका बाजूने ब्राह्मणवर्ग विद्येच्या जोरावर, इंग्रजी आत्मसात करून हळूहळू इंग्रजांच्या सत्ता प्रवाहात नोकरशाही स्वरूपाने सामील होत होता आणि दुसरीकडे हिंदुधर्मातील आपले श्रेष्ठत्व 'स्त्रियांवर लादलेल्या शुद्धत्वा'ने म्हणजेच त्यांच्या लैंगिकतेवरील वर्चस्वाने शाबूत राखण्याचा प्रयत्न करीत होता आणि अधोगतीला पोचला होता. त्यामुळेच फुल्यांनी एका बाजूला आर्थिक शोषणासाठी, सावकारी विरोधात 'शेटजी'ला जबाबदार धरताना दुसऱ्या बाजूने नैतिकतेच्या ऱ्हासासाठी व हिंदु धर्मातील वर्चस्व गाजवून सामान्यांना खऱ्या भक्तिभावापासून वंचित ठेवणाऱ्या 'भटजी'ला दोषी मानले. इंग्रजी सत्तेला विरोध करताना फुल्यांनी प्रथमतः येथील वर्गसत्तेच्या विरोधाची भूमिका घेतली. आर्थिक सत्ता आणि सांस्कृतिक सत्ता या दोन्हीला विरोध केला. जातीच्या उतरंडीला विरोध केला आणि कष्टकऱ्यांची बाजू उचलून धरली. भौतिकतावादाच्या पायावर समाजसुधारणेचा व स्त्रियांच्या उद्धाराचा विचार करणारा हा पहिला सुधारक म्हणता येईल. शूद्र व अतिशूद्र मुलींसाठी शाळा काढून विद्येचे अस्त्र त्यांच्या हाती देण्याची कल्पना अतिशय दूरदृष्टीची होती. ब्राह्मणी सत्तेचा चिकित्सक अभ्यास करण्याची पात्रता आली, की धर्माचा सांस्कृतिक दहशतवाद कमी होऊ शकतो आणि स्वाभिमान जागृत होऊन अन्यायाविरुद्ध लढण्यास स्त्रिया व पुरुष तयार होऊ शकतात हे त्यांनी ओळखले होते.

फुल्यांनी निबंधलेखन करून आणि विद्वानांचे संदर्भ आपल्या मुद्द्यांच्या समर्थनार्थ देऊन हा वैचारिक लढा लढविला नाही. पण त्यांनी कृती केली. सार्वजनिक सत्यधर्माची स्थापना करताना त्यांनी सातत्याने स्त्री-पुरुष असा समानतेने स्त्रियांचा उल्लेख केला. सत्यशोधक पद्धतीने विवाह करताना घ्यायच्या शपथा या विवाहांतर्गत स्त्री पुरुष समान आहेत या तत्त्वाच्या निदर्शक आहेत.

फुल्यांनी उतरंडीवर आधारलेल्या सर्वच संबंधांचा निषेध केला. स्वतः माळी असून अस्पृश्यता या ब्राह्मणी कल्पनेला छेद देऊन त्यांनी कामाची सुरुवात तळागाळापासून केली. तेथेही त्यांनी मुलींना शिकविण्यासाठी पहिली शाळा काढली. याचा अर्थ जातीबरोबर पुरुषसत्ता हाही त्यांच्यासाठी शोषणव्यवस्थेचा भाग होता. त्यांनी पंडिता रमाबाईंना पाठिंबा दिला. तसेच ताराबाई शिंदे यांचेही कौतुक केले. विषमतेच्या नाडीवर त्यांचे बरोबर बोट होते. म्हणूनच ब्राह्मण विधवांना आधार आणि शूद्र मुलींना विद्यादान अशी दोन टोके पकडून त्यांनी ब्राह्मणी पुरुषसत्तेला शह दिला.

### आंबेडकर, लोहिया, गांधी, दादा धर्माधिकारी

भारतीय संदर्भात स्त्रीवादाचा विचार करताना पुरुष विचारवंतांचाच प्रामुख्याने विचार करावा लागतो याचे कारण औद्योगिकीकरणाची जोरदार लाट जशी युरोपमध्ये आली तशी आपल्याकडे आली नाही. आपले औद्योगिकीकरण

वसाहतवादाच्या छत्राखाली व राज्यकर्त्यांना सोयीचे असेल तेथेच व तेवढेच झाले. शिवाय वसाहतवादाचा फायदा मिळाल्यामुळे वसाहतवादी देशांची समृद्धी वाढली. मुख्यत: 'कुटुंब वेतन' कल्पना तेथे राबविणे शक्य झाले. पत्नी व मुले यांना पोसणारा कामगार व अधिकारी वर्ग तयार झाला. शिकलेली पण घरी बसणारी पत्नी स्वातंत्र्याची स्वप्ने पाहू लागली, नागरिकत्वाचे अधिकार मागू लागली. भारतात हे घडण्यासाठी बराच काळ जावा लागला. २० व्या शतकाच्या सुरुवातीपासून येथील स्त्रियांच्या मनात स्वातंत्र्याचे धुमारे फुटू लागलेले दिसतात. स्वातंत्र्यलढ्यामध्ये स्त्रियांनी मोलाची कामगिरी बजावली. तरीही या स्त्रियांच्या मनात वैचारिक बळ मिळाले ते पुरुष विचारवंतांकडून.

आंबेडकरांनी जातीभेदाला आव्हान दिले आणि जात ज्या पायावर उभी आहे त्या पायाचे विश्लेषण करताना त्यांच्या लक्षात आले की, जातीच्या चिरेबंदी भिंती टिकविण्यासाठी स्त्रियांच्या लैंगिकतेला आळा घालण्याची गरज होती. वैदिक काळामध्ये वर्ण व व्यवसाय यांच्या विभागणीवर आधारित भारतीय समाज काही काळपर्यंत स्त्रियांना वारसा हक्क आणि शिक्षणाचा हक्क देण्यास तयार होता, अर्थातच हे हक्क उच्चवर्णीय स्त्रियांनाच लागू होते. परंतु उच्चवर्णीय स्त्रिया जर पळून जाऊन कनिष्ठ वर्णातील पुरुषांबरोबर विवाह करु लागल्या तर त्यांच्या संपत्तीचा हक्क, त्यांची संपत्ती कनिष्ठवर्णीयांना मिळू लागेल. या संपत्तीचे विभाजन होऊ देण्याची उच्चवर्णीयांची तयारी नव्हती. त्यामुळेच स्त्रियांचा वारसा हक्क संपुष्टात आला. फक्त स्त्रीधनावर हक्क उरला. वर्णसंकर होऊ नये म्हणून स्त्रियांच्या बाबतीत सर्वच प्रकारची बंधने कडक आढळतात. यातूनच ब्राह्मण जातीची शुद्धता व संपत्ती जातीतच राहण्याची गरज यासाठी स्त्रियांच्या योनिशुचितेचा एवढा बाऊ करण्यात आला आहे. त्याचवेळी कनिष्ठ वर्ण व जातीतील स्त्रिया मात्र उच्चवर्ण व जातीतील पुरुष यांच्यासाठी वापरण्याची मोकळीक मिळालेली दिसते.

जातीव्यवस्था टिकून राहण्यासाठी स्त्रियांच्या लैंगिकतेवर घातलेल्या बंधनांचे आंबेडकरांनी विश्लेषण केले आणि त्याचवेळी शूद्र जातीतील स्त्रियांनी आपली लैंगिकता उच्चवर्णीयांना वापरु देण्यास नकार द्यावा असे आवाहन केले. देवदासी पद्धती, तसामगीर, वेश्याव्यवसाय सर्वच ठिकाणी प्रामुख्याने दलित स्त्रियांची भरती असते हे त्यांनी नजरेस आणून दिले. दलित स्त्रियांना शिक्षणासाठी उद्युक्त केले. शिक्षणाचे महत्त्व हे दलित आयांना एवढे उमगले होते की, दलित लेखकांच्या आत्मचरित्रातून आयांनी केलेल्या त्यागाची वर्णने वाचायला मिळतात. प्रसंगी पोट मारुन या मातांनी दलितांच्या शिक्षणाचा पाया घातला.

लोहियांनी स्त्रीदास्य व जातीप्रथा ही दोन भारतीय अधःपतनाची कारणे आहेत हे फार आग्रहाने म्हटले. स्त्रीच्या बाबतीत भारतीय संस्कृतीने शुचिता, शुद्धता, पवित्रता वगैरे लंबेचौडे आदर्श बनवून तिला बंधनात जखडून ठेवले आहे. योनिशुचितेच्या कल्पनेवर तर त्यांनी आग पाखडली आहे. शरीरविषयक रूढींनी, धर्मबंधनांनी, सूत्रांनी स्त्रीला इतके जखडून ठेवले आहे की, ती मनानेही पंगू होते. तिला इतके दडपले गेले आहे की, तिला आपल्या अंगी शक्ती आहे याची जाणिवही होऊ शकत नाही. रजःस्वला स्त्रीलाही ती अमंगळ असल्याची भावना देऊन तिला समारंभांना येऊ न देणे, मिसळू न देणे अशा प्रकारच्या बंधनांनी अपराधीपणाची भावना तयार करण्याचा प्रयत्न केलेला आहे.

अशातऱ्हेने स्त्रीला दडपून ठेवण्याचे परिणाम लोकशाही व्यवस्थेमध्येसुद्धा दिसून येतात. वेतनामध्ये भेद, अधिकारांच्या जागांमध्ये स्त्रीला प्रवेश नसणे अशा अनेक दृश्य स्वरुपात हा स्त्रीपुरुष भेद नजरेस पडत राहतो. लोहिया द्रौपदीचे उदाहरण पुन्हा पुन्हा देतात कारण तिने युधिष्ठिराला प्रश्न केला होता की तू जर द्युतात हरलास आणि कौरवांचा गुलाम झालास तर तुझा माझ्यावरील हक्कही संपला. तू मला पणाला लावू शकत नाहीस. याचा अर्थ असा की महाभारत-काली अजूनही पतीचा पत्नीवर मालकीहक्क सिद्ध झालेला नसावा. मनुच्या काळात मात्र स्त्री पुरतेपणी पतीच्या मालकी हक्काखाली आली असावी.

लोहियांनी ज्या आग्रहाने स्त्रीपुरुष समानतेचा पुरस्कार केला असा पुरस्कार फार थोड्या राजकारणी पुढाऱ्यांनी केला असेल. स्त्रीचळवळीमध्ये लोहियांचे नाव म्हणूनच आदराने घेतले जाते. स्त्रीपुरुषांमधील हिंसा ही मुख्यत: योनिशुचितेच्या कल्पनेभोवती फिरणारी हिंसा आहे आणि स्त्रीला स्वतंत्र अस्तित्व नाकारण्यासाठी तिचा उपयोग होतो अशी त्यांची मांडणी होती.

गांधीजींना अनेक स्त्रीवादी चळवळीच्या विचार-वंतांमध्ये स्थान देत नाहीत. याचे मुख्य कारण गांधींनी स्त्रियांविषयी गाभावादी (इसेन्शियालिस्ट) भूमिका घेतली






होती. स्त्रीच्या स्वार्थत्यागी वृत्तीचा गौरव करून त्यांनी कुटुंबांचे छोटे रिंगण सोडून सार्वजनिक रिंगणात, राजकीय रिंगणात येण्याचे आवाहन केले. एवढेच नव्हे तर स्त्रीला लैंगिकता विरहीत राहण्यास सांगितले. तिला स्वत्वाचा विसर पाडून देशसेवेसाठी सज्ज होण्याचे आवाहन केले. काही स्त्रीवाद्यांमध्ये ही सगळी पावले 'स्त्रीला राजकारणामध्ये वापरण्यासाठी' टाकलेली पावले आहेत, असाही प्रवाद आहे. त्यांनी केलेले ब्रह्मचर्याचे प्रयोग तर स्त्रीला दिलेली अपमानास्पद वागणूक या दृष्टिकोनातून या स्त्रीवादी मानतात. प्रयोग म्हणजे पुरुषी अस्मितेचे प्रदर्शन होते असे त्यांना प्रामाणिकपणे वाटते.

पुरुषी अस्मितेचा मुद्दा मला पटतो. तसेच ब्रह्मचर्याची कल्पना टोकाला नेण्याच्या कल्पनेशी मी सहमत नाही. परंतु स्त्री ही स्वार्थत्यागी वृत्तीची व सेवाभावी असते हे गांधीजींचे निरीक्षण अगदीच चुकीचे नाही. आज सर्वच स्त्रीवादी मान्य करतात की, खरी स्त्री कशी आहे माहीत नाही. आजपर्यंत तिच्यावर अनेक गुण लादले गेले. तिचे मनुष्यत्व हिरावून घेतले गेले. परंतु गांधीजींनी मात्र स्त्रीच्या या गुणाला आवाहन करून स्त्रीला सार्वजनिक जीवनात येण्याची संधी दिली आणि केवढा तरी मोठा 'अवकाश' उपलब्ध करून दिला. एवढेच नव्हे तर आश्रमामध्ये ब्रह्मचर्याची अट घालून स्त्री-पुरुषांमधील हिंसेची छाया दूर करण्याचा प्रयत्न केला. यामुळे अधिक मोकळेपणी स्त्री-पुरुष एकमेकांशी मिसळू शकले. एवढेच नव्हे तर कुटुंबियांचा पाठिंबा स्त्रियांना कायम राहू शकला. स्वातंत्र्ययुद्धात स्त्रियांनी दोन्ही तऱ्हेची कामगिरी केलेली आढळते. सशस्त्र लढ्यातही स्त्रिया सामील होत्या. आजही नक्षलवादी गटांमध्ये अनेक स्त्रिया कार्यरत आहेत. त्यामुळे स्त्रिया मुळातच शांतीप्रिय आहेत असे इसेन्शियालिस्ट (गाभावादी) तत्त्व मी मानत नाही आणि तरीही सत्याग्रह किंवा सविनय कायदेभंग या लढ्यांच्या पद्धतीमुळे फार मोठ्या संख्येने स्त्रियांनी विवाह व मातृत्व या पारंपरिक घडीला सोडून एकेकटे राहून शाळा चालवल्या, शिक्षणकार्य केले. व्यक्तिगत स्वातंत्र्याची जाणीव, देशाच्या नागरिकत्वाची जाणीव येण्यास निश्चित मदत झाली. आजही भारतात त्यामानाने स्त्रियांबाबत बरेच उदारमतवादी वातावरण निर्माण झाले आहे त्याला हा पाया नक्कीच कारणीभूत आहे. 'योनिशुचिता' ही संकल्पना स्त्रीपुरुष संबंधांना हिंसेकडे नेते हे त्यांनी ओळखले होते.

गांधीजींची ही संकल्पना अधिक प्रगल्भ करण्यामध्ये दादा धर्माधिकारींचे योगदान मोठे आहे. योनीचे भान ठेवत सतत भयाच्या छायेखाली, बलात्काराच्या धास्तीने वावरत स्त्रिया स्वतःला संकुचित करून टाकतात. अंगच्या गुणांचा विकास करण्यासाठी पुढे येत नाहीत. यासाठी त्यांनी स्वत: 'योनिशुचिता' या संकल्पनेतून बाहेर पडणे आवश्यक आहे. बलात्कार झाला तरी त्याकडे अपघात म्हणून बघितले तर जीवन मागच्या पानावरून पुढे चालू ठेवता येईल. बलात्काराचे अवडंबर न करता सहजपणे अपघात म्हणून स्वीकारून तिने स्वत:, तिच्या कुटुंबियांनी व समाजाने तिला मुक्तपणे जगू दिले पाहिजे. ती जखम जन्मभर चिघळत ठेवण्याचे कारण नाही.

दुसरा अतिशय महत्त्वाचा मुद्दा दादा धर्माधिकारींनी मांडला आहे तो स्त्रीच्या आकांक्षा विवाह व मातृत्व यांच्या भोवती फिरत राहतात त्या संबंधी सिमाँ द बूव्हे सारखी स्त्रीवादी विचारवंत ही अशीच मांडणी करते. स्त्रीने 'नैसर्गिक' प्रेरणांच्या बाहेर येऊन विचार केला पाहिजे. 'निसर्ग' व 'संस्कृती' या दोन्हीमध्ये तिला निवड करावी लागेल. संस्कृती मानवनिर्मित आहे. तिला स्वतःला मानव म्हणून जगायचे असेल तर गरज पडल्यास तिने 'नैसर्गिक' प्रेरणा नाकाराव्यात. अर्थात सिमाँ द बूव्हेची मते सर्वमान्य नाहीत. विशेषत: स्त्रियांनी संस्कृती घडविण्यात, रानटी अवस्थेतून सुसंस्कृत अवस्थेमध्ये येण्यात विज्ञान, तंत्रज्ञान यामध्ये काहीच योगदान दिले नाही असे म्हणणे चुकीचे आहे. त्यांनी संस्कृतीचे वेगळे पैलू घडविले, हा इतिहास आजपर्यंत लिहिला गेला नाही. दादा धर्माधिकारी सहजीवनाची कल्पना मांडतात. त्यांनी आग्रहाने मांडले की स्त्रीच्या जीवनामध्ये जे पुरुषावलंबन आहे ते त्यांनी सोडले पाहिजे. मातृत्वाशिवाय जीवन अपूर्ण आहे ही कल्पना सोडली पाहिजे. स्त्री पुरुषकेंद्री असल्यामुळे स्वतःच्या शरीराला व रूपाला ऐश्वर्य मानते.

### स्वातंत्र्यलढा व स्त्रीचळवळीची पहिली लाट

'स्त्रीवादी' विचारांचा भारतीय संदर्भ थोडक्यात तपासल्यावर स्वातंत्र्यलढ्यामधून स्त्रियांची राजकीय संजगता कशी वाढत चालली ते बघू. सुधारकांच्या काळामध्ये समाजकारण आधी की राजकारण आधी याच्या चर्चा होत्या. स्त्री पुरुषांचे कुटुंबाच्या आतील संबंध सुधारल्याखेरीज स्त्री सार्वजनिक जीवनात प्रवेश करून स्वतःची मानव या नात्याने उन्नती करू शकणार नाही अशी सुधारकांची मांडणी होती. परंतु इतिहास बघितला तर असे लक्षात येते की अशा भिंती






नसतात. मुक्तीची गतिविधी काहीं वेगळीच असते. बाहेरून येणाऱ्या परिस्थितीच्या लाटांनी काहीवेळा कुटुंबाची अंतर्गत संरचना एकदम ढासळून जाते आणि पुन्हा उभी होताना वेगळ्या पायावर उभी राहते. काही वेळा आतून येणाऱ्या प्रेरणांमुळे एवढी शक्ती उभी राहते की समाजजीवन ढवळून निघते. हे दोन्ही प्रवाह सतत चालू असतात. कधी एक दृश्य असतो तर कधी दुसरा.

स्त्रियांच्या सार्वजनिक जीवनाची सुरुवात मोठ्या प्रमाणात १९०१ सालापासून झालेली दिसते. अपर्णा बसू आणि भारती रे यांनी ऑल इंडिया वुमेन्स कॉन्फरन्सचा इतिहास लिहिला आहे. त्यामध्ये प्रामुख्याने राजकीय सुधारणांचा, म्हणजेच निवडणुकीतून उभ्या राहणाऱ्या प्रातिनिधिक संस्थांमध्ये स्त्रियांच्या स्थानाचा आढावा घेतला आहे. १९०१ साली सरलादेवी चौधरींनी भारत स्त्री महामंडळाची स्थापना करून अनेक महिला मंडळांना त्यामध्ये गोवण्याचा प्रयत्न केला. १९१७ साली मद्रासमध्ये ॲनी बेझंट यांनी 'वुमेन्स इंडियन असोसिएशन' स्थापन केली. इंग्लंडमध्ये त्यावेळी स्त्रियांच्या मतदानाच्या अधिकाराची चळवळ जोरात होती. १९२० साली मद्रास इलाख्याने स्त्रियांना मर्यादित मतदानाचा अधिकार दिला. १९२१ साली मुंबई इलाख्याला तो अधिकार देण्यात आला. १९२७ साली पुण्याला स्त्रीशिक्षणामध्ये सुधारणा सुचविण्यासाठी परिषद भरली होती. त्यामध्येच 'ऑल इंडिया वुमेन्स कॉन्फरन्स' स्थापन झाली. एका बाजूने या संस्थेचे संबंध काँग्रेस पक्षाशी जवळचे राहिले होते. १९३२ साली जेव्हा ऑल इंडिया वुमेन्स कॉन्फरन्सची नवीन घटना तयार झाली तेव्हा सर्व स्त्री पुरुषांना समान राजकीय अधिकार असले पाहिजेत अशी मांडणी झाली. स्त्रियांना विशेष अधिकार, किंवा राखीव जागा नकोच असा प्रस्ताव पारित झाला. आज ३३ % राखीव जागेच्या बिलाची चर्चा होत असताना हा 'नको'चा प्रस्ताव मजेशीर वाटतो आणि एकूणच समाजाचा समंजसपणा कमी होत चालल्याची खंत वाटते. दलित स्त्रियांनी मात्र त्याचवेळी दलितांसाठी असलेल्या राखीव जागांच्या अंतर्गत दलित स्त्रियांना राखीव जागा ठेवाव्यात असा प्रस्ताव मांडला होता. दलित स्त्रियांच्या 'वेगळेपणाचा' वारसा तेथून सुरू होतो असे दिसते.

१९४६ साली पुन्हा एकदा स्त्रियांच्या मलभूत अधिकारांची सनद (चार्टर) तयार करण्यात आली. त्यामध्ये हे मूलभूत अधिकार प्रत्यक्षात येण्यासाठी ज्या सेवा स्त्रियांना उपलब्ध हव्यात त्याचीही मांडणी करण्यात आली. १९३० आणि ४० या दोन्ही वर्षीच्या अधिवेशनांमध्ये हिंदू कोडमध्ये सुधारणा व्हाव्यात असे ठराव पारित करण्यात आले होते आणि त्याची फलनिष्पत्ती म्हणून १९५५-५६ मध्ये हिंदू कोड बिल पारित झाले. त्यामध्ये मुलींना मर्यादित स्वरूपात वारसा हक्क घालण्यात आला. त्याला पंजाबच्या खासदारांनी विरोध करून जमिनीचा मुद्दा वारसाहक्कातून काढून टाकावा असा आग्रह धरला. हे बिल तयार करताना तसेच भारतीय संविधानाची घडण होताना ऑल इंडिया वुमेन्स कौन्सिलच्या प्रतिनिधी कमिटीच्या सभासद होत्या.

ऑल इंडिया वुमेन्स कौन्सिलमध्ये सुरुवातीला सर्व विचार प्रवाहाच्या स्त्रिया होत्या. नंतरच्या काळात मतभेद होऊन आपापल्या पक्षांशी संबंधित स्त्री संघटना काढण्याची नीती सुरू झाली. भारतातील स्त्रियांना मतदानाचा हक्क फार सहज मिळाला असे अनेकांना वाटते. परंतु त्याच्या मागील राजकीय पार्श्वभूमी पाहता हे सगळे आपोआप घडले असे म्हणता येणार नाही. इंग्लंड, अमेरिका आणि इतर वासाहतिक देशांमध्ये स्त्रियांना फार मोठी झुंज घ्यावी लागली होती आणि लोकशाहीचे एक तत्त्व म्हणून स्त्रियांना मतदानाचा व निवडणुकीला उभे राहण्याचा अधिकार मिळाला होता. ॲनी बेझंटसारख्या स्त्रियांनी त्या विचारांचे लोण येथे आणले होते. शिवाय स्वातंत्र्यलढ्यातही अनेक स्त्रिया सामील झाल्या होत्या. दारूच्या दुकानांसमोर पिकेटिंग केले होते. चरखा चालविणे, प्रभातफेरी काढणे यामध्ये स्त्रिया सामील होत्या. त्यांच्यामधील चेतनेचा प्रत्यय जागोजागी आला होता. म्हणूनच मतदानाचा व निवडणूक लढविण्याचा अधिकार मान्य होणे अपरिहार्य होते. परंतु सार्वजनिक जीवनात जो समान अधिकार मान्य केला गेला तो खाजगी जीवनात मात्र पूर्णपणे मान्य करण्यामध्ये आडकाठी आणली गेली. संपत्तीवर अधिकार नसताना सत्तेची जाणीवही पुरेशी येऊ शकत नाही. आणि सार्वजनिक जीवनातील सत्ता काबीज करायची प्रेरणा मिळत नाही. हे पायाला साखळी बांधून मग पिंजरा उघडून पक्षाला - 'तू स्वतंत्र आहेस' असे सांगण्यासारखे झाले. याच सुमारास संविधान करतानाही पुरुष सत्तेच्या प्रभावाखाली कलम २४ मध्ये उपासनेचा व आवडत्या धर्माचे पालन करण्याचा अधिकार मान्य करण्यात आला. त्याचबरोबर धर्माच्या अंतर्गत स्त्रीपुरुष संबंधविषयक कायदे (व्यक्तिगत कायदा) सुद्धा मान्य झाले आणि कलम ४४ या मार्गदर्शक








तत्त्वामध्ये लवकरात लवकर 'समान नागरी कायदा' आणण्याचे आश्वासन देण्यात आले, ते अजूनपर्यंत पूर्णत्वास गेलेले नाही. एका बाजूने भारतीय संविधान हे जगात आदर्श आहे, कारण कोणत्याही विषमतेला तेथे स्थान नाही असे गौरवाने सांगितले जाते. त्याचवेळी हा एक अंधारा कोपरा लपविला जातो. पुरुषी सत्ता प्रत्यक्षात रोजच्या जीवनात, कुटुंब पातळीवर जास्त जाणवत असते. तेथेच तिला खच्ची करणे आवश्यक असते. परंतु सर्व सनातन्यांनी ते क्षेत्र आपल्यासाठी राखून ठेवले. कारण देव व मानव यांच्यामधील दलाल म्हणून जी भूमिका त्यांनी घेतली आहे ती भूमिका संपुष्टात येऊन त्यांची स्वतःची सत्ताही नष्ट झाली असती.

## स्त्रीमुक्तीचे पाश्चात्त्य संदर्भ

भारतातील वैचारिक बदलांना समांतर किंवा काही वेळा या बदलांच्या प्रेरणा ज्या जागतिक वाङ्मयातून आल्या त्या वैचारिक वाङ्मयाचा आलेख काढण्याचा प्रयत्न करताना मी औद्योगिक क्रांतीच्या काळापासून जे नवे विचार उदयाला येत गेले - दोघांनी मांडणी केली - स्त्रियांनी व पुरुषांनीही - त्यावर लक्ष केंद्रित करणार आहे. या वैचारिक कालखंडाचे दोन भाग मानले जातात. एक दुसऱ्या महायुद्धापर्यंतचा कालखंड. दुसरा कालखंड हा साधारण १९६५ नंतर सुरु होतो. सध्याच्या चळवळीला 'दुसरी लाट' असेच म्हणण्याची पद्धत आहे. अर्थात दुसऱ्या लाटेलाही संदर्भ सतत पहिल्या लाटेतूनच घेतले जातात. त्या अर्थाने स्त्रीमुक्तीचा विचार अधिक खोलवर नेणारी आणि त्याचवेळी अनेक मुखांनी बोलणारे विचारप्रवाह निर्माण झाल्याने काही प्रमाणात गोंधळलेली अशी स्त्रीमुक्ती चळवळीची ही अवस्था आहे. त्यातच तर काही स्त्रिया, तिसऱ्या लाटेला सुरुवात झाली आहे, विशेषतः जागतिकीकरणाच्या प्रचंड उलथापालथीमध्ये तिसऱ्या लाटेचा नवा विचार अपरिहार्य आहे असेही मानू लागल्या आहेत. माझा प्रयत्न या दुसऱ्या लाटेतील विचारप्रवाहांचे 'विचारविश्व' (Dis-course) समजून घेण्याचा राहणार आहे. परंतु त्यासाठी प्रथम थोडे इतिहासात डोकावूया.

पाश्चात्त्य विचारांची सुरुवात ही १९७२ साली मेरी वुलस्टोनक्राफ्ट या इंग्लंडमध्ये राहणाऱ्या स्त्रीच्या पुस्तकाने झाली असे मानले जाते. 'स्त्रियांच्या हक्कांचे समर्थन' (Vindication of the Right of Women) असे त्या पुस्तकाचे नाव आहे. मुख्यतः फ्रेंच राज्यक्रांतीमुळे तिला प्रेरणा मिळाली असावी असे दिसते. प्रत्येक व्यक्तीला आणि म्हणूनच स्त्रीला स्वतःचे भवितव्य ठरविण्याचा अधिकार असला पाहिजे अशी तिची मांडणी होती.

फॉरिअर या समाजवादी विचारवंताने १९ व्या शतकाच्या सुरुवातीला व्यक्तीचे परिपूर्ण होणे हे सर्व समाज परिवर्तनासाठी मदत करते आणि ते करता करता ती स्वतःही बदलत जाते. एक कामगार व नव्या पिढीला जन्म देणारी माता म्हणून तिला नागरिकत्वाचा हक्क मिळाला पाहिजे. केवळ व्यक्ती म्हणून नव्हे तर सर्व समाजाच्या सार्वभौम हक्काचा भाग म्हणून - सर्व स्त्रीजातीचा अधिकार मान्य झाला पाहिजे. सामायिकता आणि प्रगल्भता ह्या जोरावर हा हक्क मिळाला पाहिजे अशी ही मांडणी होती. १८४३ मध्ये फ्लोरा ट्रिस्टान या फ्रेंच स्त्रीने सर्व कष्ट करणाऱ्या स्त्री पुरुषांची युनियन/संघटना स्थापन केली आणि दास्यातून मुक्ततेचा नारा दिला.

१८५१ साली जॉन स्टुअर्ट मिलने स्त्रियांना मतदानाचा हक्क देण्याची मांडणी केली. मात्र त्याच्या मांडणीमध्ये सार्वत्रिकतेचे तत्त्व नव्हते. मुख्यतः स्त्रियांसाठी मतदानाचा हक्क अभिप्रेत होता. आगरकर वगैरे सुधारक प्रामुख्याने मिलमुळेच प्रभावित झाले होते. कष्टकरी वर्गाच्या हक्कांचा, त्यांच्या उन्नतीचा, त्यांच्या कुवतीचा वेध आगर-करांना घ्यावासा वाटला नाही. त्यांच्या डोळ्यासमोर प्रामुख्याने ब्राह्मण व उच्चवर्णीय स्त्रियांची छळवणुकीतून आणि दास्यातून सुटका करण्याचा विचार होता.

या वैचारिक मांडणीच्या पार्श्वभूमीवर हळूहळू स्त्रियाही संघटित होत होत्या. १८४८ साली न्यूयॉर्क राज्यातील सिनेका फॉल या गावी स्त्रियांनी मोठे संमेलन भरविले व प्रथमताच मतदानाच्या हक्काची मागणी जोरदारपणे पुढे आली. स्त्रियांच्या जाणिवा व्यक्तिगत पातळीवर जन्माला येत होत्या. पण त्यांना व्यक्त रूप मिळण्यासाठी तात्त्विक आधार, संघनटात्मक आधार, राजकीय आधार या सर्वांचीच गरज होती.

१८७० पासून साधारणपणे स्त्रियांच्या मतदानाच्या हक्काच्या चळवळीला सुरुवात झाली असे मानण्यात येते. १९०३ सालापासून एमिली पॅन्खर्स्ट या बाईचे लढाऊ नेतृत्व इंग्लंडमधील स्त्रियांना लाभले. अटलांटिक पलीकडे अमेरिकेत व युरोप येथे ही मोहीम चालू होती. अमेरिकेतील स्त्रियांनी काळ्या लोकांच्या चळवळीला पाठिंबा देऊन चळवळीचा पाया वाढविण्याचा प्रयत्न केला. त्यामध्ये काळ्या पुरुषांना

आधी राजकीय प्रतिनिधित्वाचा हक्क मिळाला गोऱ्या व काळ्या स्त्रिया दोघीही मागे पडल्या. त्यानंतर पहिले महायुद्ध होऊन गेले. रशियामध्ये कामगार खांद्याला खांदा लावून लढले. क्लारा झेटकिनसारख्या कम्युनिस्ट कार्यकर्त्यांनी स्त्रीमुक्ती बाबत जहाल भूमिका घेऊन मुक्त प्रेमासंबंधाचा पुरस्कार केला होता. प्रथमच लैंगिकतेकडे शास्त्रीय दृष्टिकोनातून पाहण्याचा आणि त्यावरील सांस्कृतिक मिथके काढून टाकण्याचा हा प्रयत्न होता. या पार्श्वभूमीवर अमेरिकेमध्ये १९२० साली स्त्रियांना सार्वत्रिक मतदानाचा अधिकार मिळाला. आणि इंग्लंडमध्ये त्यासाठी १९२८ साल उजाडले.

**उदारमतवाद**

या सर्व वैचारिक प्रवाहाला उदारमतवादाची डूब होती. स्त्रिया पुरुषांइतक्याच मानवी प्राणी आहेत आणि सर्व प्रकारच्या कुवतींनी सक्षम आहेत याचे भान, प्रामुख्याने औद्योगिक क्रांतीनंतर स्त्रिया कारखान्यातून काम करण्यासाठी बाहेर पडू लागल्यावर येऊ लागल्याचे दिसते. श्रीमंत व मध्यम वर्गातील स्त्रियांमधील वाढत चाललेले शिक्षणाचे प्रमाण आणि त्यातून दिसणारी त्यांच्या बुद्धिमत्तेची प्रगल्भ जाणिवांची चमक हेही कारण असावे. मात्र मतदानाच्या हक्कांच्या पूर्ततेनंतर ही चळवळ काहीशी थंडावलेली दिसते. यानंतर एकदम १९६० नंतर म्हणजे दुसऱ्या महायुद्धातील स्त्रियांनी दाखविलेल्या कामगिरीनंतर व स्थैर्य आल्यामुळे अनेक स्त्रिया उच्च शिक्षणासाठी महाविद्यालयांमध्ये जाऊ लागल्यानंतर स्त्रीवादाची दुसरी लाट सुरू झालेली दिसते. दुसऱ्या लाटेचा विचार करण्यापूर्वी व तिच्या प्रवासाचा आलेख काढण्यापूर्वी या पहिल्या लाटेमध्ये अतिशय महत्त्वाचे योगदान केलेल्या मार्क्स व एंगल्स यांच्या स्त्रीमुक्ती बाबत विचारप्रवाहाचा उल्लेख करणे आवश्यक आहे. याचे कारण दुसऱ्या लाटेमधील एक अतिशय प्रभावी मार्क्सवादी/समाजवादी यांनी मार्क्स - एंगल्स यांनी केलेल्या मांडणीचा पाया म्हणून उपयोग करून त्यामध्ये सुधारणा करत जाण्याचा मार्ग आक्रमिलेला दिसतो. एवढेच नव्हे तर स्त्रियांच्या दुय्यमतेच्या आणि दास्याच्या भौतिक पायाची उकल त्यांनी प्रथमच केली. वर उल्लेख केलेली 'भौतिकवाद' ही सैद्धांतिक कल्पना - स्त्रियांच्या स्थानाच्या संदर्भात आणि परिवर्तनाच्या संदर्भात - वापरण्याचा प्रयत्न मार्क्स-एंगल्स यांनी सुसंगतपणे केला म्हणूनच दुसऱ्या लाटेतील कोणत्याही विचारप्रवाहाला या भौतिकवादाची बाजू घेऊन किंवा विरोध करूनच स्वतःचा विचार विकसित करणे शक्य होते असे दिसते. म्हणूनच येथे थोड्या विस्तृतपणे ही मांडणी देण्याची मला आवश्यकता भासते. पर्यावरणवादी स्त्रीवाद हा एक महत्त्वाचा विचारही या भौतिकवादाची चिकित्सा करतच पुढे जातो.

**समाजवाद : मार्क्स - एंगल्स**

मार्क्सने 'कम्युनिस्ट मॅनिफेस्टो' (साम्यवादाचा जाहीरनामा) या छोट्याशा पुस्तिकेत खाजगी मालमत्तेवर आधारित भांडवलशाही व्यवस्था नष्ट झाल्यावर त्याच तत्त्वावर आधारित कुटुंबव्यवस्थेचीही गरज राहणार नाही आणि स्त्रीवरील पुरुषाची मालकी व सत्ता नष्ट झाल्यामुळे स्त्री खऱ्या अर्थाने मुक्त होईल, व्यक्ती म्हणून जगू शकेल, मोकळ्या मनाने प्रेम करू शकेल अशी मांडणी केली आहे. या मांडणीचा विपर्यास करून अनेक सनातन्यांनी मार्क्सने स्त्रियांना स्वैराचाराचा सल्ला दिला आणि समाजव्यवस्थेच्या स्थैर्याला सुरुंग लावण्याचे आवाहन केले असा आरडा ओरडा केला होता. हा विपर्यस्त अर्थ राजकीय हेतूनेच केला होता - अजूनही केला जातो असे आता सिद्ध होतेय. कारण खाजगी मालमत्तेच्या तत्त्वावर आधारित कुटुंबव्यवस्था ही स्त्रियांच्या विकासाला कशी घातक आहे हे दुसऱ्या लाटेमधील स्त्रीवादाने ठळकपणे अधोरेखित केले आहे.

मार्क्सने याहून अधिक स्त्रीप्रश्नाची दखल घेतली नाही असाच स्त्रीवाद्यांचा आरोप आहे. त्या टीकेचा परामर्श आपण पुढे घेऊच. परंतु मार्क्सचा सहकारी एंगल्स याने मार्क्सच्या भौतिकवादी विचारप्रणालीचा उपयोग करून अतिशय महत्त्वाचे विवेचन त्याच्या प्रसिद्ध पुस्तकामध्ये केलेले आहे. 'कुटुंबसंस्थेचा उगम, खाजगी मालमत्ता व शासनसंस्था' असे याचे नाव आहे आणि ते मराठीमध्ये भाषांतरीत आहे. १८८४ साली लिहिलेले हे पुस्तक जर्मन भाषेतून इंग्लिशमध्ये यायला १९०० साल उजाडले. त्याच्या आधी त्यांच्याच दुसऱ्या एका सहकाऱ्याने - ऑगस्ट बेबेल याने - स्त्रीमुक्तीचा विचार करताना स्वयंपाकघर आणि इतर स्त्रियांच्या कामानुषंगे विकसित होत जाणाऱ्या तंत्रज्ञानाकडे लक्ष वेधून स्त्रीची घरकामाच्या रगाड्यातून सुटका होऊ शकली तर तिचे सार्वजनिक जीवनात सहज पदार्पण होऊ शकेल आणि तिच्या मुक्तीचा मार्ग मोकळा होईल असे १८७८ मध्ये लिहिले होते.



अनुक्रमणिका

त्याच्या पुस्तकाचे नाव होते 'स्त्रिया व समाजवाद'. मार्क्सच्या मुलीने - एलेनॉरने - या पुस्तकाचे परीक्षण करताना 'स्त्रीप्रश्न' असे शीर्षक वापरले होते. त्यावरुन साम्यवादी विचारसरणीवर आधारित राजकीय पक्ष 'स्त्रीवाद' असा शब्दप्रयोग न करता साम्यवादाच्या लढाईमधील 'स्त्रीप्रश्न' व त्याची सोडवणूक अशा तऱ्हेने त्याची मांडणी करतात.

एंगल्सने मात्र स्त्रीप्रश्नाची मांडणी अतिशय व्यापक ऐतिहासिक पटलावर केलेली आहे. मॉर्गन व बचाफोन या दोन मानववंशशास्त्रज्ञांच्या लेखनाच्या आधारे प्रामुख्याने त्याची ही मांडणी आहे. त्याचा प्रमुख सिद्धांत आहे की, हजारो वर्षांपूर्वी प्राथमिक साम्यवादी पद्धतीने जगणाऱ्या टोळ्यांमध्ये स्त्रीपुरुषांमधील कामांच्या स्वरुपामध्ये भेद दिसतो आणि तो लैंगिकत्वाच्या आधारे दिसतो. परंतु भेद असला तरी त्यामध्ये दुय्यमता नसते किंवा श्रेणीबद्धता (श्रेष्ठ व कनिष्ठ) असा भाव आढळत नाही, शोषण दिसून येत नाही. टोळीजीवन हे सामूहिक जीवन होते. यानंतरच्या कालखंडामध्ये तीन संस्थांचा उदय झालेला दिसतो. कुटुंबसंस्था, खाजगी मालमत्ता व शासनसंस्था. यापैकी एंगल्सच्या मते 'खाजगी मालमत्ता' ही संकल्पना या दोन्ही संस्थांचा व संस्थेमधील पुरुषी वर्चस्वाचा पाया आहे.

सामूहिक पद्धतीने जगणाऱ्या टोळीमध्ये वैयक्तिक मालमत्तेची कल्पना नव्हती. परंतु टोळीयुद्धातून पराजित टोळीतील स्त्रीपुरुषांना पकडून आणून गुलाम करण्यात येऊ लागले आणि योद्धे व त्यांच्यासाठी शेती करुन व कष्ट करुन वस्तूंचे उत्पादन करणारे गुलाम असे दोन वर्ग तयार झाले. गुलाम ही वैयक्तिक मालमत्ता समजली जाऊ लागली. स्त्री-गुलामांना लैंगिक सुखासाठी आणि शेतीतील कामासाठी राबविले जाऊ लागले. शेतीसाठी गुरे हीही मालमत्ता गणली गेली.

याचबरोबर ही मालमत्ता माझ्यामागे माझ्या वंशजांना मिळावी ही कल्पना पुढे येऊ लागली आणि त्यातून एक पतिपत्नी - मोनोगामी - ही कल्पना पुढे आली. अर्थात त्यामध्ये एक पत्नीव्रत पाळणारा फक्त रामच निघाला. बाकी बहुतेक ठिकाणी पतीला बहुपत्नीत्वाची परवानगी मिळालेली दिसते. खाजगी मालमत्तेला वंशज मिळण्याच्या कल्पनेतून कुटुंबसंस्था जन्माला येऊन स्त्रियांच्या सार्वजनिक सहभागावर बंधने आणली गेली. तिच्या लैंगिकतेवर वर्चस्व लादले गेले.

संपत्ती मालकांनी आपल्या वारशांचा प्रश्न स्त्रियांवर वर्चस्व लादून आणि कुटुंबव्यवस्थेमध्ये बंदिस्त करुन सोडविला. तसेच या संपत्तीची चोरी होऊ नये, गुलामांनी बंड करु नये, खाली मान घालून काम करत रहावे यासाठी शासनसंस्थेची स्थापना झाली. बाहेरील टोळ्यांकडून संरक्षण करण्यासाठी सैन्याची स्थापना व अंतर्गत दबाव कायम राखण्यासाठी पोलिस व शस्त्रे हा या शासनसंस्थेचा गाभा तयार झाला. एंगल्सने प्राचीन शासनसंस्था - रोम व ग्रीस यांचा अभ्यास करुन निष्कर्ष काढला की, तेथील लोकशाही पद्धतीने चालविलेल्या शासनसंस्थेचा गौरव केला गेला आहे. परंतु एका गोष्टीकडे दुर्लक्ष केले गेले की, केवळ संपत्ती मालकांना, गुलामांच्या मालकांनाच या प्रत्यक्ष लोकशाही कारभारामध्ये भाग घेता येत होता. गुलामांना मतदानाचा, निर्णयप्रक्रियेत भाग घेण्याचा अधिकार नव्हता.

थोडक्यात स्त्रीचे दास्य हे एका शोषणावर आधारित, खाजगी मालमत्ता व तिच्या संरक्षणासाठी गुलामांना व इतर कष्टकऱ्यांना दबावाखाली ठेवणारी शासनसंस्था असलेल्या नव्या समाजव्यवस्थेचा भाग आहेत. मार्क्सने समाजपरिवर्तनाची जी अनेक पर्व कल्पिलेली आहेत त्यामध्ये वर्ग संघर्षाला महत्त्वाचे स्थान आहे. दबलेल्या वर्गांनी वर्चस्व गाजविणाऱ्या वर्गाला आव्हान देत, संघर्ष करत परिवर्तनाची मुळे रुजवीत स्वतःसाठी अधिकाधिक हक्क मिळवित समाजवाद व नंतर साम्यवादाकडे प्रवास करत जात असल्याचे एक आशादायी चित्र रंगविले होते. प्राथमिक साम्यवादी अवस्था, गुलामगिरी, सरंजामशाही, भांडवली समाज, समाजवाद व साम्यवाद अशा या अवस्था आहेत. एंगल्सने स्त्री दास्याचा उगम सांगितला तसेच भांडवलशाही-मध्ये उत्पादनाचे कारागिरी स्वरुप बदलून स्त्रिया कारखान्यात जाऊ लागतील, पुरुष कामगारांच्या बरोबरीने काम करु लागल्या की त्याही कामगार संघटनेमध्ये भाग घेऊ लागतील, त्यांच्या जीवनाचे खाजगी स्वरुप संपून सार्वजनिक जीवनातील सहभागाचा लाभ होऊन स्त्रियांमधील लढाऊ जाणिवा जागृत होतील आणि त्या समानता प्रत्यक्षात आणण्यासाठी समाजवादाच्या लढाईमध्ये सामील होतील - अशाप्रकारचे चित्र एंगल्सने पुस्तकामध्ये रेखाटले होते. थोडक्यात स्त्रियांना केवळ पुरुषी वर्चस्वाला विरोध करुन चालणार नाही तर पुरुषी वर्चस्वाला खतपाणी घालणाऱ्या भांडवलशाहीला व भांडवलवादी शासनव्यवस्थेलाही विरोध करावा लागेल आणि हे तिहेरी वर्चस्व झुगारावे लागेल अशी

त्याची मांडणी होती. मला वाटतं हा सर्वांगीण पद्धतीने केलेला विचार फार महत्त्वाचा आहे. या विचारावर आज स्त्रीवाद्यांनी जोरदार हल्ला केला असला तरी तो हल्ला विचार चुकीचा आहे म्हणून नाही तर विश्लेषण अपूर्ण असणे व मांडणी फार ढोबळ असणे यामुळे आहे. मांडणी चुकीची नाही पण अतिविशाल पटावरच्या सिद्धांताची मांडणी असल्याने रोजच्या जीवनातील अनुभवांच्या विश्लेषणाला व संघर्षासाठी लागणाऱ्या व्यूहरचनेला उपयोगी पडू न शकणारी आहे अशी स्त्रीवाद्यांची टीका आहे. तरीही सूक्ष्म पातळीवर, एखाद्या प्रश्नांची उकल करताना एंगल्सने सांगितलेले हे तीन कोऑर्डिनेटस् पायाभूत धरूनच त्यामध्ये अधिक संकल्पनांची भर घालीत स्त्रीवादी स्पष्टीकरणे देत जातात.

या स्थूल पातळीवरील मांडणीमध्ये आणखी एका महत्त्वाच्या गोष्टीचा उल्लेख करणे आवश्यक ठरते. खाजगी मालमत्तेचा उगम कसा झाला आणि ही मालमत्ता पुरुषांच्या हाती का आली याचे एंगल्सने दिलेले स्पष्टीकरण महत्त्वाचे आहे. त्यातून त्याचा पुरुषी दृष्टिकोन दिसून येतो. एंगल्सने मॉर्गनने केलेली टोळीजीवनात राहणाऱ्या समाजांच्या अभ्यासातील फार महत्त्वाची निरीक्षणे टिपली आहेत. जेव्हा मानवाकडे फारसे तंत्रज्ञान नव्हते तेव्हा गरजेपुरत्या वस्तूंची निर्मिती झाली की मणसे काम थांबवीत. त्यामुळे वाढीव संपत्ती निर्माण होत नसे. वाढावा नसल्यामुळे साठवण, शिल्लक किंवा संपत्तीचा संग्रह करणे होतच नसे. या समाजांमध्ये स्त्रियाही खूप कामे करत. हाताने खुरपून करण्याची शेती, आलेले धान्य भरणे, धान्यासाठी लागणारी मडकी, मडकी बनविण्याचे चाक व कुंभारकामाचे तंत्र हे स्त्रियांनीच विकसित केले. कापड विणणे हेही स्त्रिया करीत. पुरुष शिकारीला जात. जनावरांपासून संरक्षण करत. आगीचा शोध त्यांनी लावला. जनावरांना माणसाळण्याचे तंत्र त्यांनी आत्मसात केले आणि पाळीव जनावरांचे कळप पाळायला सुरुवात केली. अशा तऱ्हेने संपत्तीचा संग्रह होत गेला व ही संपत्ती खाजगी मालकांच्या हातात येऊन संपत्तीमालकांचा वर्ग तयार झाला. थोडक्यात तंत्रज्ञानाच्या विकासाची फळे पुरुषांना मिळाली. स्त्रिया मागे पडल्या आणि दुय्यम राहिल्या असे एंगल्सचे मत दिसते. त्याचवेळी भांडवलशाही समाजामध्ये जे तंत्रज्ञान विकसित होत गेले - विशेषत: घरगुती कामामधील सुविधा, तंत्रज्ञान यांमुळे स्त्रियांच्या मुक्तीचा मार्ग मोकळा झाला, त्यांना सार्वजनिक जीवनात सहभागी होता येते असेही त्याने सांगितले. या दोन्ही ठिकाणी 'तंत्रज्ञानावर' एंगल्सचा भर दिसतो. स्त्रीत्वाच्या भौतिक घडणीमध्ये तंत्रज्ञानाचे फार मोठे योगदान आहे असा मुद्दा येथे अधोरेखित होतो.

**स्त्री-मुक्तीची चळवळीची दुसरी लाट**

दुसऱ्या लाटेमध्ये उदारमतवादी व समाजवादी/मार्क्सवादी असे दोन प्रमुख प्रवाह दिसतात. जहाल स्त्रीवादी असाही आणखी एक प्रवाह समांतर जाताना आढळतो. याच प्रवाहातून पुढे सांस्कृतिक स्त्रीवाद आणि समलिंगी स्त्रीवाद असे फुटवे निघाले. मी येथे वंशावळ मांडणार नाही कारण त्याबाबत मतभेद असू शकतात. परंतु या विविध प्रवाहांची विभागणी दोन मुख्य छावण्यांमध्ये करावीशी वाटते. भौतिकवादाच्या छत्राखालील प्रवाह एका बाजूला आणि सांस्कृतिकवादाच्या सूत्राने जाणाऱ्या प्रवाहांचा विचार करणार आहे. आणि दुसऱ्या भागात भौतिकवादाची चिकित्सा करत सांस्कृतिकवादाच्या सूत्राने मांडणी करणाऱ्या प्रवाहांचा विचार करणार आहे.

उदारमतवादी, मार्क्सवादी, जहाल स्त्रीवादी आणि पर्यावरणीय स्त्रीवाद हे पहिल्या वर्गात मोडतात. संस्थात्मक बदल हे त्यांचे लक्ष्य आहे. उदारमतवादी स्त्रीवादी चळवळ ही आपल्या सर्वांनाच परिचित आहे. त्या चौकटीत - भांडवली चौकटीत स्त्रियांना जास्त जास्त सामावून घेतले जावे, समान संधी मिळाव्यात, स्त्रियांनी मुख्य प्रवाहात येऊन, स्पर्धेमध्ये उतरून स्वतःला सिद्ध करावे यासाठी ही चळवळ प्रयत्नशील होती आणि आहे. सध्याच्या जागतिकीकरणामध्ये तर अधिकृतपणे स्त्रियांच्या सहभागाची कल्पना मांडली जात आहे. एका अर्थाने 'स्त्रीकरणाची' ही प्रक्रिया आहे. कृत्रिमरित्या वरून आलेल्या आदेशांनुसार ही प्रक्रिया राबविली जात आहे. विकासामध्ये स्त्रिया नसतील तर केवळ स्त्रियांचे नुकसान होईल व त्या मागे पडतील असे हे सूत्र नसून - विकासही वेगाने होणार नाही, आणि सर्वांगीण होणार नाही - म्हणून स्त्रियांचा सहभाग अर्थात हे सूत्र पुष्कळदा बोलाचाच भात आणि बोलाचीच कढी ठरते आहे. कारण जीवनाची सर्व क्षेत्रे बाजारपेठेनेच व्यापली जात आहेत आणि नफ्याच्या एकमेव उद्देशाने कमी पगार व कमीतकमी सोयीसवलती - संघटनेचे स्वातंत्र्य नाही अशी परिस्थिती एका बाजूला आणि दुसरीकडे रोजच्या गरजांची पूर्ती करणाऱ्या क्षेत्रांमध्ये - शिक्षण, आरोग्य,






पाणी व अन्य सुरक्षा - येथे स्त्रियांचा सहभाग, स्वयंसेवी काम याची मागणी होत आहे.

उदारमतवादी प्रवाह हा मतदानाच्या हक्काची चळवळ या पहिल्या लाटेतील वैचारिक प्रवाहाशी नाते सांगतो. बेटी फ्रीडनच्या नेतृत्वाखाली अमेरिकेमध्ये मध्यमवर्गीय स्त्रियांचे चांगले संघटन बांधण्याचा व उदारमतवादी मागण्या पुढे आणण्याचा प्रयत्न झाला होता. अमेरिकेतील ख्रिश्चन सनातन्यांशी गर्भपात प्रश्नावर टक्कर देण्याचा प्रयत्न वर्षानुवर्षे चालविला गेला होता. स्त्रीच्या शरीरावर स्त्रीचा अधिकार हे सूत्र त्यामध्ये होते. सनातनी ख्रिश्चनांच्या मते गर्भधारणा झाल्या झाल्या जिवाची निर्मिती होते म्हणूनच भ्रूणहत्या हे ईश्वरेच्छेच्या विरोधात आहे. आजही अमेरिकेमध्ये गर्भपाताला परवानगी देणारा केंद्रीय कायदा नाही. राज्यांनी त्यासंबंधी कायदे करण्याची परवानगी आहे, तसेच केलेले कायदे मागे घेण्याचीही परवानगी आहे.

### मार्क्सवादी स्त्रीवाद

मार्क्सवादी/समाजवादी स्त्रियांनी मार्क्स व एंगल्सचा स्थूल सिद्धांत घेऊन त्याची चिकित्सा सुरू केली आणि त्या सिद्धांतातील अतिशय महत्त्वाची चूक, अंधारी जागा (Blind spot) दाखविली. मार्क्सवादाच्या अभ्यासामध्ये श्रमाचे महत्त्व, कामगारांच्या श्रमाच्या लुटीतून उभी राहणारी समृद्धी वगैरे गोष्टी शिकविल्या गेल्या होत्या. औद्योगिक क्रांतीतून वर्गाचा जन्म झाला आणि आता कामगारक्रांतीतून समाजवादाचा, समतेकडे न्यायाकडे जाणारा समाज उदयास येईल. त्यामध्ये अर्थात आदिवासी, दलित, स्त्रिया यांचे दास्य जाण्यासाठी अधिक नेटाने प्रयत्न करावे लागतील. परंतु एकदा कामगार वर्गाच्या हाती आर्थिक व राजकीय सत्ता आली, की सांस्कृतिक क्रांती दूर नाही असा आशावाद दाखविला गेला.

मार्क्सवादी स्त्रीवादाने जीवनातील आणखी दोन महत्त्वाच्या क्षेत्रांमध्ये डोकावून पाहण्याचा प्रयत्न केला. पुनरुत्पादन हा शास्त्रीय शब्द झाला. परंतु थोडक्यात सांगायचे तर 'जीवनसंवर्धन' या शीर्षकाखाली मुख्यत: स्त्रियांची अनेक कामे चालतात. त्यात मुलांना जन्म देणे, मातृत्वाची जबाबदारी पेलणे, घरकाम, कुटुंबाची सेवा, एवढेच नव्हे तर कटुंबाच्या भल्यासाठी व्रतेवैकल्ये - सांस्कृतिक कार्य हे सर्व त्या करतात आणि समाजव्यवस्थेचे रहाटगाडगे बिनबोभाट आणि मोबदल्याची अपेक्षा न राखता चालू ठेवतात. किंबहुना जगातील एकूण श्रमतासांची जेव्हा गणना केली तेव्हा असे लक्षात आले की एकूण १०० तास धरले तर ६६ तास स्त्रिया खर्च करतात आणि केवळ ३४ तास पुरुष श्रम करतात. आणि असे असूनही आजपर्यंत कोणत्याही अर्थशास्त्रज्ञाला, मार्क्सवादी द्रष्ट्यालाही केवळ 'उत्पादन क्षेत्र', त्यात होणारे बदल आणि त्याचा समाजव्यवस्थेच्या गतिविधीवर होणारा परिणाम याचा विचार करावासा वाटला आणि 'जीवनसंवर्धनाचे' महत्त्वाचे क्षेत्र कोणत्याही शास्त्रीय विश्लेषणाच्या बाहेरच ठेवले गेले. आणि म्हणून अदृश्य राहिले. ज्ञान शाखेचे निकष त्याला लागले नाहीत. उत्पादक श्रम, जीवनसंवर्धक श्रम आणि लैंगिक जीवन अशी ही त्रयी आहे. मानवी समाजाला सर्व व्यवहार हा त्या त्रयीच्या चौकटीत चालतो. आश्चर्य म्हणजे समाजव्यवस्थेच्या परिवर्तनासाठी जी गती मिळते त्यामध्ये या तिन्ही क्षेत्रातील व्यवहारांचा आणि त्यामध्ये होणाऱ्या सूक्ष्म बदलांचा भाग असतो आणि ही परस्परावलंबी अशी क्षेत्रे आहेत. हे मार्क्सवादी स्त्रीवादाने आग्रहाने पुढे मांडले. लैंगिकता आणि लैंगिक जीवन या क्षेत्राचा अभ्यास फारच कमी झाला होता आणि जो झाला होता तो अतिशय पारंपरिक दृष्टिकोनातून, सांस्कृतिक मानके प्रमाण मानूनच झाला होता. 'घरकामाला वेतन' मिळाले पाहिजे ही एक महत्त्वाची मागणी त्यावेळी पुढे आली होती. स्त्रीमुक्ती चळवळीमुळे लैंगिकतेबद्दलचे विचार, लैंगिकतेच्या समस्या आणि सर्वात मुख्य म्हणजे लैंगिक अत्याचार, हिंसा या सर्वांबाबत स्त्रीवादी भिंगातून पाहणे शक्य झाले. कोणे एकेकाळी देवता मानली गेलेली स्त्री दुय्यम कशी झाली, तिने शोषण कसे होऊ दिले, एक अबला, अन्यायाची बळी अशी परिस्थिती कशी तयार झाली ह्या प्रश्नाचे उत्तर काही प्रमाणात मार्क्सचा सहकारी एंगल्स याने, 'खाजगी संपत्तीचा उगम, कुटुंबसंस्था व राज्यसंस्था' या पुस्तकामध्ये देण्याचा प्रयत्न केला होता. किंबहुना सर्व मार्क्सवादी पक्षांनी तेच बायबल मानून स्त्री प्रश्नाकडे दुर्लक्ष केले होते. कारण एंगल्सने उगम सांगितला, पण हे शोषण किंवा दुय्यमत्व घालविण्यासाठी व्यूहरचना सांगितली नव्हती. किंवा असे म्हणू या की व्यूहरचना फारच स्थूल स्वरूपाची होती. समाजवाद आला की खाजगी संपत्ती आणि त्यावर आधारित स्त्रीची मुस्कटदाबी करणारी कुटुंबसंस्था नष्ट होईल व स्त्रीपुरुष समानतेने उत्पादन क्षेत्रात भाग घेऊ लागतील.

स्त्रीवादाने 'लैंगिक हिंसाचार'ची खरी कळ शोधून काढली. स्त्रीच्या जीवनातील सर्वच कार्यावर नियंत्रण ठेवण्यासाठी, योनिशुचितेचा बागुलबुवा करण्यात आला. बलात्काराच्या भीतीपोटी कुटुंबाच्या चार भिंतीच्या आतील सुरक्षिततेचा गौरव करण्यात आला, मातृत्वाचे, विशेषत: पुत्रवती स्त्रियांचे गोडवे गायले गेले आणि अशा तऱ्हेने शारीरिक वर्चस्व व सांस्कृतिक वर्चस्व प्रस्थापित करून, संपत्तीचा, शिक्षणाचा, सार्वजनिक कारभाराचा असे सर्व हक्क हिरावून घेवून बिन मोबदल्याचे काम करणारी एक गुलाम/दासी असे तिचे कुटुंबव्यवस्थेतील व समाजव्यवस्थेतील स्थान निर्माण केले गेले. लैंगिकतेवरील वर्चस्व, त्यासाठी मारहाण, हिंसा, विवाहांतर्गत आणि विवाहबाह्य बलात्कार ही साधने वापरली गेली. तिच्या शरीराकडे बघण्याचा पुरुषी दृष्टिकोन , सती, पतिव्रता किंवा गणिका या रूपातून सतत मांडला गेला. हे विश्लेषण जहाल स्त्रीवादी भिंगातून स्पष्ट होत गेले.

जहाल स्त्रीवाद हाही भौतिकतेचे सूत्र मानतो पण पुनरुत्पादन क्षेत्र आणि त्यातून होणारे शोषण यापेक्षा लैंगिक शोषणावर व वर्चस्वावर जास्त भर देतो. मार्क्सवादी/ समाजवादी, वर्गसमाज, आर्थिक सोषण, बिनमोबदल्याचे पुनरुत्पादनाचे काम यावर लक्ष केंद्रित करून समाजवादामध्ये या कामाचे सार्वजनिकीकरण करून स्त्रीची मुक्ती व वर्गविरहित शोषणमुक्त समाजाकडे वाटचाल असे चित्र रंगवितो. स्त्रीपुरुष विषमता असली तरी पहिला शत्री भांडवलशाही. भांडवलशाही उलथून टाकून सत्ता कामगार वर्गाच्या ताब्यात घेणे याला म्हणूनच मार्क्सवाद महत्त्व देतो. जहाल स्त्रीवादही भांडवलशाहीच्या विरोधात आहे. परंतु म्हणून पुरुषी सत्तेला विरोध करण्यामध्ये ढिलाई आणण्यास जहाल स्त्रीवाद तयार नाही. स्त्रियांच्या चळवळीने पुरुषी सत्तेला केंद्रित ठेवूनच लढ्याची आखणी केली पाहिजे अशी जहाल स्त्रीवादाची भूमिका आहे.

### जहाल स्त्रीवाद

शूलमिथ फायरस्टोन ही एक महत्त्वाची जहाल स्त्रीवादी विचारवंत. तिने मार्क्स एंगल्सच्या भौतिकतेवर आधारित सिद्धांत व फ्रॉइडचा मानसशास्त्रीय विश्लेषणावर आधारित सिद्धांत या दोन्हींची सांगड घालून स्त्रीची मानसिक गुलामगिरी घालवायची असेल तर कुटुंबसंस्था मोडली पाहिजे, कारण त्यामध्ये लैंगिक आविष्कार दडपले जाण्याचे कार्य केले जाते. पत्नी व मुले पुरुषी वर्चस्वाखाली असतात आणि त्यांचा एक स्वतंत्र व्यक्ती म्हणून विकास होणे शक्य होत नाही असे मांडले. फ्रॉइडवर तिचा आरोप होता की, त्याचा सिद्धांत बरोबर होता. आज दिसणारे पुरुषी व्यक्तिमत्त्व व स्त्रीचे व्यक्तिमत्त्व ही नैसर्गिक लैंगिक ऊर्मी दडपण्यामुळे तयार झाली आहेत. हे फ्रॉइडचे म्हणणे खरे आहे. परंतु या ज्ञानाचा जेव्हा उपचार (थेरपी) म्हणून उपयोग केला गेला तेव्हा त्यातले क्रांतिकारक तत्त्व हरवून गेले आणि स्त्रीचे व्यक्तिमत्त्व तडजोडवादी कसे होईल याकडेच लक्ष दिले गेले. लैंगिकता मुक्त झाल्यामुळे जी ऊर्जा निर्माण होऊन स्त्रियांनी बंड केले असते ते मारले गेले. सध्याची पुरुषी वर्चस्वावर आधारित कुटुंबसंस्था व मातृत्वाची सक्ती हे दोन्ही नाकारणे हा या बंडाचा गाभा असला पाहिजे. कुटुंबसंस्थेच्या अंतर्गत जी बिनमोबदल्याची कामे स्त्रीला करावी लागतात तो शोषणाचा पाया आहे, आणि तो धिक्कारणे जरूरीचे आहे, असे जहाल स्त्रीवादाचे म्हणणे आहे.

### पर्यावरणीय स्त्रीवाद

भौतिकतेच्या पायावर मांडणी करणारा आणखी एक स्त्रीवाद प्रचलित आहे. त्याला पर्यावरणीय स्त्रीवाद म्हटले जाते. या स्त्रीवादाने भौतिकतेची व्याख्या आणखी विस्तारित केली. मानव निसर्गावर प्रेम करतो आणि या प्रक्रियेतून स्वतःची उपजिविका करतो, कौशल्यनिर्मिती, ज्ञाननिर्मिती, उत्पादनासाठी लागणारी नवी साधने बनवतो आणि यातूनच मानवांचे उत्पादनव्यवस्थेवर आधारित - वर्गसंबंध - परस्पर-संबंध निर्माण होतात. या वर्गसंघर्षातून मानवी समाजांचे परिवर्तन होत जाते. या मार्क्सवादी विश्लेषणाला या स्त्रीवादाने आणखी दोन संबंधांची जोड दिली, मानवाचे म्हणजेच पुरुषांचे निसर्गाशी असलेले संबंध आणि पुरुषांचे स्त्रियांशी असलेले संबंध हे दोन्ही संबंध इतिहासाच्या कालौघात श्रेणीबद्ध पद्धतीने निर्माण झाले. टोळीजीवनात माणसाला निसर्गाबद्दल वाटणारी भीती आणि आदरसुद्धा वर्गसमाज सुरू होताना आणि शोषणावर आधारित समाज व्यवस्था सुरू होताना बदलत गेला. निसर्गावर वर्चस्व प्रस्थापित करण्याची भाषा औद्योगिक क्रांतीनंतर, भांडवलशाही काळात अधिकाधिक वापरली जाऊ लागली. स्त्रियांवरील वर्चस्वही अधिकाधिक बळकट होऊन दोन्ही - निसर्ग व स्त्री - ही संसाधने म्हणून वापरण्याचा दृष्टिकोन तयार झाला. या दोन्ही






संसाधनांमधील समान सूत्र आहे ते दोघांमध्ये 'पुनर्निर्मिती'ची शक्ती आहे. निसर्ग हे मानवाचे घर आहे आणि त्याचा योग्य वापर केला तर झालेली झीज पुन्हा भरुन निघते तसेच स्त्रीचेही आहे. ती पुनर्निर्मिती करते. अपत्य निर्मिती आणि त्यांचे पोषण हे तिच्या शरीरातून होते आणि त्यातून निसर्गामधील पुनर्निर्मितीचा प्रत्यय तिला येऊ शकतो. असा थोडक्यात पर्यावरणवादी स्त्रीवादाचा सिद्धांत आहे.

ह्या विचारांची मांडणी अनेक स्त्रीवाद्यांनी केली आहे. आपल्याकडे वंदना शिवा यांचे नाव प्रसिद्ध आहे. रिडक्शनिस्ट विज्ञान व त्यावर आधारित तंत्रज्ञान वापरण्याच्या भांडवली प्रवृत्तीवर त्या कडाडून हल्ले चढवीत असतात. परंतु मला स्वतःला या सिद्धांताची व्यवस्थित मांडणी करणाऱ्यांमध्ये दोन नावे महत्त्वाची वाटतात. मारिया मिएस आणि कॅरोलिन मर्चंट. पर्यावरणवादी स्त्रीवाद्यांवर गाभावादी (इसेन्शिया-लिस्ट) - किंवा जीवशास्त्रीयवादी भूमिका घेण्याचा सतत आरोप होत असतो. कारण त्या अतिभौतिकवादी व स्त्रियांच्या नैसर्गिक पुनर्निर्मितीच्या शक्तीवर भर देऊन त्याचे उदात्तीकरण करणाऱ्या आहेत असे मानले जाते. त्यामुळे मार्क्सवादी, जहाल स्त्रीवादी आणि मुख्य म्हणजे 'रचनावादी' (कन्स्ट्रक्टिव्हिस्ट) स्त्रियांनी ह्या सिद्धांताचा विचार करणे जवळजवळ नाकारले आहे. मला स्वतःला हा विचार खूप महत्त्वाचा वाटतो. म्हणून त्याची थोडक्यात मांडणी करते.

एंगल्सच्या मांडणीमधील महत्त्वाची त्रुटी मारिया मिएसने दाखवून दिली. तंत्रज्ञानामुळे संपत्ती निर्माण होऊ लागली, तिचा वाढावा निर्माण झाला. 'खाजगी मालमत्ता' उदयाला आली. त्या मालमत्तेचा वारस मिळावा या उद्देशाने स्त्रीच्या लैंगिकतेवर बंधने आली. पुरुषी वर्चस्व लादले गेले. या सूत्राला तिने आव्हान दिले. तिने प्रश्न विचारला की तंत्रज्ञान विकसित करण्यात पुरुषांचाच हात होता हे मानववंशशास्त्रीय पुराव्याच्या आधारे सिद्ध होत नाही. किंबहुना अगदी सुरुवातीच्या काळात स्त्रिया व मुले एका ठिकाणी समाज करून राहत असत आणि त्यातूनच निसर्गाचे अवलोकन करत धान्य निर्मितीचे तंत्र, धान्य साठविण्यासाठी मडकी बनविण्याचे चाक, वल्कले विणण्याचे तंत्र या सर्वांचा शोध स्त्रियांनी लावला. समाजाच्या ८० टक्के गरजा स्त्रियांच्या उत्पादनातून होत होत्या. आणि म्हणूनच मातृपरंपराधारित समाजव्यवस्था अनेक ठिकाणी सापडते. यामध्ये बदल झाला तो शस्त्रास्त्रांच्या शोधाने. आणि या शस्त्रनिर्मितीची गरज भासली ती पुरुषांना. स्त्रिया स्थिर होत्या तर पुरुष फिरस्ता. प्रथमतः आपद्धर्म म्हणून शिकार करणारा, निसर्गाशी नाते सांगणारा पुरुष हळूहळू शक्ती प्रदर्शनासाठी शिकारीच्या मोहिमा हाती घेऊ लागला आणि त्यातून शस्त्रनिर्मितीची गरज निर्माण होऊन ही शस्त्रे पुढे टोळीयुद्धात वापरली जाऊन गुलामांना पकडून आणण्यासाठी त्यांचा उपयोग होऊ लागला. थोडक्यात मारियाचे म्हणणे असे की, दोन प्रकारचे तंत्रज्ञान विकसित होत गेले. एक उत्पादनक्षम, निर्मितीक्षम व दुसरे मारक, विनाशकारी. वर्चस्ववादी मनोवृत्तीचा उगम या ऐतिहासिक प्रक्रियेमध्ये आहे. स्त्रीला स्वतःच्या शारीरिक क्षमतेतून निर्मितीचा प्रत्यय येऊ शकतो. अपत्यनिर्मिती, स्तनपान या सर्वांतून एक निसर्गाशी सुसंवादित्व साधण्याची प्रक्रिया तयार होते. याउलट पुरुषाला आपल्या कर्तृत्वाचा, निर्मितीक्षमतेचा अनुभव घेण्यासाठी बाहेरील साधनांचा आश्रय घ्यावा लागतो. शिकारीतून, शस्त्रास्त्रनिर्मितीतून, पुढे घोडे, गाय, बैल, शेळ्या, मेंढ्या यांचे पाळीव प्राण्यांमध्ये रुपांतर करण्यातून पुरुषांनी हे साध्य केले. पाळीव प्राण्यांच्या शरीरसंबंधांतून पुरुषाला स्वतःमधील पितृत्वाचा शोध लागला. आणि टोळीयुद्धामध्ये दुसऱ्या टोळीतील स्त्रियांना काबूत आणण्यासाठी शस्त्रांबरोबर बलात्काराचाही वापर करण्यास सुरुवात झाली आणि अशा रीतीने स्त्रिया व निसर्ग या दोन्हीवर वर्चस्व प्रस्थापित करणारी वर्गाधिष्ठित समाजरचना अस्तित्वात आली असावी असे मारिया मिएस हिचे म्हणणे आहे. तिच्या मते मार्क्सने वर्णन केलेल्या स्थूल पातळीवरील समाज परिवर्तनाच्या प्रक्रियेमध्ये वर्चस्ववादाची रुपे बदलत गेली परंतु गाभा तोच राहिला. आजच्या भांडवली समाजामध्ये अनेक उच्च मध्यमवर्गीय स्त्रियांना पुरुषांबरोबर काम करण्याची समान संधी मिळते. आणि मुक्ततेची जाणीव व्यक्तिगत पातळीवर होत असते परंतु त्याचवेळी कष्टकरी वर्गातील अनेक स्त्रियांचे शोषण वाढलेले असते. निसर्गाचा विनाश होत असतो आणि ज्यांना समान संधी मिळते त्या स्त्रिया पुरुषी सत्तेची मानके स्वीकारुन जगत असतात. त्या सत्तेला आव्हान देण्याची व अधिक उन्नत पातळीवरील निसर्गाशी सुसंवादित्व राखणारा समाज निर्माण करण्याची गरज त्यांना जाणवत नसते. खरी समानता आणि स्त्री पुरुष म्हणून असणाऱ्या क्षमतांचा विकास या शोषणाधिष्ठित समाजामध्ये शक्य नाही. मारिया मिएसच्या मते आज स्त्रियांमध्ये श्रेणी तयार झाल्या आहे. तिसऱ्या जगातील

कष्टकरी स्त्रिया या सर्वात तळागाळात आहेत आणि तथाकथित विकसित देशातील स्त्रियांना या शोषणाची फळे मिळत आहेत. उदा. आंतरराष्ट्रीय व्यापारामुळे आपल्या देशात पिकणाऱ्या नैसर्गिक संसाधनातून निर्मिती होऊ शकणाऱ्या उत्पादनाच्या कितीतरी पट उत्पादन विकसित देशातील लोक उपयोगात आणतात. कारण ग्राहक म्हणून खरेदी करण्याची कुवत त्यांच्याकडे आहे. गरीब देश मात्र त्यांच्या उत्पादनावरचा हक्क सोडून देतात.

कॅरोलीन मर्चंटने तर विज्ञानाचा विकास कसा झाला याचाच इतिहास दिला आहे. विकासाच्या कामामध्ये सातत्याने निसर्गाचा शोध घेताना निसर्गावर वर्चस्व मिळविण्याची भाषा वापरली गेली. निसर्गाच्या निर्मिती-क्षमतेचे गूढत्व, स्त्रीच्या निर्मितीक्षमतेचे गूढ हे कोणत्याही मार्गाने, हिंसेचा वापर करूनही सोडविले गेले पाहिजे व निसर्ग काबीज केला पाहिजे असे तत्त्वज्ञान वापरले गेले असे मर्चंटने सप्रमाण सिद्ध केले आहे. निसर्ग एकात्म आहे, जिवंत प्राणी आहे आणि निसर्गातील सर्व प्राणीमात्र, वनस्पती, सर्व भौगोलिक रचना, पर्यावरण हे एकसंध आहे आणि एकमेकांवर अवलंबून आहेत. कोणत्याही एका घटकामध्ये फार मोठे बदल झाले तर त्याचे परिणाम दुसऱ्या घटकांवर होत असतात आणि निसर्गाची, म्हणजेच मानवाला जगण्यासाठी आवश्यक अशा पर्यावरणाची न भरून येणारी हानी होत असते हे समजून घेण्याची आवश्यकता आहे. म्हणूनच असे कोणतेही तंत्रज्ञान व विज्ञान वापरता कामा नये ज्यामुळे प्रत्येक गोष्टीचा केवळ सुटा सुटा विचार केला जाईल. सध्याच्या काळात आरोग्यविज्ञान क्षेत्रात व शेतीमध्ये जे अनेक शास्त्रीय शोध लागत आहेत ते केवळ नफ्याच्या आशेने, बाजारपेठेसाठी केले जात आहेत. त्यांचे परिणाम दूरगामी होऊन आज उपलब्ध असलेला पर्यावरणीय कोष, किंवा पाया नष्ट होण्याची शक्यता आहे. निसर्गाची एकात्मता (इंटिग्रिटी) टिकविणे व सुसंवादी पद्धतीने विज्ञान विकसित करणे महत्त्वाचे आहे असे कॅरोलीन मर्चंट आग्रहपूर्वक मांडते.

## सांस्कृतिक स्त्रीवाद आणि आधुनिकोत्तर स्त्रीवाद

या ठिकाणी आपण काही संज्ञांचा वापर करून हे विविध विचारप्रवाह किंवा त्यांचा संकल्पनात्मक परिसर समजून घेणार आहोत. यामध्ये एक कौतुकाचा भाग असा आहे की जवळजवळ सर्वच ज्ञानशाखांतून स्त्रीवादी विचारांना खतपाणी मिळाले आहे. खऱ्या अर्थाने आंतरज्ञानशाखीय अशी ही विचारधारा समृद्ध होत आहे. मानववंशशास्त्र, उत्खननशास्त्र, समाजविज्ञान, अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, इतिहास, भाषाशास्त्र, संस्कृतिशास्त्र आणि मानसशास्त्र व मनोविश्लेषण शास्त्र असा सर्वच शाखांतून अनेक संकल्पनांचा ऊहापोह येथे होत आहे. त्यामुळेच त्यांच्या बारकाव्यांमध्ये जाणे शक्य होणार नाही. एकतर मलाही सर्व कल्पना पुरेशा कळलेल्या नसणार आहेत आणि त्या तुमच्यापर्यंत सर्व सूक्ष्मतेसह पोचविण्यासाठी लागणारी प्रगल्भता व कौशल्य दोन्ही माझ्याकडे नाही हे मला मान्य करावे लागेल.

सर्वात महत्त्वाचा वाद आहे तो स्त्रीचे दास्य कसे समजून घ्यायचे, खरी 'स्त्री' कशी आहे, केवळ तिच्या शरीराकडे, जीवशास्त्रीय धारणांकडे न बघता त्यांच्या पलीकडे जाऊन 'स्त्रीत्वा'चा शोध घेता येतो का आणि त्या शोधातून ती सापडली तर तिची म्हणजेच स्त्रीत्वाची व्यवच्छेदक लक्षणे कोणती, स्त्रीत्वाचा गाभा काय याबद्दलचे हे मतभेद आहेत. आणि खूप टोकाच्या भूमिका आहेत. उदा. आधुनिकोत्तर विचारप्रवाहांपैकी एका प्रवाहाचा तर 'गाभा' या शब्दालाच विरोध आहे. समाजरचना, समाजातील माणसे, स्त्री-पुरुष हे सर्वच समाजेतिहासाचा भाग आहेत. आर्थिक व सांस्कृतिक सर्वच बदलातून 'मानव' घडत जातो. त्यामुळे तो मूळ, किंवा गाभ्यातून कसा आहे, कोणत्या नैसर्गिक मूलद्रव्यांतून तो बनलेला आहे याचा शोध घेण्याचे कारणच नाही. प्रत्येकाने आपल्यासाठी 'अवकाश' शोधावे व स्वतःला हवे तसे बदलावे कारण मानव प्राणी, स्त्री ही सातत्याच्या बाह्य व अंतर्गत बदलातून नव्याने जन्माला येते. आधुनिक तंत्रज्ञानाच्या मदतीने शारीरिक बदलही घडवून आणता येतात. अशावेळी स्त्री व पुरुष अशा ढोबळ संकल्पना सुद्धा नष्ट होण्याची वेळ आली आहे. लैंगिकतेची, लैंगिक ओळखीची अनेक रूपे मान्य होऊ लागली आहेत. मानवाची (परिवर्तनशील) ओळख - घडत जाणारा प्राणी (Becoming) अशीच आहे. मानव ज्या निसर्गाचा भाग आहे तोही बदलतो आहे. हा वैचारिक प्रवाह रचनावादी परिप्रेक्ष्यामधील टोकाची भूमिका घेतो.

याउलट जे 'गाभ्याची' कल्पना भौतिक पायाची कल्पना, किंवा भौतिकता काही मूलद्रव्यांनी घडलेली आहे असे मानतात त्यांना स्त्रीचा शोध घेणे म्हणजे स्त्रीमुक्तीसाठी प्रयत्नशील राहणे असे वाटते. कारण स्त्रीची आजची अवस्था

ही समाजेतिहासाची फलनिष्पत्ती असून तिला दास्याची, किंवा शोषित, किंवा दुय्यमतेची अवस्था आहे, शक्तीहीन, सत्ताहीन अवस्था आहे असे ते मानतात. त्यामुळेच ही अवस्था दूर करण्यासाठी सांस्कृतिक, सामाजिक, संस्थात्मक बदल करण्याबरोबरच भौतिक - आर्थिक बदल करावे लागतील. हे सर्व पदर सोडविले गेले की आजपर्यंत दबलेली, पण आता शारीरिक आणि मानसिकरित्या मुक्त झालेली खरी 'स्त्री', आजची 'स्त्रीत्व' अस्तित्वात येईल आणि मगच खऱ्या अर्थाने स्वायत्तपणे, सार्वभौमपणे विकास, अंतर्गत प्रवृत्तींचा विकास पाहता येईल अशी त्यांची मांडणी असते.

अनेक स्त्रीवादी विचारप्रवाह हे या दोन टोकांमधील काही संकल्पनांचे रसायन करूनच आपली मांडणी करत असतात आणि हिरीरीने वादविवाद करतात. या तात्विक वादावरच त्यांची राजकीय पावलेही अवलंबून असतात. हे वादही महत्त्वाचे असतात कारण त्यामुळे स्वतःच्या भूमिकेला पुन्हापुन्हा तपासून बघता येते, थोडी लवचिकता दाखवून बदल करता येतात, जे चळवळ पुढे जाण्यासाठी आवश्यक असतात. परंतु ही शिकण्याची भूमिका न घेता 'चिरेबंदी' भूमिका घेतली गेली आणि आधीच मूठभर असणाऱ्या स्त्रीमुक्तीवाल्या स्त्रियांची विभागणी झाली तर गोंधळाचे वातावरण निर्माण होऊन सत्तास्थानांशी झुंज देणे कठीण जाते. शेवटी परिवर्तनासाठी, 'घडण्यासाठी' संघर्ष करणे, वेगवेगळ्या पातळींवर व जीवनाच्या सर्वच क्षेत्रांमध्ये आवश्यकच असणार आहे.

ज्या काही संकल्पनांमधील अंतर्विरोध टोकाचा मानला जातो. त्या थोडक्यात अशा. त्यांचा ऊहापोह पुढे केला जाईल, पण येथे नुसती नोंद करते.

भौतिकवाद विरुद्ध प्रतिकृतिवाद
(Represen-tation)
जीवशास्त्रवाद विरुद्ध रचनावाद
सत्य विरुद्ध सतत बदलते वास्तव
समानता विरुद्ध वेगळेपणा (सामाजिक न्याय)
संरचनावाद विरुद्ध संरचनोत्तरवाद
आधुनिकतावाद विरुद्ध आधुनिकोत्तरवाद
शोषित/बळी विरुद्ध स्वायत्त विचारशील अस्तित्व
संस्थात्मक लोकशाही विरुद्ध स्वायत्त लोकशाही
गोंधळवाद

**भौतिकवाद विरुद्ध प्रतिकृतिवाद**

हा महत्त्वाचा वाद आहे. भौतिकवादी विश्लेषण आपण पाहिले. भौतिक पाया मान्य करून मग मानवी समाज व शोषणावर आधारित समाजरचना कशी बनली, याचे ऐतिहासिक पद्धतीने केलेले हे विश्लेषण आहे. याच्या विरोधी स्त्रीवाद्यांचे म्हणणे असे की हा 'अतिविशाल सिद्धांत' मांडून सद्यःस्थितीचे काहीच आकलन होत नाही. शिवाय यामध्ये छुप्या पद्धतीने मानवी क्षमतांबद्दल काही तत्त्वे गृहीत धरलेली आहेत. आणि या क्षमता हळूहळू उलगडणार आहेत असेही मानले गेले आहे. जणू यापेक्षा वेगळे काही घडणारच नाही, कारण बीजरूपाने सर्व ब्रह्मांड त्यात साठविलेले आहे अशी काहीशी चिरेबंदी कल्पना भौतिकवादी मानतात. श्रमांची उत्पादनक्षमता असो, लैंगिक जाणिवांची ऊर्जा असो किंवा जननक्षमता असो, सर्व काही सुनिश्चित आहे, त्याचा फक्त शोध घ्यायचा आणि हळूहळू उलगडत जायचे अशी काहीशी उत्क्रांतीवादी अशी ही भूमिका आहे.

याच्या विरोधातील स्त्रीवाद्यांचे म्हणणे आहे की खरा निसर्ग काय आहे, खरा मानव, खरी स्त्री, खरा पुरुष कसा आहे आम्हाला माहीत नाही. कारण आम्हाला जे आकलन होते ते कोणत्यातरी सांस्कृतिक चष्म्यातून, चिन्हांतून, विधींतून, भाषेतून असेच असते. आमच्या जाणिवा या सर्व प्रकृतीतून व्यक्त होतात आणि म्हणून स्त्रीचे शोषण हे आम्हाला चिन्हांतून, तिच्या वावरण्याच्या पद्धतीतून, तिच्या मनातील तिच्या प्रतिमांतून कळते. तिला तिचे भवितव्य कसे हवे, तिच्या उर्मी, आकांक्षा काय आहेत. तिला कसे घडायचे आहे हे आम्ही तिच्या शब्दांतून पाहण्याचा प्रयत्न करू. परंतु आम्ही तिच्या अंगी असणाऱ्या क्षमतांच्या संदर्भात आणि त्यांचा विकास कसा होऊ शकतो या संदर्भात चित्रे रंगवू इच्छित नाही. तिला काही उपदेश करणे, शिकवणे किंवा उद्याची सुखी चित्रे रंगवून बंडाला उद्युक्त करणे अशी भूमिका घेऊन स्त्रीवाद्यांनी काम करणे म्हणजे स्वतःच्या जाणिवा श्रेष्ठ आहेत. अभिजात आहेत आणि इतर सामान्य स्त्रीच्या जाणिवा कनिष्ठ प्रतीच्या आहेत, तिला शिकविण्याची गरज आहे असा अहंकार निर्माण करून उच्चनीचतेची फळी निर्माण करणे आहे.

थोडक्यात हिंदू धर्मामध्ये जो 'मायावाद' दर्शविला आहे त्याचे हे अधिक परिणतरूप आहे. सत्या, असत्य या कल्पना व सत्याचा शोध घेण्याचा अहंकार, दुसऱ्यांना बदलण्यासाठी संघटन करण्याची गरज मानणे या सर्व

संकल्पना या 'सत्ता हासील करणे' या कल्पनेशी निगडित आहेत. आपण जर 'सत्ता' या कल्पनेच्या विरोधात आहोत, कारण स्त्रियांचे शोषण हे सत्ता संबंधातून होते तेव्हा आपण 'सत्ता' या संकल्पनेचा वापर करता कामा नये. आपल्या नकळत आपण जी विचारप्रणाली किंवा सैद्धांतिक चौकट वापरतो त्यामुळे अशा प्रकारे स्वतःच्या मतांचा आग्रह दुसऱ्यावर लादणे वगैरे पद्धतीच्या सत्तेचा वापर होत असतो. आपल्याला दिसते तेच सत्य आहे असे मानले तर आग्रही भूमिका तयार होते आणि जेव्हा दिसण्यात, किंवा प्रतिनिधित्व करणाऱ्या प्रतिमांमध्ये बदल होतो तेव्हा तो आपण लक्षात घेत नाही कारण आपली काही भौतिक सत्ये आपण गृहीततत्त्व म्हणून पक्की करून ठेवलेली असतात. आपण 'नैतिक' 'अनैतिक' अशा कोनाड्यांमध्ये त्यांची कायमची विभागणी करून ठेवतो.

### जीवशास्त्रवाद विरुद्ध रचनावाद

वरील दोन संकल्पनांचे अधिक सैद्धांतिक विवेचन या दोन कल्पनांमधून होते. पर्यावरणवाद्यांवर विशेषतः जीवशास्त्रीवादी असा आरोप केला जातो. अर्थात त्याहून आधी हा आरोप सर्व धर्मांच्या परिप्रेक्ष्यांच्या संदर्भात केला जात होता आणि तो बरोबरही आहे. स्त्रीपुरुष यांच्यातील जीवशास्त्रीय भेदावर अतोनात भर देऊन स्त्रीला घरामध्ये बंदिस्त करणे आणि पुरुषी वर्चस्वाखाली डांबून ठेवण्याचे काम जवळजवळ सर्व धर्मांनी केले आहे. किंबहुना शस्त्रास्त्रांच्या बरोबरीने धर्म कल्पनांचा जन्म झाला आणि हे धर्म अधिकाधिक मूलतत्त्ववादी बनत गेले कारण वर्ग व लिंगभाव व्यवस्था बळकट होत गेली आणि त्याचे समर्थन करत मानसिकता रुजविण्याची गरज होती. त्यामुळे काहीवेळा व पर्यावरणवादी स्त्रीवादाचीही मूलतत्त्ववादी अशी संभावना केली जाते. त्यांना विज्ञान व तंत्रज्ञानाचा द्वेष आहे, केवळ नैसर्गिक पद्धतीने, गुहेत राहणाऱ्या प्राचीन मानवाची जीवनशैली त्यांना हवी आहे अशीही टीका होते. ही टीका किती अतिरेकी आहे हे मागे केलेल्या मांडणीशी तपासून पाहिले की लक्षात येईल. स्त्री-पुरुषांची कामे, श्रमांचे प्रकार, कृती वेगळ्या का झाल्या याला काही प्रमाणात जीवशास्त्र जबाबदार आहे. परंतु ती कार्ये व कृती बदलू शकतात हेही तितकेच खरे आहे. कारण मानवप्राणी हा इतर प्राण्यांपेक्षा वेगळा आहे. तो निसर्गाबरोबर जाताना क्रिया-प्रतिक्रिया पद्धतीने जगतो, घडत जातो, शिकतो, बदलत जातो अशी ही मांडणी आहे.

रचनावादी स्त्रीवाद हा मानवाच्या सांस्कृतिक घडणीवर अतिशय भर देतो आणि म्हणून जीवशास्त्रीय काही असूच शकत नाही, अशी मांडणी करतो. मानव आपल्या बुद्धीने, कौशल्याने, तंत्रज्ञानाने जीवशास्त्रच बदलायला सिद्ध झाला आहे. स्त्री-पुरुष या दोन संकल्पना जाऊन तेथे अनेक पदरी जाणिवा, त्यावरून ठरणारी 'ओळख' यामध्ये विविधता असते याचे भान समलिंगी संबंध असणाऱ्या व्यक्तींनी प्रथम आणले. त्यातूनच हिजडा किंवा तंत्रज्ञानाने शारीरिक लैंगिक लक्षणे बदलून घेणाऱ्या व्यक्ती असे विविध लिंगप्रकार येऊ लागले आहेत. स्त्रीशरीरामध्ये पुरुषत्वाचे मानसिक गुण-छटा आढळणे व काही पुरुषांना स्त्रीत्वाचे तथाकथित 'भावविशेष' भावणे, व्यक्त करावेसे वाटणे हे घडू लागले आहे. मानवी 'रचना' क्षमतेचा हा प्रभाव आहे. मानव जीवशास्त्राच्या पलीकडे गेलेला आहे. असे रचनावाद्यांचे आग्रहाचे म्हणणे आहे. ज्युडिथ बाटलर ही सर्वात टोकाची रचनावादी विचारवंत आहे.

### सत्य विरुद्ध बदलते वास्तव

या द्वैतामध्येही वरील वादाचेच प्रतिबिंब उतरलेले दिसते. सत्य असते, म्हणजे भौतिक क्षमता असतात असे मानण्यावर आक्षेप घेतला जातो की तुम्ही चिरेबंदी पद्धतीने विचार करता. वास्तव हे 'फिक्स्ड' असू शकत नाही. जमिनीत घट्ट रुतून बसलेले नसतेच. वास्तव हे सतत बदलते. 'फ्लुइड' पाण्यासारखे प्रवाही, डुळमुळणारे असते. असे मानले तर जीवनातील अनेक व्यामिश्र वास्तवतेचे आकलन आपण करून घेऊ शकतो. त्याचा स्वीकार करू शकतो आणि नैतिक, अनैतिक अशा घट्ट कल्पना न वापरता सामोरे जाऊ शकतो. ह्या चर्चेचे सामान्य स्त्रीच्या जीवनात महत्त्व काय असा प्रश्न आपल्याला सतत पडत असेल. येथे मी फार उदाहरणे देत बसत नाही. पण स्त्री-मुक्तीचे राजकारण करणारे राजकीय पक्ष, स्वायत्त गट, दलित स्त्री-मुक्तीवादी गट या सर्वांच्या राजकीय भूमिकेची मुळे/समाजाची मुळे खोलवर वाहात असणाऱ्या या तात्त्विक प्रवाहातून पोसली जातात. हे तात्त्विक प्रवाह दरवेळी स्पष्टपणे व्यक्त होतात असे नाही. पण एखाद्या विंझण विहिरीला (बोअरवेल) जसे जमिनीखालील अनेक प्रवाह पाणी पुरवठा करतात तशा प्रकारे अदृश्य अस्तित्व असलेले हे प्रवाह असतात. आपण जेव्हा राजकीय व्यूहरचनेचा विचार करणार आहोत तेव्हा विविध विषयांवरील भूमिकांची या

तात्त्विक सूत्रांशी कशी जोडणी झालेली आहे याचे दर्शन होईल.

**'समानता' विरुद्ध 'वेगळेपणा'**

या दोन संकल्पना आज खूप महत्त्वाच्या झालेल्या आहेत आणि त्याच्या भोवतीचे राजकारण इतके तीव्र मतभेदाचे आहे की स्वायत्त गटांच्या स्त्रीचळवळीने आपल्या घोषणातून 'समानता' शब्द काढून केवळ 'सामाजिक न्याय' मिळाला पाहिजे असे शब्दप्रयोग वापरायला सुरुवात केली आहे.

'समानता' शब्दप्रयोग - संकल्पना - प्रथम वौलस्टोनक्राफ्ट हिने १७९२ मध्ये वापरला आणि तो आजतागायत भौतिकवादावर आधारित स्त्रीवादी विचार-प्रवाहांनी स्वीकारला होता. काही प्रमाणात विरोध झाला तो पर्यावरणवादी स्त्रियांचा. कारण त्यांनी 'ज्ञानबांधणी' कशी होते, विज्ञानामागील सूत्रांचे तर्कशास्त्र कोणते, रिडक्शनिझम (एखादी घटना किंवा प्रक्रिया समग्रतेने न तपासता, सोयीप्रमाणे तुकडे करून, तुकड्यातुकड्याने त्या घटनेची किंवा वस्तूची चिकित्सा करणे) कसा त्यात त्यात घुसतो, स्त्रियांचे काम, तिची क्षमता यांचे अवमूल्यन कसे होते या प्रकारचे प्रश्न विचारुन पुरुषी सत्ता केवळ त्यांच्या खाजगी मालमत्तेवर किंवा आर्थिक बलावर अवलंबून नसून एकूण ज्ञानव्यवस्थाच त्यांनी कशी काबीज केली आहे याची मांडणी करायला सुरुवात केली त्यामुळे पुरुषाबरोबर समानता मिळविणे म्हणजे त्याने जी सैद्धांतिक मांडणी केली आहे, जे ज्ञान निर्माण केले आहे ते स्वीकारणे व अर्धा वाटा मला द्या, मला समान संधी द्या असे म्हणणे होईल याची जाणीव त्यांना झाली आहे. पर्यावरणवादी स्त्रियांनी पर्यायी समाजव्यवस्थेची, पर्यायी विकासाची मांडणी केली आहे - ज्यामध्ये स्त्री करत असलेले 'जीवसंवर्धनाचे' काम, म्हणजेच पुनरुत्पादनाचे काम केंद्रीय असेल आणि त्याला अनुषंगाने उत्पादनाच्या कामांची मांडणी होईल. निसर्गावर अत्याचार न होता, अतिरेक न होता, चिरंजिवी पद्धतीने विकास होईल आणि 'जीवनसंवर्धनाच्या' कामाचे मूल्य पैशामध्ये न मोजता सामाजिक स्थान वाढविण्याने मोजले गेले तर पुरुषही त्या कामामध्ये सहभागी होतील अशा तऱ्हेची ही मांडणी असल्यामुळे, केवळ पुरुषाबरोबर स्थान किंवा समानता असा मुद्दा त्यांनी बाजूला ठेवला आहे. उदारमतवादी व मार्क्सवादी दोन्ही विचारप्रवाह स्त्रीला पुरुषाच्या बरोबरीने सर्व क्षेत्रात भाग घेण्यासाठी आवाहन करतात. उदारमतवादी समान संधीची भाषा बोलतात आणि स्पर्धेत स्त्रीने उतरले पाहिजे अशीही अपेक्षा ठेवतात. त्यासाठी स्त्रियांची कौशल्य, शिक्षण, प्रशिक्षण वगैरे गोष्टींवर त्यांचा भर असतो. मार्क्सवादी स्त्रियांना पुरुषांची बरोबरी करण्यासाठी मदत झाली पाहिजे अशा धोरणांची मागणी करतात. शारीरिक वेगळेपणाचे भान त्यांना आहे. परंतु या शारीरिक वेगळेपणाचा मानसिकतेवर परिणाम होतो असे त्यांना वाटत नाही आणि म्हणून 'समानता' हा त्यांचा नारा असतो.

सिमाँ दि बुव्हे या फ्रेंच विदुषीने या समानतेच्या तत्त्वावर फार जोर दिला. एका बाजूने तिने 'रचनावादी' भूमिका घेतली. स्त्री ही जन्माला येत नाही. ती 'स्त्री' म्हणून घडवली जाते हे तिचे प्रसिद्ध वाक्य आहे. परंतु तिला स्त्रीचे दास्य, मागासलेपण, हे तिला 'पुनरुत्पादनाच्या' कामात अडकले गेल्यामुळे आले असे वाटत होते. पुरुषाने संस्कृती घडविली. स्त्री मात्र नैसर्गिक चक्रात अडकून बसली. असे तिचे म्हणणे होते. स्त्रीमध्ये पुरुषाबरोबरीने संस्कृती घडविण्याची क्षमता आहे, ती समान आहे पण त्यासाठी तिने स्वतःची कुटुंबव्यवस्थेतून सुटका करुन घेतली पाहिजे. तंत्रज्ञानाचा फायदा घेतला पाहिजे अशी भूमिका घेतली होती. पुरुषी 'संस्कृतीला' आव्हान देण्याची भूमिका तिने घेतली नाही. या 'समानतेच्या' संकल्पनेला तीन वेगवेगळ्या पातळ्यांवर धक्का दिला गेला. स्त्री-पुरुष समानतेच्या आधी स्त्रिया तरी समान आहेत का हे पाहणे आवश्यक आहे. स्त्रियांची चळवळ शब्दप्रयोग वापरताना समानतेचा धागा पकडून एकजुटीचे आवाहन करण्यात येते. परंतु स्त्रियांच्या अंतर्गत जे अनेक भेद आहेत, गोऱ्या व काळ्या, वंशभेद, सक्षम व पंगु यामुळे आलेले भेद, स्थलांतरामुळे एकमेकांजवळ आलेल्या स्त्रियांमध्ये - मूळ त्या देशाच्या व बाहेरून वेगळ्या संस्कृतीतून आलेल्या पराया स्त्रिया, वर्गभेद आणि भारतीय संदर्भात जातिभेद. या सर्व भेदातून वेगळेपणाची होणारी व दिली जाणारी जाणीव, अनुभवाचे वेगळेपण याची दखल भौतिकवादावर - आर्थिक शोषण व लैंगिक शोषण यावर भर देणाऱ्या विचारप्रवाहांनी घेतलेली नाही, तेव्हा आता 'समानता' संकल्पना बाजूला ठेवून, 'वेगळेपणा' तपासणे आवश्यक आहे असा विचारप्रवाह पुढे आला. 'वेगळेपणा' कल्पना ही तीन वेगवेगळ्या संदर्भात स्वीकारुन तीन 'वेगळे' विचारप्रवाह झालेले दिसतात.

पहिला प्रवाह हा 'राजकीय ओळख' (आयडेन्टिटी) या अंगाने व्यक्त होतो. अमेरिकेत 'काळ्या स्त्रियांनी' स्वतःची वेगळी चूल मांडण्यासाठी ही विचारधारा निर्माण केली. केवळ स्त्रिया म्हणून एका व्यसपीठावर येणे यामध्ये त्यांना रस नव्हता. गोऱ्या व काळ्या स्त्रियांमध्ये समान धर्म आहे, समान 'मागण्या' आहेत असे त्यांना वाटत नव्हते. आपल्याकडील दलित स्त्रीवादाच्या मागेही हीच प्रेरणा आहे. त्यांना स्वतःची स्वतंत्र 'राजकीय ओळख' हवी आहे.

दुसरा एक उपप्रवाह हा मुख्यत: स्वतःला भौतिकवादी मुख्य प्रवाहापासून वेगळे ठेवू इच्छितो कारण त्यांना भीती वाटते की अतिस्थूल पातळीवरील स्त्रीमुक्तीची विचारधारा सर्व स्त्रियांमधील सारखेपण फार गृहीत धरते व एका छत्राखाली सर्वांना आणण्याचा प्रयत्न करते. पण त्यातून त्या त्या वेगळ्या स्त्रियांची खरी 'ओळख' त्याचे 'माणूसपण ' किंवा 'कर्तेपण' व्यक्त होत नाही. शोषणाची संकल्पना गटांनिशी बदलते. मुख्य प्रवाहाची 'एकच सत्य' असल्याची भाषा त्यांना रुचत नाही. 'सारखेपणा'च्या कल्पनेने त्यांची कुचंबणा होते. वेगवेगळ्या कारणांमुळे व व्यवहारांमुळे अनेक स्त्रियांचे गट मुख्य प्रवाहातून वगळले जातात असे या प्रवाहाचे आग्रहाचे प्रतिपादन आहे. हा प्रवाह आधुनिकोत्तर, तसच संरचनोत्तर या नावानेही ओळखला जातो. त्याचा अधिक विचार आपण पुढे करू. कारण त्यासाठी हे विचार ज्या विशिष्ट संकल्पनांच्या विरोधात किंवा द्वंद्व म्हणून उभे राहिले त्या 'आधुनिकता' व 'संरचना' या दोन संकल्पनांचाही विचार आवश्यक ठरेल.

वेगळेपण या सिद्धांताखालील तिसरा विचारप्रवाह हा मानसशास्त्रीय विश्लेषणाच्या शाखेवर आधारित आहे. इरिगारे व क्रिस्टवा या फ्रेंच स्त्रीवादींनी या विचारप्रवाहांची मांडणी केली आहे. त्यांच्यामध्ये ही आपापसात फरक आहेत. परंतु तेवढ्या बारकाइने विचार करणे येथे शक्य नाही. या स्त्रियांनाही 'सांस्कृतिक स्त्रीवादी' अशा स्थूल संकल्पनेखाली आणता येईल. परंतु इतर सर्व विचारप्रवाहांपेक्षा अगदी वेगळा विचार या स्त्रियांनी मांडला. त्यांनी 'स्त्री शरीर' आणि त्याचे 'वेगळेपण' या कल्पनेला खूपच महत्त्व दिले. त्यामध्ये पुन्हा क्रिस्टवा ही मातृत्वाची क्षमता व प्रसूतीचा अनुभव, मातृत्वाचा अनुभव आणि त्यातून घडणारी स्त्रीची वेगळी सांस्कृतिक जाणीव याकडे लक्ष वेधते. तर इरिगारेला लैंगिक वासनांच्या अंगाने स्त्रीशरीराची ओळख, 'कर्ते'पणाचा अनुभव या गोष्टी महत्त्वाच्या वाटल्या आहेत. आजपर्यंत 'वासना', त्यातून मिळणारे सुख, आनंद हे सर्व पुरुषांच्या दृष्टिकोनातून ठरविले गेले. स्त्रीशरीराबाबतची ओळख, व्याख्या हे पुरुषी भिंगातून स्त्रीपर्यंत पोचलेले आहे आणि ते बदलण्याची गरज आहे. लैंगिकतेमधील वेगळेपण वेगवेगळ्या तऱ्हेने व्यक्त होत असते आणि त्यातून व्यक्ती घडते. ह्या वेगवेगळ्या अभिव्यक्ती एकमेकांशी सुसंवादी असतीलच असे नाही. किंवा एकमेकांना अनुरुप असतील असेही नाही. किंबहुना काही वेळा त्या एकमेकांच्या मूलभूत विरोधातही असतील. हे स्त्री शरीराचे वेगळेपण व स्त्रियांमधील वेगवेगळ्या अभिव्यक्ती स्वीकारणे गरजेचे आहे. या 'वेगळेपण' विचारप्रवाहाचे आग्रहपूर्ण म्हणणे आहे, की स्त्रीशरीर व वासनांच्या अभिव्यक्तीमधील विविधता हा जर पाया धरला तर 'स्त्री' म्हणजे 'काय' 'कोण' या व्याख्या तर बदलतीलच परंतु सर्व जगाबद्दलची व्याख्या बदलावी लागेल. कारण सामाजिक व्यवहार तर बदलतीलच परंतु आज अभिव्यक्त होणारे ज्ञान, शब्दांचे अर्थ हे पुरुषसत्तेच्या परिप्रेक्ष्यातून, त्या सत्तेशी जोडणी करण्याच्या पद्धतीने झाले आहेत. त्या समाजाला - जगाकडे पाहण्यालाच उलटजबाब विचारावे लागतील.

### संरचनावाद विरुद्ध संरचनोत्तरवाद - आधुनिकता विरुद्ध आधुनिकोत्तरवाद

या दोन जोड्या काहीशा मिळत्या जुळत्या आहेत आणि म्हणून त्यांच्यातील ताण बरोबरच समजावून घेऊ. भौतिकवादी विचारप्रवाह असे मानतात की एक प्राथमिक साम्यवादी अवस्था सोडली तर मानवी समाज ज्या इतर अवस्थांमधून जात जात आजच्या आधुनिक अवस्थेपर्यंत पोचला आहे त्या सर्व समाजव्यवस्थांमध्ये अनेक संस्था निर्माण होतात. संस्थांचे अभिरूप बदलते परंतु गाभा तोच राहतो. ह्या संस्था म्हणजे एका मोठ्या संरचनेच्या उपसंरचना एकमेकांत गुंतलेल्या असतात आणि काही प्रमाणात सुसंवादी असतात. एकातील बदलाचे परिणाम दुसरीवर होऊ लागतात. शिवाय या उपसंरचनांमध्ये एक प्रकारची श्रेणीबद्धता असते आणि या उपसंरचनांच्या अंतर्गतही श्रेणीबद्धता असते. थोडक्यात स्त्रीच्या स्थानाचा, संस्कृतीचा, तिच्या प्रातिनिधीक प्रतिमांचा विचार करताना या सगळ्या व्यमिश्रतेचा विचार करावा लागेल. यामध्ये भौतिक पाया समजून घेणे हे केंद्रीभूत राहील.

आधुनिकतावाद हा मुख्यत: औद्योगिकरणाच्या

प्रक्रियेमध्ये जन्माला आला. आणि प्रक्रियेतून जे तंत्रज्ञान जन्माला आले, दळणवळण वाढले त्यामुळे 'स्थानिक' पातळीवर जगणाऱ्या संस्कृती व त्यांची विशिष्टता नष्ट होऊन हे सर्व समाज हे या औद्योगिक समाजामध्ये सामील होणे अपरिहार्य आहे. यातूनच आधुनिक संस्कृती, समानता, लोकशाही, मानवी हक्क या कल्पना रुजून जागतिक पातळीवर एकसंधपणा येण्याच्या प्रक्रियेला गती मिळेल असा आधुनिकतावादाचा सर्वसाधारण समज आहे.

या दोन्ही कल्पनांना संरचनोत्तर व आधुनिकोत्तर या दोन्ही विचारप्रवाहांचा तीव्र विरोध आहे. संरचनावादाच्या विरोधात मुख्य आक्षेप आहे की स्थूल पातळीवरील या सिद्धांताची मांडणी आणि एका विशाल ऐतिहासिक कालखंडातील बदलांचे अन्वयार्थ लावण्याचे प्रयत्न चुकीचे आहेत. यामध्ये फार मोठ्या प्रमाणावर ॲबस्ट्रॅक्शन केले जाते आणि कितीतरी सूक्ष्म तपशील, परिस्थितीची विशेषता याकडे दुर्लक्ष होऊन खऱ्या वास्तवाचा वेध घेतला जातो असे नाही. आणि तरीही आपल्याला सत्य सापडले आहे असा आव आणला जातो. त्यामुळे ही विचारपद्धतीच आम्हाला मान्य नाही. ही अतिविशाल पातळीवरील नॅरेटिव्हज् (संहिता) आताच्या वास्तवाला लागू करुन काही अर्थ लावणे आम्हाला पसंत नाही.

मुख्य मुद्दा आहे तो हा की, उपसंरचना या काही एका प्रमाणात स्वायत्त असतात. त्यांच्यात बदल होत असतात, होऊ शकतात हे या स्थूल सिद्धांतामध्ये नाकारले जाते. सतत मोठ्या संरचनेच्या संदर्भातच विचार केला जातो. शिवाय हे बदल एका दिशेने होत आहेत, उत्क्रांतीपद्धतीने होत आहेत असे मानले जाते. खरे वास्तव व्यामिश्र असते आणि एकाच वेळी बदलाच्या एकमेकांच्या विरोधी दिशेने जाणाऱ्या प्रक्रिया घडत असतात. संरचनावादी विचारवंतांच्या नजरेतून हे सर्व सुटून जाते कारण त्यांनी काही संकल्पनांची झापडे लावलेली असतात.

आधुनिकोत्तर विचारप्रवाहाचेही म्हणणे काहीसे असेच आहे की, आम्ही आधुनिकता या संकल्पनेच्या पलीकडे जाऊन विचार करु इच्छितो. या दोन्ही संकल्पनांचा फार मोठा परिणाम एकूणच सर्व वैचारिक विश्वावर होता. त्याच्या विरोधात या संकल्पनांच्या चौकटी तोडून मोडून काहीतरी वेगळे मांडण्याचा आणि जीवनातील व्यामिश्रता दाखविण्याचा या स्त्रीवाद्यांचा प्रयत्न आहे. आणि बंडाच्या धुंदीमध्ये दुसऱ्या टोकाला जाऊन त्या मुख्य प्रवाहाला - अर्थात हा ही तशा अर्थाने मुख्य नाहीच - भांडवली, उदारमतवादाच्या विरोधात पण तरी त्या उत्क्रांतीवादाच्या मुशीतून निघालेला - उलटजबाब करु इच्छितात.

औद्योगिकरणाचा प्रभाव सर्व जगावर पडत आहे आणि सध्याच्या वरुन लादल्या जाणाऱ्या जागतिकीकरणाच्या प्रभावाखाली तर तो वाढतच जाणार आहे हे सर्वश्रुत आहे. परंतु या 'आधुनिक' संस्कृतीची सर्व मूल्ये मान्य करणे व आधुनिकीकरण अपरिहार्य आहे, त्यातूनच एकसंध जगाची उभारणी होईल हे 'दर्शन' आधुनिकोत्तर स्त्रीवाद्यांना चुकीचे वाटते. 'आधुनिकता' संकल्पना ही आत्यंतिक व्यक्तिवाद, विशेषतः बाजारपेठेतील ग्राहकवाद, निवडीचे स्वातंत्र्य व स्पर्धा या निकषांवर आधारित आहे. तेव्हा एका अर्थाने या संकल्पनेला आव्हान देणे आवश्यक आहे. परंतु त्याहीपेक्षा या स्त्रीवाद्यांचा भर विविधता जपण्यावर आहे. एकसंधता, एकवाक्यता वगैरे संकल्पनांतून व्यक्तीचे, समाजाचे, गटांचे स्वातंत्र्य मारले जाऊन त्यांना एका मुशीत घातले जाण्याची प्रक्रिया घडते आणि जे अशा शिस्तीला नकार देतात ते बाजूला फेकले जातात. तसेच यातून कोणते सामाजिक संकेत चांगले, कोणते वाईट अशा प्रकारच्या श्रेष्ठ, कनिष्ठ कल्पना जोपासल्या जातात ज्या संरचनावादाच्या कल्पनेमध्ये स्वीकारल्या गेल्या आहेत. तेव्हा कोणतेही मूल्यमापनाचे निकष न वापरता विविध संस्कृतींचा स्वीकार करणे हे स्त्रीवाद्यांचे कर्तव्य आहे असे या स्त्रीवादी आग्रहपूर्वक मांडतात.

या टोकाच्या भूमिकेत एक गोष्ट विसरली जाते की आज अनेक समाज व त्यांच्या संस्कृती या कालौघात घडलेल्या आहेत आणि त्यांच्या अंतर्गतही पुरुषसत्तांचा उदय झालेला आहे. सर्व संस्कृती व समाज समान पातळीवर आहेत, श्रेष्ठ, कनिष्ठ असा भेद नाही किंवा प्रगत अप्रगत असाही ऐतिहासिक संरचनात्मक विचार चुकीचा आहे हे मान्य केले तरी त्या समाजातील स्त्रियांनाही आपले मत मांडण्याची संधी मिळाली पाहिजे हे तितकेच खरे आहे. आदिवासी समाजांच्या आधुनिकीकरणासाठी बळाचा वापर करणे जसे चुकीचे आहे, तसेच त्यांना त्यांची संस्कृती जपू द्या म्हणत आधुनिकीकरणाच्या संधी नाकारणेही चुकीचे आहे.

**शोषित/बळी विरुद्ध स्वायत्त, जागृत अस्तित्व, कर्तेपण**

स्थूल सिद्धांताच्या परिप्रेक्ष्यामध्ये स्त्रिया दलित







आणि इतर सीमान्तीकरण झालेले समाज या सर्वांचे चित्रण सहानुभूतीपूर्वक परंतु शोषणाचे बळी या तऱ्हेने रंगविले जाते. विशेषत: मार्क्सवादी सिद्धांतामध्ये कामगारवर्ग हा वर्गसंघर्षाचा नेता मानला जातो आणि त्याला स्वायत्त, जागृत अस्तित्व असल्याची संकल्पना मान्य झाली आहे. परंतु केवळ उत्पादन व्यवस्थेचा विचार झाल्याने त्यामध्ये ज्यांचा समावेश आहे असे कृतिशील गट हे जाणिवेच्या कक्षेत आणले गेले आहेत. परंतु बाकी सर्व गट आणि मुख्यत: स्त्रिया या केवळ शोषण स्वीकारणाऱ्या आणि दुसऱ्या कोणाच्या तरी हस्तक्षेपामुळे मुक्ती होईल अशी आशा बाळगणाऱ्या अशा रीतीने अभिव्यक्त होतात. ऐतिहासिक कालापासून विचार केला आणि स्त्रियांना दुय्यम स्थान मिळाले असे जरी मान्य केले तरी त्या केवळ प्रेक्षक किंवा अन्याय झेलणाऱ्या नव्हत्या. काही प्रमाणात विरोध झाला असण्याची शक्यता, आणि काही प्रमाणात जाणीवपूर्वक एखादी व्यवस्था मान्य करून पुढे जाणे असे घडले असावे या गृहीततत्त्वाने इतिहासाची तपासणी आणि आजही स्त्रियांवरील अन्यायाचे मुद्दे उठविताना त्यांचा आवाज त्यात समाविष्ट आहे ना याची काळजी घेत पुढे जाणे आवश्यक आहे. स्त्रीचे स्वायत्त, जागृत अस्तित्व मान्य करूनच वास्तवतेचे विश्लेषण झाले पाहिजे. एकदा ही स्वायत्त जागृततेची भूमिका मान्य केली की हेही मान्य करावे लागते की बळी असलेली स्त्रीही जेव्हा संधी मिळते तेव्हा वर्चस्व गाजवायचा प्रयत्न करते. एका अर्थाने वंचिततेमुळे तिला इतरांचे दु:ख समजण्याची शक्यता आहे असे मान्य केले तरी ती सद्य परिस्थितीमध्ये पुरुषी विचारसरणीची गुलाम आहे.

### संस्थात्मक लोकशाही विरुद्ध सहभागी लोकशाही (अनार्किझम)

शासनसंस्थेची गरज ही दोन गोष्टीसाठी असते. उच्च वर्ग, वर्णीय लोकांची सत्ता टिकावी व त्यांना मिळणाऱ्या लाभाचा ओघ सतत चालू रहावा. खाजगी संपत्ती व नफा यांचे राज्य चालू रहावे आणि इतरही कारभार केला जावा, यासाठी शासन यंत्रणेची रूपे बदलतात पण गाभा तोच असतो. संस्थात्मक लोकशाही पद्धतीने फक्त सर्वांना वाटाघाटी करून आपल्या पदरात लाभ पाडून घेण्यासाठी एक व्यासपीठ मिळते. बहुतेक सर्व ठिकाणी ही लोकशाही प्रातिनिधीक पद्धतीनेच चालविली जाते. या पद्धतीमध्ये सहभागी होण्याच्या पक्षांची अंतर्गत रचना सुद्धा अप्रत्यक्ष लोकशाहीचीच असते. एखाद्या विषयावर पक्षाची भूमिका सांगण्यासाठी एका पदाची व व्यक्तीची निवड केलेली असते. इतरांनी सार्वजनिकरित्या पक्षाची भूमिका मांडू नये अशी शिस्त असते. यातूनच काही पदांच्या हातात व नेत्यांचा हातात सत्ता एकवटली जाते.

अनेक स्त्रीवाद्यांचा अशा पद्धतीच्या राजकीय सहभागाला विरोध असतो. प्रत्यक्ष सहभागी पद्धतीने शक्यतो निर्णय घेतले जावेत आणि सत्ता काही लोकांच्या हातात एकवटण्याच्या प्रक्रियेला खीळ बसावी हा उद्देश त्यामध्ये आहे. त्यामुळे पक्ष न म्हणता अतिशय सैलसर गट, सहभागी गट पद्धतीने राजकारण करण्यावर अनेक स्वायत्त स्त्रीवादीगट भर देतात. त्या त्या विषयावर चर्चा करुन त्या त्या वेळी तीन ते चार संवाददाती व्यक्ती नेमून त्यांनी सार्वजनिक घोषणा करणे, प्रेस कॉन्फरन्स घेणे किंवा काही वाटाघाटींसाठी भेटायला जाणे अशा तऱ्हेने कामाचे स्वरुप ठरविले जाते. संघटना चिरेबंदी न होता अधिक मुक्त आणि प्रवाही रहावी यासाठी असे प्रयत्न असतात. मात्र यामध्ये 'अनर्किझम' या राजकीय प्रवृत्तीचे काही घटक आहेत आणि त्यामुळे शिस्त न राहता गोंधळ निर्माण होतो असे मुख्य प्रवाहातील स्त्रीवाद्यांना वाटत असते. शिवाय सातत्य राहत नाही कारण अनेक स्त्रीवादी एकाचवेळी समांतर पद्धतीने कार्यशील असल्यामुळे भूमिका तर्कशुद्धपणे विकसित होत नाही. काहीवेळा वेगवेगळ्या विषयांबाबत विरोधी भूमिका त्या त्या वेळी जो स्त्रीवाद त्या गटामध्ये प्रभावी असेल त्यानुसार घेतल्याचे आढळते. सध्या भारतामधील स्वायत्त स्त्री चळवळ ही काहीशी या विचारधारेच्या आधारे चालविलेली आढळते.

### समारोप

अनेकांना ही विभागलेली स्त्रीमुक्ती चळवळ पाहून दु:ख होते. मला स्वत:ला वाटते की, आजच्या जगामध्ये सर्व प्रकारचे विचारप्रवाह आणि सर्व चळवळी या काहीशा चाचपडतच पुढे जात आहेत, जाणार आहेत. १९९० च्या आधी, रशियातील समाजवादाचा पाडाव होण्यापूर्वी परिस्थिती वेगळी होती. भांडवलशाही विरुद्ध समाजवाद असे ध्रुवीकरण उपलब्ध होते. रशिया व चीनमधील समाजवाद चुकीच्या मार्गाने चालला आहे, परंतु तो दुरुस्त करता येईल, एका पक्षाच्या अधिपत्याखालील समाजवाद, स्टेटीझम (राज्यवाद) काढून टाकून खालून वर जाणारा, सर्वांचे आवाज ऐकणारा समाजवाद आपण आणू शकू असे अनेकांना वाटत होते.




एवढेच नव्हे तर रशिया व पूर्व जर्मनीमध्ये मोडतोड चालू असतानाही अशी आशा होती की तेथे समाजवादी मूल्ये मुरलेली राहतील. 'नागरी गट' तयार होतील आणि सर्व लोक बाजारपेठेला विकले जाणार नाहीत परंतु तसे न होता तेथे गुन्हेगारी वाढली आणि भांडवलशाहीचे भ्रष्ट रूप संस्थापित झाले. एका फार मोठ्या मंथनातून सर्व जग ढवळून निघत आहे आणि सर्वचजण भांबावून गेले आहेत. बाजारपेठेच्या जोशपूर्ण लाटेमध्ये सर्व लोक ओढले जात आहेत.

भारतातील स्त्रियांमध्ये तर फार मोठे स्तरीकरण झाले आहे. मध्यम व उच्च मध्यमवर्गीय स्त्रिया चंगळवाद आणि करिअरिझमच्या आधीन होत आहेत. आर्थिक स्वातंत्र्याच्या घोषणा स्त्रीमुक्ती चळवळीनेच दिल्या होत्या. आमच्या मुली, सुना म्हणतात की, "आम्ही चळवळीच्या सूत्रांनुसार वागतो आहोत." मात्र आज या आर्थिक स्वातंत्र्यातून चंगळवाद फोफावतो आहे. चळवळीने व्यक्तिवादाला छेद दिला होता. निर्णय गटाने घ्यायचे, पुढारीपण लाटायचे नाही, प्रसिद्धीच्या झोतात जायचे नाही, पुरुषी पद्धतीच्या स्पर्धेत उतरायचे नाही, वगैरे अनेक निकष पाळीत चळवळीची ३० वर्षे पार पडली आहेत. मात्र आता जाणवत आहे की दुसरी फळी मोठ्या प्रमाणावर तयार झालेली नाही. बुद्धिकाम करणाऱ्या स्त्रिया स्वयंसेवी पद्धतीने काम करायला चळवळीत येत नाहीत. दुसरीकडे तळागाळामध्ये मात्र बऱ्याच स्त्रिया बाहेर पडू लागल्या आहेत. त्यांच्यातून कोणत्या प्रकारचे नेतृत्व तयार होते बघायचे आहे. सध्या त्यांच्यापुढेही गाजरे पुष्कळ आहेत. राजकारणामध्ये प्रतिनिधित्व करणे व सत्तेत सहभागी होणे हे लोकसंख्येच्या बळावर त्यांनाच करता येणार आहे. तेथे स्त्रीवादाला आणि लोकशाही मूल्यांना घट्ट धरून राहण्याचे बळ किती जणींना मिळणार आहे हे पाहायचे. वंचितांचे राजकारण आजपर्यंत तरी संधीसाधूपणाचे राहिले आहे. सवर्णांनी आजपर्यंत पैसे खाल्ले, तुंबड्या भरल्या. आता आमची पाळी, अशी विचारसरणी अंगिकारली गेली तर हेची फळ काय मम तपाला असे म्हणायची वेळ आजपर्यंत चळवळ जोपासायला मदत करणाऱ्या कार्यकर्त्यांवर येईल. कदाचित हीही लाट ओसरेल आणि अधिक उज्ज्वल उद्यासाठी न्याय व चिरंजिवी पर्यावरणीय प्रणालीवर आधारित समाज निर्माण होईल अशी आशा करूया. ('विचारवेध' च्या सौजन्याने.)



## मोलकरणींना सन्मान देणारा कायदा हवा

राज्यातील घरेलू मोलकरणींना सर्वसामान्यांप्रमाणे सन्मानाने जगता यावे यासाठी त्यांच्या भवितव्याची काळजी घेणारा एक सर्वंकष कायदा करण्यासाठी येत्या सहा महिन्याच्या आत राज्याच्या विधिमंडळात विधेयक आणून दीर्घकाळ उपेक्षेच्या गर्तेत अडकलेल्या या घटकाला न्याय देण्यासाठी सर्वतोपरी प्रयत्न केले जातील, असे आश्वासन राज्याचे उपमुख्यमंत्री आर. आर. पाटील यांनी येथे मोलकरणींच्या राज्यव्यापी अधिवेशनात बोलताना दिले.

आयटकच्या वतीने राजर्षी शाहू खासबाग मैदानात 'क्रांतिज्योती सावित्रीबाई फुले नगरात' घरेलू मोलकरणींचे राज्यव्यापी अधिवेशन आयोजित करण्यात आले होते. राज्यातील २२ जिल्ह्यांतून सुमारे ५ हजाराहून अधिक प्रतिनिधी उपस्थित असलेल्या या अधिवेशनाचे उद्‌घाटन उपमुख्यमंत्री आर. आर. पाटील यांच्या हस्ते सोमवारी समारंभपूर्वक करण्यात आले. यावेळी प्रमुख पाहुणे म्हणून बोलताना आर. आर. पाटील यांनी हे आश्वासन दिले. शालेय शिक्षणमंत्री हसन मुश्रीफ, आयटकचे राज्य शाखेचे सचिव सुकुमार दामले, राज्य मोलकरीण संघटनेच्या अध्यक्ष कॉ. सुशीला यादव, कॉ. रघुनाथ कांबळे यांच्या प्रमुख उपस्थितीत या अधिवेशनाला प्रारंभ झाला. अध्यक्षस्थानी ज्येष्ठ कामगार नेते कॉ. गोविंद पानसरे होते. अधिवेशनापूर्वी कोल्हापुरात टाऊन हॉल येथून शहराच्या प्रमुख मार्गावरून मोलकरणींची भव्य शोभायात्रा काढण्यात आली होती.

आर. आर. पाटील म्हणाले, शासनाची कुवत असो अथवा नसो अनेक वेळेला राज्यकर्त्यांना संघटनात्मक सामर्थ्यापुढे वाकून पाचवा वेतन आयोग मान्य करावा लागतो आणि सहाव्या वेतन आयोगासाठी विचार करू असे आश्वासनही देणे भाग पडते. तथापि ज्यांना कोणतीच सेवेची शाश्वती नाही अथवा ज्यांच्या श्रमांनाही तुलनेने किंमत दिली जात नाही अशा असंघटित कामगारांच्या एका नव्या समूहाकडे शासनाचे लक्ष वेधण्याचे काम भारतीय कम्युनिस्ट पक्षाने केले आहे.

(पृष्ठ क्र. ५५ वर)

# स्त्रिया - बळी अंधश्रद्धेच्या !
## डॉ० नरेंद्र दाभोलकर

'जादूटोणा व अघोरी आणि अनिष्ट प्रथा यांचे समूळ उच्चाटन अधिनियम २००५' हा भारतातील अंधश्रद्धा विरोधी पहिला कायदा. हा लेख लिहिताना हा कायदा अर्धवट वाटचालीत आहे. विधानसभेने तो मंजूर केला आहे. विधानपरिषदेत तो दाखल झाला आहे. अंक वाचकाच्या हाती पडेल तोपर्यंत तो विधानपरिषदेतही मंजूर झाला असेल, अशी आशा करूया.

या अनुषंगानं विद्याताईंचं पत्र मला आलं. त्यात 'अंधश्रद्धा विरोधी कायद्याचं स्त्रियांच्या संदर्भातलं महत्त्व स्पष्ट करणारा लेख लिहावा' अशी सूचना होती. याबरोबरच काही अनुभव सांगत मुद्दा स्पष्ट करावा असेही त्यांनी कळवले होते. यामुळे हा लेख 'महिला व अंधश्रद्धा निर्मूलन' व्यापक मांडणी करणारा असा नाही. काही अनुभव, त्यातून स्पष्ट झालेली कायद्याची गरज हाच मांडणीतील गाभ्याचा भाग आहे. परंतु माझ्या मते त्या घटनांची खरी दाहकता, त्यामुळे कायदा करण्यास चालना मिळावी यात नाही. कायद्यातून या शोषणाला मूठमाती मिळेल असाही दावा नाही. हे जीवघेणे अनुभव घेण्यासाठी, जे वास्तव स्त्रीला त्या शोषणाकडे ढकलते त्या बाबी बदलण्यासाठी एक समग्र विचार व सम्यक परिवर्तनच हवे आहे याची पूर्ण जाणीव आहे. मात्र लेखाच्या मर्यादेत यावर भाष्य करणे टाळले आहे.

### १

उषा बाजीराव रेपाळे. नवऱ्याची दुसरी पत्नी. पहिलीला मूल होत नाही, म्हणून दुसरी केली. मात्र उषाची कूस उजवली नाहीच. नवऱ्याची तपासणी करण्याचा प्रश्नच नव्हता. नगर जिल्ह्यातल्या पारनेर तालुक्यातील मालचौंडीच्या डोहात निपुत्रिक स्त्रीने स्नान केले तर तिला हमखास मूल होते असा बोलबाला. स्वतःच्या आईवडिलांसह, पतीसह उषा डोहाकडे गेली. स्नानासाठी उतरताना तिने सर्वांना सांगितले. 'मी सात दिवस डोहातच उपासना करणार. सातव्या दिवशी तुम्ही खण, नारळ, साडी घेऊन या.' डोहात शिरलेली उषा जोरदार प्रवाहात सापडली. तळापर्यंत जाऊन वर आली. डोहाच्या कडेला तिचे पालथे फुगीर पडलेले शरीर स्थिरावले. उषाची सात दिवसांची तपश्चर्या सुरू झाली आणि आता सातव्या दिवशी ती निश्चितपणे सदेह अवतरणार यामुळे स्नानाला यात्रेचे रूप आले. नवस बोलले जाऊ लागले. पोलिसांनी हस्तक्षेपास नकार दिला. शेवटी चळवळीची धमकी समितीने दिल्यावर पाचव्या दिवशी मृतदेह बाहेर निघाला.

### २

गुजरात राज्यातील भावनगर जिल्ह्यातील तळजा येथील पार्वती माँ. तिला विलक्षण वर प्राप्त झाला. एक लाख निपुत्रिक जोडप्यांना संतती प्राप्त करून देण्याचे सामर्थ्य तिच्या आशीर्वादात आले. निपुत्रिक स्त्रीच्या पोटावरुन माँचा हात फिरला, 'सुखशांती... बालकाशांती' असे शब्द उमटले, खडी-साखर, दूध, वेलची याचा प्रसाद प्राशन केला की बाळराजा तुमच्या घरी रांगायला येणार याची खात्री बाळगायला काहीच हरकत नाही. दैवी प्रभाव एवढा जबर की कुमारिका आणि विधवा यांनी चुकून त्या दिशेला फिरकूही नये. न जाणो पार्वती माँचे शब्द कानावर गेले तरी त्यांना दिवस जायचे.

महाराष्ट्रातील कोणत्याही जिल्ह्यातील खेडोपाडी चौकशी करा, पार्वती माँकडे जाऊन आलेली जोडपी तुम्हाला नक्की आढळतील. खच्चून गाडी भरून, प्रचंड लांबचा प्रवास ठिकठिकाणच्या वाहन चालकांनी इतका दिवस केला की त्या गाड्यांना झालेल्या अपघातातील मृतांच्या संख्येने शंभराचा आकडा गाठला!

पार्वती माँ तीन सूचना अतिशय आग्रहपूर्वक द्यावयाची.

अ. आशीर्वाद घेऊन गेल्यावर दिवस जाणारच, तेव्हा परतल्यापासून दिवस गेल्यासारखे वागायला लागायचे.

ब. प्रसूती होईपर्यंत गरोदरपणात कोणालाही

दाखवायचे नाही, उपचार करून घेणे तर दूरच. तपासणी केल्यास गर्भपात नक्की. अन्य आजारासाठीही पोटात औषध घ्यावयाचे नाही.

क. तीन पहिन्यात पाळी आल्यास उपचारासाठी परत यावयाचे.

संतती होण्याची उत्कट इच्छा ज्यावेळी स्त्रीच्या मनाचा ताबा घेते त्यावेळी गर्भ न राहताच गर्भधारणा झाल्यासारखी लक्षणे निर्माण होतात. याला सूडोसायसिस (गर्भधारणेची खोटी लक्षणे) म्हणतात. निपुत्रिक स्त्रीने पार्वती माँचा आशीर्वाद घेतल्यावर या तीव्र इच्छेला गाढ (अंध)श्रद्धेची जोड मिळे. गर्भधारणेच्या (असत्य) होकारात्मक सूचना संबंधित महिलेचे मन स्वीकारी आणि गरोदर स्त्रीसारखे तिचे वर्तन बने. इतरांचाही विश्वास बसे. सोनोग्राफी करुन गर्भाच्या अस्तित्वाची खात्री करणे सहज शक्य पण पार्वती माँची दुसरी सूचना ढालीप्रमाणे थोतांडाचा अनेक महिने बचाव करी. अखेर निसर्गनियमाने काही महिन्यांनंतर पाळी येईच. अनेक महिने तटलेली पाळी आल्यावर अंगावर रक्तस्त्राव जास्त होई. गाठी पडत. गर्भ राहिला होता पण नशिबात मूल नव्हते. गर्भपात झाला; पण आपण वांझ नाही अशा मानसिकतेला जन्म दिला जाई. आशीर्वादानंतरही तीन महिने पाळी चालूच राहिली तर परत पार्वती माँ. परत आशीर्वाद. असे चार-पाच हेलपाटे. कधीतरी सूचना काम करे. नाहीतर हेलपाटे घालून दमछाक होऊन स्वतःच्या नशिबाला दोष देत जोडपे थांबे. या बाईच्या विरोधात तक्रार नोंदवणारी अनेक पत्रे आली. एका डॉक्टरने लिहिले, विषमज्वराच्या (टायफाइड) तापाने फणफणलेल्या बाईला पोटातले औषध व इंजेक्शन घ्यावयास मी पटवू शकलो नाही. ती चार महिन्यांपूर्वी पार्वती माँकडे जाऊन आली होती. पाळी तटली होती. कसल्याही परिस्थितीत पोटात औषध घेण्याची तिची तयारी नव्हती. ते जोडपे चक्क परत गेले. बाई दगावली. नाशिकच्या एका बाईची पाळी पार्वती माँ मुळे अशीच चांगली दहा महिने तटली. थकवा, चक्कर, आजारपण चालू, पण औषधाला नकार. शेवटी जिवाशी आल्यावर हॉस्पिटलला न्यावे लागले. लक्षात आले की बाईची सर्व लक्षणे, पाळी तटणे याचे कारण आहे ॲनिमिया, अंगात रक्त कमी होणे. दहा महिन्यांपूर्वी आली असती तर साध्या लोहवर्धक गोळ्यांनी भागले असते. आता पाण्यासारखा पैसा, वर पाच बाटल्या रक्त लागले. गर्भाशयाच्या गाठीला (फायब्राईड) वाढता गर्भ समजून एक बाई तब्बल वर्षभर घरी बसली.

पार्वती माँच्या विरोधात मी जिल्ह्याजिल्ह्यात व्याख्याने दिली. गृहमंत्री गोपीनाथ मुंडे यांच्यावर तारांचा पाऊस पडला. भावनगरच्या जिल्हा पोलिसप्रमुखाला लिहिले. परिणामकारक कायद्याच्या अभावी फसवणूक, शोषण चालूच राहिले. वृद्धापकाळाने अचानकपणे पार्वती माँ कैलासवासी झाली आणि अंधश्रद्धेचे ग्रहण सुटले.

३

दिवस - प्रजासत्ताक दिन. जिल्हा नांदेड. दत्तू कोतवाल हा गावचा कोतवाल. भानामती करतो म्हणून गावकऱ्यांनी बेदम मारहाण केली. दुसऱ्या दिवशी सकाळी याचे प्रेत शेतातल्या झाडाच्या फांदीला टांगलेले मिळाले. घटना घडली त्याचा क्रम असा. धोंडीपरगा हे उद्‌गीर तालुक्यातील गाव. तेथे बसवराज पाटील राहतो. त्याचा लौकिक असा की तो भानामती दुरुस्त करतो. त्याचे वैशिष्ट्य म्हणजे तो मौन धारण करतो. पाटीवर लिहून दाखवतो की भानामती गावात कोणी केली, याची माहिती आपोआप कोणाच्या तोंडून येईल. याला म्हणतात चेतावणी देणे. २६ जानेवारीच्या आधी काही दिवस बसवराज पाटील यांनी पाटीवर लिहून दाखवले की कमलाबाई मानेच्या अंगात चेतावणी येईल. आणि काय आश्चर्य त्यानंतर दहा मिनिटांतच कमलाबाईंच्या अंगात आले. त्यानंत पुन्हा दोन दिवसांत तिच्या अंगात आले. गावात भानामती करणाऱ्यांची नावे तिने संचार (!) अवस्थेत सांगितली. त्यातले मुख्य नाव दत्तू कोतवालाचे. कमलाबाईंच्या अंगात येण्यामुळे दत्तूच्या गुन्ह्यावर जणू शिक्कामोर्तबच झाले. त्याला जीव गमवावा लागला. या कमलाबाईंना घटनेनंतर चार दिवसांनी मी भेटलो. आपल्या संपूर्ण कुटुंबाला आणि गावातील बारा आणे लोकांना छळणारी भानामती दत्तू कोतवालामुळेच घडत होती याबद्दल तिला पक्की खात्री होती. तिच्या म्हणण्याप्रमाणे त्याने एक बाहुली स्वतःकडे ठेवली होती आणि दुसरी कमलाबाईंच्या पोटात. तिकडच्या बाहुलीवर मंत्र घातला की इकडे हिच्या पोटात गडाबडा लोळण्याएवढे दुखू लागे. कमलाबाई असे बरेच काही बडबडली. तिची सारी साक्ष म्हणजे मानसिक रोगाचे जितेजागते चित्र होते. मात्र आपल्या आजारी

मानसिकतेला (इतर अनेक बायकांप्रमाणेच) ती स्वतःवर झालेल्या भानामतीचा भाग समजत होती. मनोरुग्ण अवस्थेत काही सूचना घेऊन तिने केलेली बडबड ही तिला संचार अवस्थेतील 'दैवीवाणी' वाटत होती. खरी भयानकता ही की, यावर गावातील बहुसंख्यांचा विश्वास होता. ग्रामीण मराठवाड्यातील विशेषत: लातूर, नांदेड, परभणी, हिंगोली, बीड या जिल्ह्यात भानामतीची ही कहाणी दहा-पंधरा वर्षांपूर्वी जोरात होती. महाराष्ट्र अंनिसच्या अथक प्रयत्नातून आता फरक पडला आहे. तरीही बरेच काही करणे बाकी आहे.

मौजे सताळ धानोरा, ता. अहमदपूर, जि. लातूर या गावी काही वर्षांपूर्वी ३५ घरांतील ३५ बायकांना भानामती व्हायची. त्या अवस्थेत घुमणे, लोळणे, किंचाळणे, भुंकणे चालायचे. सगळ्या बायका घुमताना गावातील दोन दलित व्यक्तींचे आणि एका यल्लमाच्या भक्ताचे नाव घ्यायचे. त्या यल्लमाच्या बाईला लोकांनी एवढे मारले की तिचा चेहरा ओळखू येईना. दोन दलितांवर केवळ ॲट्रासिटीच्या कायद्यातील कडक तरतुदीमुळे हल्ला होत नव्हता. पोलिस स्टेशनसह सर्व गाव तणावाखाली. 'अंनिस'ला हस्तक्षेपाची लेखी विनंती झाली. 'अंनिस' च्या उपाययोजनेने गाव भानामतीमुक्त झाले.

भानामती हा शंभर टक्के स्त्रियांचा आजार. अंधश्रद्धेशी पक्का जखडलेला. तीन प्रकारचा. (अ) व्यक्तीला तीव्र मानसिक आजार. वेडेवाकडे हातवारे, स्वतःशीच बडबडणे, हसणे, निरनिराळे आवाजांचे, आकृतीचे भास. या गंभीर मनोविकृतीला संबंधित व्यक्तींवर भानामती केली गेली असे मानले जाते. सुया, हुस्या हा खास मराठवाडी ग्रामीण शब्द. स्त्रियांच्या छातीत, पोटांत सुया टोचल्यासारख्या वेदना होतात. खरे तर रुग्णाचे अंतर्मन मनोव्यथांचे रूपांतर शारीरिक वेदनांत घडवून आणते. पण करणी करणारा मांत्रिक आपल्या जवळील बाहुल्यांमध्ये सुया टोचून वेदना निर्माण करतो, असा लोकांचा समज असतो. ही लक्षणे भानामतीची मानली जातात. भुंकणारी भानामती हा आणखी एक प्रकार. जोरजोराने विशिष्ट लयीत संबंधित स्त्री कण्हते. विशिष्ट आवाज काढते. त्याला भानामती भुंकणे समजले जाते. हे प्रकार ग्रामीण, अशिक्षित, गरीब महिलांत अधिक प्रमाणात, कधी गटागटानेही चालतात. (ब) आपोआप घरावर दगड पडणे, डोळ्यांतून खडे-काचा निघणे, स्त्रीच्या अंगावर बिब्यांच्या फुल्या उठणे या स्वरूपाची भानामती घडविणारी व्यक्ती बहुसंख्य वेळा स्त्री असते. (क) स्त्रियांच्या अंगावर पांढरे जाणे, पोटाचा टी.बी. अल्सर, त्वचा आजार या दीर्घ व सातत्याने उपचाराची गरज असलेल्या आजारात तसा उपचार घेण्याऐवजी बाहेरच्या बाधेची ही लक्षणे मानली जातात. दीर्घ आजाराने मानसिक ताणही निर्माण होतो. लोळणे-घुमणे या स्वरूपातही त्याची अभिव्यक्ती होते. या सर्वाला भानामतीच मानले जाते.

गावात भानामतीने भीतीग्रस्त वातावरण तयार होते. हा मानसिक व काही वेळा त्याबरोबर शारीरिकही आजार आहे. तो मानसोपचार व औषधोपचारांनी बरा होऊ शकतो; सामाजिक कौटुंबिक वातावरणही बदलावे लागते याची काहीच माहिती गावकऱ्यांना नसते. ग्रामीण भागातील डॉक्टरही अनेकदा ही केस आमची नाही म्हणून रुग्णाची बोळवण करतात. गावाचा गैरसमज पक्का होतो. भानामतीग्रस्त महिलेला घेऊन तिचे कुटुंबीय भगत, देवऋषी यांच्या मागे लागतात. उपचार करणारा तांत्रिक-मांत्रिक रुग्णाला वेदना होईल अशी कृत्ये करतो. 'कोणी भानामती केली?' असा सवाल दरडावून विचारला जातो. वेदनांनी त्रस्त झालेली समज बेताचीच असलेली महिला कोणाचे तरी नाव सांगते. त्या इसमाला गावात राहणे मुश्कील होते.

५

डाकीण : आदिवासी बहुल जिल्ह्यात स्त्रियांच्या वाट्याला आलेला हा भोग आहे. गावात घडलेल्या कोणत्याही अनिष्ट घटनेस उदा. मूल आजारी पडणे, म्हशीचे दूध आटणे, अचानक आग लागणे, कोण जबाबदार याचा शोध चालू होतो. त्यासाठी भगताला गाठला जातो. तो नाव न घेता खाणाखुणा सांगतो. उदा. हे करणारी तुमच्या गावातील डाकीणबाई - रंगाने अशी आहे, तिला इतकी मुले, तिचे घर असे, घरासमोरची झाडे अशी वगैरे. गाव आपली अक्कल सामुदायिकपणे वापरून डाकीण कोण ते ठरवतात. तिच्यासह सगळे गाव पुन्हा त्या भगताकडे जाते. खर्च अर्थात त्या बाईचा. मांत्रिक तिच्या डोक्यावर, डोळ्यांत लिंबाचा रस घालतो. पायात साखळ्या बांधतो. तिला चालायला लावतो. साखळ्या गळून न पडल्या तर ती डाकीण असल्याचे सिद्ध होते. तिच्या मुलाबाळांची लग्ने होणे अशक्य बनते. तिला गाव सोडावेच



अनुक्रमणिका

लागते. अनेकदा जीवही जातो. एकट्या नंदूरबार जिल्ह्यात दरमहा अशा नोंद घेणाऱ्या घटना ३० ते ५०. वर्षाचा हिशोब करा. आणि असे दहा आदिवासी बहुल जिल्हे महाराष्ट्रातच आहेत.

६

बाईच्या अंगावर गाठ येते. करट वा टी.बी., कॅन्सर कशाचीही असू शकते. मांत्रिक म्हणतो ही 'मोठी आई' आहे. औषध बंद. 'मोड भरणे' हा कार्यक्रम सक्तीचा. पैशाचा चुराडाच पण जीवही धोक्यात जातो.

७

देवऋषी सांगतो - थोरल्या जावेचा संसार नीट चाललेला नाही. कारण धाकट्या जावेने तिच्यावर करणी केली आहे. हातापाया पडून हे नाकारणाऱ्या घाकट्या जावेच्या सत्यकथनाच्या खात्रीबद्दल तोडगा निघतो तो असा. देवऋषीच्या अंगात येते. तो संचार अवस्थेत 'देववाणी' उच्चारतो. 'धाकटी जाऊ खरे बोलत असेल तर तिने देवीच्या समोर उकळत्या तेलातले नाणे उचलावे.' चाचणीची सक्ती होते. हात सोलून निघतो. ही गोष्ट तीन वर्षापूर्वीची. पुरंदर तालुक्यातील कुटुंबाची. वरील सर्व बाबी संकल्पित कायद्याच्या कक्षेत बसतील काय? बसल्या तरी पुरावे मिळतील काय? पोलिस पैसे खाणार नाहीत याची खात्री काय? कायद्याने कोठे समाज बदलतो का? असे सर्व प्रश्न या अनुभवकथनानंतर उपस्थित केले जातील. ते रास्तच आहेत.

वरील उदाहरणातील डाकीण प्रथा, मोठी आई, अंगात संचार झाल्याचा दावा करून इजा होणारे अंधश्रद्ध सल्ले देणे अशा बाबी तर सध्याच्या संकल्पित कायद्यात थेटपणेच येतील. सध्या या बाबत कायदे नाहीत. थेट व स्पष्ट तर नाहीतच नाहीत. कडक तरतुदीही नाहीच. संकल्पित 'जादूटोणा व अघोरी आणि अनिष्ट प्रथा यांचे समूळ उच्चाटन अधिनियम २००५' या कायद्यात तरतुदी, थेट रोखठोक आहेत. श्रद्धा-अंधश्रद्धा या वादात प्रकरण न्यायलयात अडकून पडू नये यासाठी कायद्यातील तरतूद स्पष्ट आहे. अंधश्रद्धा म्हणजे कायद्याच्या परिशिष्ठात उल्लेख केलेल्या बाबी यामुळे एखादी बाब अंधश्रद्धा मानावी की नाही याचा प्रश्न पोलिसांना वा न्यायालयाला पडणार नाही. वर उल्लेखिलेल्या बाबी तर संकल्पित कायद्यात गुन्हेच ठरतील. पण भावनगरच्या पार्वती माँसारख्या बाबींनाही त्याचा उपयोग करता येणे शक्य आहे. दुसरे असेही आहे, की महिलांचे शोषण करणारी एखादी बाब या कायद्याच्या कक्षेत सध्या नाही असे लक्षात आले तर कायद्यात सुधारणा करून कायद्याच्या व्याख्येत म्हणजे परिशिष्ठात त्याचा समावेश करता येईल. हा कायदा दखलपात्र आहे. पोलिसांना तक्रारीची दखल घ्यावीच लागेल. तपास करावा लागेल. सहा महिने ते पाच वर्षांपर्यंत सक्तमजुरीची शिक्षा आहे. ५ ते ५० हजारांपर्यंत दंडाची तरतूद आहे. शिवाय कायद्याची निर्मिती हीच प्रतिबंधात्मकही ठरू शकते. कायद्याने अंधश्रद्धा जात नाहीत हे तर अगदी खरेच आहे. पण प्रबोधनाद्वारे जागृत होणाऱ्या जनशक्तीला दंडशक्तीची जोड मिळाली तर फायदा नक्कीच होतो. समितीच्या चळवळीची तेवढी कमाई आता झाली आहे.

सुरुवातीलाच लिहिल्याप्रमाणे पुरुषप्रधान समाजव्यवस्था. स्त्रीशोषणाच्या विविध बाजू, धर्माने याबाबत तयार केलेली मानसिकता अशा व्यापक परिप्रथांचा विचार न करता स्त्रिया व अंधश्रद्धा निर्मूलन या विषयाचा समग्रतेने विचार करता येणार नाही हे खरेच आहे; पण संकल्पित कायदा, अंधश्रद्धा आणि स्त्री याबाबत अंतर्मुख करायला हा लेख काही मुद्दे पुरवेल अशी आशा आहे.

('मिळून साऱ्याजणी'जानेवारी २००७ च्या सौजन्याने.)

▣ ▣ ▣

## सीता नहीं तो झाँसी की रानी

तब बहने कहती हैं कि "पुरुषों के पास तो तलवार होती है।" तो मैं कहता हूँ कि अगर वही आपकी कमी है, तो आप भी तलवार रख सकती हैं। जो हक पुरुषों को है, वह आपको भी होना चाहिए। अपने पास रिवाल्वर रखें। कोई आक्रमण करने आये तो उस पर गोली चलायें, लेकिन ऐसा मारें कि वह जख्मी हो जाय, मरे नहीं। मान लें यह ठीक से सधा नहीं और वह मर गया, तो भी कोई हर्ज नहीं। मेरी तरफ से स्त्रियों को पिस्तौल रखने का अधिकार दिया गया है। इस प्रकार जो पिस्तौल चलायेगी उसको मैं अहिंसक मानता हूँ। 'नायं हन्ति न हन्यते' - आत्मा न मरती है, न मारती है।

- विनोबा

('नारी की महिमा' से)






# संवाद
## विद्या बाळ



### संवाद १

तुळजापूरच्या परिषदेत जशी काही तज्ज्ञांची समर्पक मांडणी करणारी भाषणं झाली तशीच प्राध्यापकांनाही एक विशेष संधी देण्यात आली होती. 'आपापला विषय शिकवताना लिंगभाव संवेदनशीलता - (जेंडर सेन्सिटिव्हिटी) विद्यार्थ्यांपर्यंत पोचवण्याचा प्रयत्न कसा करता' या विषयावर प्राध्यापकांनी मांडणी करण्यासाठीचं एक सत्र होतं. या सत्रात स्त्रिया आणि पुरुष प्राध्यापकांचा सहभाग होता. इंग्रजी, समाजशास्त्र, गृहव्यवस्थापन शास्त्र यासारख्या विषयांच्या व्याख्यानातून स्त्रीपुरुषांकडे लिंगभेदाभेदाच्या पलीकडे नेणाऱ्या नजरेनी बघणारा दृष्टिकोन देण्याचा प्रयत्न प्राध्यापक करीत आहेत हे बघून आशेची मनातली लुकलुक बळावली. विशेषत: एका ज्येष्ठ प्राध्यापकांच्या बोलण्यातून, वर्गात अचानक पाळी सुरु होण्यासारखी अडचण उद्भवल्यावर ते कशी समजदारी दाखवतात हे ऐकून मला तर भरुनच आलं. प्राध्यापक पुरुषाला पाळीच्या काळातल्या अवस्थेची माहिती असणं, त्याबाबतची सजगता असणं आणि पुन्हा त्याबाबतची वागण्यातली समजदारी त्यांनी दाखवणं हे फार फार महत्त्वाचं आहेच. शिवाय ते त्यांनी परिषदेत मांडलं हे मला त्याहून विशेष वाटलं!

आंतरराष्ट्रीय महिला दिनाचा हा विशेषांक. आता हा दिवस बहुसंख्य स्त्रीपुरुषांपर्यंत दिवसेंदिवस अधिकाधिक पोचतो आहे. अशावेळी, आपण साऱ्याजणींनी एक निश्चय करुया? आपापल्या घरच्या भाकरपोळ्या, स्वयंपाक आणि इतर कामाची जबाबदारी आता आपण नियोजनपूर्वक जरा आटोपशीर करु या. त्याबाबतची जीवनशैली घरातल्या सगळ्यांच्या मदतीने बदलू या. सगळ्याच जणी थोड्या थोड्या लष्कराच्या भाकऱ्या भाजायला लागू या. नाटक, चित्रपट, शास्त्रीय संगीत, भावगीत यांच्या कार्यक्रमांबरोबरच अशा व्याख्यानांच्या, परिषदांच्या कार्यक्रमात सहभागी होऊ या. जे आपण वाचू, अभ्यासू शकत नाही ते या माध्यमातून थोडं ओळखीचं करुन घेऊ या. वेगवेगळ्या प्रकारच्या भाकऱ्या आधी चाखायला आणि मग भाजायला लागू या.

('मिळून साऱ्याजणी' मार्च २००२ च्या सौजन्याने.)



### संवाद २

कशी झाली दिवाळी? सर्व प्रकारचा आनंद आणि मजा साजरी केली? कुणाकुणाच्या आठवणी आल्या? कुणाकुणाच्या भेटीगाठी झाल्या? कुठले अंक वाचलेत? आपल्या अंकाविषयी बरंवाईट काय मनात आलं? कळवाल ना? तरच माझा हा संवाद, 'संवाद' वाटेल मला. नाहीतर नेहमीप्रमाणे हे आपलं माझं मी स्वतःच स्वतःशी केलेलं स्वगत! प्लीज कळवा! आपण एकमेकांशी बोलण्याची, न पटलेलंसुद्धा सांगण्याची आणि न पटलेलं सांगतानासुद्धा हात उगारण्याऐवजी, हातात हात घेण्याची फार फार गरज आहे आज. ताज्या, तरुण आणि सिनेमाच्या भाषेत बोलायचं तर गरज आहे 'गांधीगिरी' करण्याची!

तुमची सगळ्यांची चौकशी करता करता माझ्या मनात आणि डोळ्यांसमोरही आहे, नव्यानं अस्तित्वात आलेला कौटुंबिक हिंसाचाराच्या विरोधातला कायदा. त्याचा मसुदा केव्हाच तयार झाला होता. नॅशनल वुईमेन्स कमिशनचे सदस्य, अनेक खासदार, श्री. मिसर (महाराष्ट्र राज्याचे माजी पोलिस महासंचालक) यांच्यासारखे पोलिसांमधले अधिकारी, स्त्रीसंघटनांचे आणि मानवाधिकार समितीचे कार्यकर्ते, वकील... अशा अनेकांनी कायद्याच्या मसुद्यावर विचार/चर्चा/सूचना करुन झाल्यावर, आज आहे त्या स्वरुपात हा कायदा नुकताच अमलात आला आहे. त्यात अजूनही काही त्रुटी, मर्यादा आहेतच; तरीसुद्धा हा कायदा हे स्त्री-पुरुषांसाठी एक खूप मोठं काहीतरी 'घडणं' (हॅपनिंग) आहे.

मला माहीत आहे, हा कायदा स्त्रियांवर होणाऱ्या अत्याचारांचा बंदोबस्त करण्यासाठीचं एक साधन आहे. तरीसुद्धा मी विचारपूर्वक म्हटलं आहे की साऱ्या स्त्री-

अनुक्रमणिका

'पुरुषां'साठी ही एक महत्त्वाची घटना आहे. हे म्हणणं सगळ्यांनी, म्हणजेच स्त्रियांनी आणि पुरुषांनीसुद्धा समजून घेण्याची नितांत गरज आहे.

माझं म्हणणं मांडण्यापूर्वी मला हे स्पष्ट करायला हवं की मी वकील नाही. स्त्रियांच्या चळवळीमधली एक कार्यकर्ती आहे आणि म्हणूनच मी कायद्याच्या तपशीलात जाणार नाही. तो माझा अधिकार नाही आणि तरीपण या कायद्याच्या अनुषंगानं मला सर्व सुजनांना आणि दुर्जनांना-सुद्धा विश्वासात घेऊन काही बोलण्याची गरज वाटते. कायदा हा अनेकदा समाजात जी वस्तुस्थिती असते, तिच्यात जे अन्याय - अत्याचार घडत असतात, त्यांचा बंदोबस्त करण्यासाठी, अत्याचारांच्या बळींची काळजी घेत, त्यांना संरक्षण देण्यासाठी म्हणून अस्तित्वात येतो. एखादी घटना एखाद्या दिवशी घडली आणि दुसऱ्या दिवशी त्या संदर्भात लगेच कायदा झाला, अशी ही झटपट घडणारी गोष्ट नाही. वस्तुस्थितीचं निरीक्षण, त्यावरुन निघणारे निष्कर्ष, त्याची आकडेवारी यावरून वस्तुस्थितीचं एक निदान होतं. यासाठी काही वर्षांचा, कधी कधी काही पिढ्यांचा कालावधी जातो. त्यातून कायद्याची निकड स्पष्टपणे निर्माण होते. त्यानंतर कायद्याचा मसुदा, त्यावर चर्चा, नंतर तांत्रिक बाबींची पूर्तता आणि नंतर कायदा अस्तित्वात येतो!

हे थोडं विस्तारानं मांडण्याचं कारण इतकंच की कायदा करण्यामागे एक मोठी सामाजिक, सांस्कृतिक, कायदेशीर, तांत्रिक प्रक्रिया असते. स्त्रियांच्या चळवळी, कार्यकर्ते यांच्या, केवळ मोर्चा-घोषणा-निदर्शनं यांच्या दबावापोटी स्त्रियांसाठीचे कायदे होत नसतात. याची नोंद घेणं अत्यावश्यक आहे. उदा. ४९८ अ ही काही वर्षांपूर्वी कायद्यात दुरुस्ती झाली. त्यानुसार सासरी मानसिक, शारीरिक छळ सोसणाऱ्या विवाहितेला पोलिसात तक्रार नोंदविता येते. विशिष्ट दर्जाच्या पोलिस अधिकाऱ्याने या तक्रारीची व्यवस्थित चौकशी केल्यानंतर, त्याची खात्री पटली तर, या तक्रारीत, ज्यांच्या नावाविरुद्ध तक्रार आहे, त्यांना अटक केली जाते. हा कायदा नव्हता, तेव्हा अनेकदा, छळ भोगणाऱ्या स्त्रिया असह्य होऊन स्वत: जीव देऊन मोकळ्या व्हायच्या किंवा त्यांचा जीव घेतला जायचा. तेव्हा अशा छळाच्या बळी ठरणाऱ्या स्त्रियांना मरुन जाण्यापूर्वी, तक्रार नोंदविण्याची संधी मिळाली, म्हणून ४९८ अ या कलमाची कायद्यात भर घालण्यात आली आहे. यामध्ये स्त्रीची तक्रार आणि पोलिसतपास पूर्वीपेक्षा अधिक गांभीर्याने घेतला जाण्याची शक्यता वाढली. या तक्रारीमुळे सासरच्या माणसांना थेट अटक होऊ शकते, मग खटला चालू होतो. या कडकपणाविरुद्ध अनेक स्त्री-पुरुषांनी तक्रारी केल्या. या कायद्याचा स्त्रिया सर्रास दुरुपयोग करताहेत, खोट्याच तक्रारी नोंदवताहेत - असा बराच गदारोळ झाला आहे. काही ठिकाणी पुरुष हक्क संरक्षण समितीसारख्या संस्थांची स्थापना, त्यांच्या परिषदाही झाल्या आहेत. मी स्त्री चळवळीतली कार्यकर्ती आहे; पण म्हणून स्त्रियांच्या खोट्या आणि चुकीच्या अशा वर्तनाचं मी कधीच समर्थन केलं नाही, करणार नाही. मात्र इथं एवढंच अधोरेखित करून म्हणावंसं वाटतं की काही वेळा कायद्याचा गैरवापर झालाही असेल आणि झाला असेल तर ते निश्चितच क्षम्य नाही. प्रश्न एवढाच आहे, शेकडो वर्षांत, हजारो स्त्रिया केवळ 'दिल्या घरी मरेपर्यंत रहा' या संस्काराच्या दबावाखाली मेल्या; पण त्याबाबत 'ब्र' काढू शकल्या नाहीत. त्यांची दखल कुणी घेतली? त्यांच्या आकडेवारीचा शोध आणि शोक व्यक्त झाला?

या पार्श्वभूमीवर, हा नव्यानं आलेला कौटुंबिक हिंसाचाराविरोधी कायदा, अतिशय जबाबदारीनं समजून घ्यायला आणि पेलायला हवा आहे.

आपल्या सर्वांच्याच मनात खाजगी/वैयक्तिक आणि सार्वजनिक असे दोन कप्पे असतात. खूप काळापर्यंत कायदा, माणसांचा कुटुंबांतर्गत छळ, अत्याचार याबाबत फारसं बोलत नव्हता. म्हणूनच 'मी माझ्या मुलाचं/मुलीचं काय ते बघीन. लोकांनी बोलायचं काम नाही' किंवा 'माझ्या बायकोलाच मी मारलं ना? तुमचा त्याच्याशी काय संबंध?' असे प्रश्न जन्मदात्या किंवा सासरच्या घरात विचारले जातात. आता मात्र घर हे सर्वात सुरक्षित ठिकाण, या मिथकाला पडणारी भगदाडं उघड होताहेत. कित्येक आईवडील मुलांना/मुलींना छळतात; मुलं सज्ञान झाल्यानंतरही त्यांच्या लग्नाचे निर्णय आईवडील 'निकालात' काढतात; वडील, काका, मामा, भाऊ मुलींवर बलात्कार करतात; सासरी नवरा, सासू, सासरा, दीर इत्यादी माणसं मुलीचा छळ करतात. या गोष्टी लखलखीतपणे आता पुढे येऊ लागल्या आहेत. म्हणूनच घराच्या उंबऱ्याबाहेर राहणाऱ्या कायद्यानं मुख्यत: स्त्रियांच्या संरक्षणासाठी, घराचा उंबरा ओलांडून, कुटुंबात प्रवेश केला आहे. यात सर्व स्त्रियांना एक प्रकारचं संरक्षण आहे. अत्याचारित स्त्रीला अनेकदा आपल्या बचावासाठी स्वेच्छेनं घराबाहेर पडावं लागतं किंवा जबरदस्तीनं घराबाहेर काढलं

जातं. यामुळे तिच्या डोक्यावरचं छप्परच काढून घेतलं जातं. या नव्या कायद्यानं, सासू, सून, नणंद - अशा कुणाही स्त्रीला अशा प्रकारे बेघर करता येणार नाही, अशी या कायद्यात तरतूद आहे. ही या कायद्यातील एक अतिशय महत्त्वाची तरतूद आहे.

याखेरीज कोणत्याही प्रकारच्या सूक्ष्म किंवा ढोबळ स्वरूपाच्या शारीरिक अथवा मानसिक छळाबाबत तक्रार करून गुन्हा नोंदविण्याची संधी या कायद्यानं स्त्रीला दिली आहे. आपल्याला सर्वांना हे माहीत आहे की घरचा छळ, घरचं शल्य घराबाहेर बोलणं, यात स्त्रीला अवघड आणि अपराधी वाटतं. आपलंच काहीतरी चुकलं असणार असं लोक म्हणतील याची तिला भीती वाटते. वास्तविक असा छळ करणारा अपराधी असतो आणि ती त्याचा बळी असते! तरीही या छळासाठी घराबाहेर, संघटनेकडे किंवा पोलिसांकडे जाण्याचं बळ किंवा धाडस बहुसंख्य स्त्रियांकडे नसतं. म्हणून तर स्त्रियांच्या अनैसर्गिक मृत्यूच्या बातम्या रोजच्या रोज वृत्तपत्रात दिसतात. असे, पुरुषांचे मृत्यू किती होतात? स्त्रीपुरुषांच्या या प्रकारच्या मृत्यूच्या टक्केवारीचा विचार कितीजण करतात?

सर्वांत महत्त्वाचा मुद्दा हा, की हा कायदा घरातल्या छळाबाबत स्त्रियांना मदत करणारा आहे. याबाबत पुरुषांनी अस्वस्थ होण्याचं, आरडाओरड करण्याचं किंवा आपल्यावर आता कधीही बालंट येईल म्हणून घाबरण्याचं कारणच काय? हे चोराच्या मनातलं चांदणं तर नाही? का स्त्रियांवरचा एवढा अविश्वास की त्या खोट्या तक्रारी करतील, याची पुरुषांना भीती वाटते आहे?

माझ्या मित्रांनो, तुमचा जन्म एका आईच्या, बाईच्या पोटी झाला आहे. बायको, बहीण, मुलगी, मैत्रीण, सहकारी या विविध नात्यातल्या स्त्रिया तुमच्याभोवती आहेत. तुम्ही स्वत: या स्त्री-पुरुषांनी मिळून बनलेल्या समाजाचा एक घटक आहात. तशीच स्त्री हाही समाजाचा एक घटक आहे. तुम्ही ज्यांना आपलं मानता त्या साऱ्या स्त्रियांना, संरक्षण देत निर्भयपणे माणसासारखं जगायला हा कायदा मदत करणार आहे. मग तुम्हाला कशाची भीती वाटते आहे?

मला साऱ्या स्त्रियांनाही हेच सांगायचं आहे की बायांनो, मुळीच भिऊ नका; पण कुणा इतरांना भिववूही नका. स्त्री-पुरुषांनी परस्परांना अभय देत, निर्मळ मनानं, हातात हात घेऊन वाटचाल करायचं ठरवलं तर कायद्याचा हात उगारायची वेळ येणारच नाही आणि कुणी अमानुष वागलंच तर उलट हा कायदा आपल्या हाती आहेच.

कायदे/नियम यांचा आधार, ज्या समाजात कमीतकमी घ्यावा लागतो तो समाज समृद्ध, सुसंस्कृत मानला जातो. याचं भान आपण साऱ्या स्त्री-पुरुषांनी बाळगायला हवं.

('मिळून साऱ्याजणी' डिसेंबर २००६च्या सौजन्याने.)



## संवाद ३

हे सारं लिहिताना माझ्या डोळ्यांसमोर खैरलांजीच्या दलित कुटुंबावरच्या अत्याचाराची घटना आहे. घटना भयंकर आणि माणसाला शरमिंदं करणारी आहे! त्यावर गावकरी, पोलिस, शासनयंत्रणा यांचं अक्षम्य निष्काळजेपण आणि असह्य बेपर्वाई आहे. आणि हे सारं केवळ एका खैरलांजीपुरतं नाही. गवईबंधूंचे डोळे काढण्याचं क्रूर कर्म जातिद्वेषातून घडलं, घडवलं गेलं तेव्हापासूनची घटनांची ही एक अंतहीन साखळी आहे. आजची घटना ताजी असली तरी शेवटची नसणार हे सुजाणांना पक्कं माहीत आहे!

कालच पुण्यात, खैरलांजी हत्याकांडासंदर्भात अनेक पुरोगामी संघटनांची एकत्रित अशी जाहीर सभा झाली. प्रत्यक्ष घटनेनंतर बऱ्याच उशिरानं सभा झाली खरी; पण त्या घटनेनंतरच्या सत्यशोधन समितीच्या सदस्य कालिंदी देशपांडे यांनी, घटनास्थळ, घटनेतून वाचलेल्या किंवा संबंधित नातेवाईक, पोलिस इत्यादींकडून मिळवलेली सर्व माहिती तपशीलासह निवेदन केली. त्यानंतर प्रा. विलास वाघ आणि डॉ. विद्युत भागवत यांनी या घटनेमागचा दलितांवरच्या अत्याचारांचा उपेक्षेचा इतिहास, त्यावर कृती करण्यात टाळाटाळ करणारी वर्तमानातली यंत्रणा, त्यानंतरचे जागोजाग नेत्यांच्या उपस्थितीविना किंवा आदेशाविनाच झालेले दलित जनतेचे क्षोभपूर्ण उद्रेक यांची कारणं, परिणाम आणि यापुढचे उपाय यांची परखड चिकित्सा केली. या सभेनं एका परीनं, It is never too late असंच काहीसं दाखवून दिलं!

दलितांच्या उत्स्फूर्त, काहीशा हिंसक उद्रेकांना, प्रसारमाध्यमांनी ठसठशीत स्वरूपात वारंवार प्रेक्षकांच्या पुढ्यात ठेवलं. आपापल्या घरात, चहा पीत किंवा आरामात हे सारं बघणाऱ्यांची प्रतिक्रिया ही बधिरांची प्रतिक्रिया होती. सार्वजनिक संपत्तीचा नाश आणि जनजीवनाची परवड करणं यानं खैरलांजीतल्या घटनेतील अन्यायाचं परिमार्जन होत नाही

अनुक्रमणिका






हे खरंच. तरीपण काय केलं म्हणजे हिंदुधर्मातल्या या जाती विद्वेषातून दलितांच्या घरांची जाळपोळ, जीवनाची होरपळ थांबेल, या प्रश्नांनी त्यांचं सैरभैर होणं समर्थनीय नाही तरी स्वाभाविक आहे की नाही? या प्रश्नाचं उत्तर देण्यापूर्वी, यातलं नखभर जरी आपल्या घरात घडलं तर - याची आधी स्वतःला प्रामाणिक कबुली द्या मग उत्तर देण्याचा प्रयत्न करा.

जातीतली उच्चनीचता, विषमता, शत्रुत्व, यातून घडणाऱ्या उत्पातांचा विचार करताना जातिअंताचा विचार कार्यक्रम हाती घेऊ या असं प्रा. वाघ कळवळून सांगत होते. तसंच विद्युत भागवत यांनी लक्ष वेधलं ते ताठ मानेनं वावरत, निर्भयपणे स्वप्नं पाहणाऱ्या आणि ती पुरी करण्यासाठी कंबर कसून जगू बघणाऱ्या जन्मानं दलित असलेल्या प्रियांकाकडे, तिच्या आईकडे. हे स्त्रीचं, एक 'खाल'च्या जातीतल्या, कुटुंबातल्या स्त्रीचं, हे आत्मसन्मानाचं जगणं कुठल्याच जातीतल्या पुरुषसत्ताक व्यवस्थेत वाढलेल्या पुरुषाला सहन होत नाही. खैरलांजीच्या हिंसाचारातला गावाचा राग यासाठीही होता आणि आहे! थोड्याफार फरकानं तो साऱ्या जातिधर्मात आहेच; पण हिंदू धर्मातल्या दलित आणि अन्य 'खालच्या जातीच्या' वाट्याला त्याचं भीषण रौद्र क्रौर्य येतं!

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना दलितेतर दलितांचे नेते मानतात तर फुले पतिपत्नी फक्त माळ्यांच्या गळ्यातले हार असं माळी मानतात. कुंपणात, पुतळ्यात, कोंडवाड्यात कोंबून आपण त्यांना छोटं करतो आहोत. 'शिका, संघटित व्हा आणि संघर्ष करा' हे डॉ. आंबेडकरांचं सुप्रसिद्ध वचन. शिका आणि शिकत शिकत माणसं आणि त्यांचं जगणं समजून घ्या. अशा समजदारांची संघटना करा आणि शहाण्या, समजदार, शिक्षितांची अशी संघटना करुन या विरोधात वागणाऱ्यांविरुद्ध संघर्ष करा असं बाबासाहेबांचं सांगणं होतं. याचा पाया शिक्षण. माणसासारखं जगण्याची संवेदनशील आणि विवेकी मनं तयार करणारं शिक्षण हा डॉ. बाबासाहेबांच्या आणि फुले पतिपत्नींच्या मनातील शिक्षणासंबंधीचा दृष्टिकोन होता आणि म्हणूनच एकीकडे खैरलांजी आणि त्यासारख्या जातिविषमतेतून घडणाऱ्या घटनांसंबंधीचा तीव्र निषेध नोंदवावासा वाटतो आणि त्याबरोबरच सावित्रीबाई फुल्यांसारख्या भारतातल्या आद्य स्त्री-शिक्षकाला अभिवादन करावंसं वाटतं.

(मिळून साऱ्याजणी जानेवारी २००७ च्या सौजन्याने.)

▣ ▣ ▣

## A Ray Of Hope

**Ratna Kumar**

Complaints of domestic violence can be filed by neighbours, social workers, or relatives on behalf of the victim. And the magistrate is given a broad array of powers, including issuing protection or injunction orders, providing monetary relief or payment maintenance. While the penal provisions dealing with dowry focus on incarceration, the DVA gives women an opportunity to keep the perpetrator at a distance, but not in jail. Women can no longer be evicted from their homes by the abuser, and can seek an order to reside in the same house or be allotted a part of it for her personal use even if she has no legal claim or share in the property. The abuser can also be prohibited from entering the aggrieved person's place of work, or, if that person is a child, the school.

DVA covers acts that are violative of a woman's dignity or any other unwelcome conduct of a sexual nature. In a country where sex, not just sexual violence, is considered bad, indecent, and something in which 'good people' do not indulge or talk about, the courts may find themselves determining dignity or sexuality along highly puritanical lines, that would neither benefit women nor be conducive to promoting healthy adult sexual relationships. Protection from sexual wrongs needs to be accompanied with education about sexual rights.

*The writer is director, Centre for Feminist Legal Search.*

(The Times of India, Pune 21/11/2006) च्या सौजन्याने.











# डॉ० इरावती कर्वे यांचे 'परिपूर्ती' मधील स्त्रीविचार

## डॉ० लता छत्रे

इरावती कर्वे हे एक व्यासंगी व्यक्तिमत्त्व. मानवशास्त्राचा अभ्यासक म्हणून त्यांचा मानवशास्त्राचा अभ्यास होताच; पण लहानपणी रँग्लर परांजप्यांच्या घरात राहिल्यामुळे संस्कृत तसेच पाश्चात्त्य वाङ्मयाचा त्यांना केवळ परिचय होता असे नाही, तर त्यांच्या मनावर त्याचे संस्कारही झाले होते. त्यातूनच त्यांचा संस्कृतीच्या अभ्यासासाठी आवश्यक असणारा दृष्टिकोन तयार होत गेला.

याशिवाय कर्वेबाई स्वत: तत्त्वज्ञ होत्याच. पण त्यांचा भारतीय धर्म आणि तत्त्वज्ञान यांचा अभ्यास होता. त्यामुळेच त्यांच्यामध्ये संस्कृतीशी समरस होऊन जाणारी वृत्ती जशी दिसते, तशीच संस्कृतीचा अन्वयार्थ लावत असताना आवश्यक असणारी तत्त्वज्ञानाची तटस्थ आणि विचारशील वृत्तीही दिसते. थोडक्यात त्यांच्या लिखाणामध्ये मानवशास्त्र आणि तत्त्वज्ञान यांचा सुरेल संगम झालेला दिसतो. संस्कृतीचे स्वरुप, तिची जडणघडण सांगत असतानाच त्या मानवी स्वभावाचे विविध पैलू सांगत, त्याचे अंतःकरण उलगडत जातात; तर कधी मानवी स्वभावाची जडणघडण सांगत असताना संस्कृतीचे स्वरुप उलगडत जातात.

संस्कृतीचे स्वरुप सांगत असताना इरावती कर्वे यांनी 'मनुष्य समाजाची डोळ्यांना दिसणारी भौतिक वस्तूरुप निर्मिती व डोळ्यांना न दिसणारी पण विचारांना आकलन होणारी मनोमय सृष्टी म्हणजे संस्कृती' अशी संकृतीची व्याख्या केली आहे. या व्याख्येनुसार संस्कृतीच्या दोन बाजू असतात; वस्तुरुप आणि मनोमय. या संस्कृतीच्या बाजूंमधील संबंधांच्या संदर्भात आपल्याला असे म्हणता येईल की, मनोमय संस्कृतीच्या आधारे आपल्याला वस्तूरुप संस्कृतीचा अन्वयार्थ लावता येतो, तर वस्तूरुप संस्कृतीमध्ये मनोमय संस्कृती अभिव्यक्त होत असते.

अर्थात मनोमय संस्कृती ही केवळ वस्तूरुप संस्कृतीमध्ये अभिव्यक्त होते असे नाही, तर रुढी, परंपरा, रीतिरिवाज यांच्यामध्येही अभिव्यक्त होत असते. या मनोमय संस्कृतीच्या आधारे आपल्याला त्या संस्कृतीच्या तात्त्विक, तसेच तात्त्विक मानवशास्त्रीय विचारांचा पैलू दिसतो. या सांस्कृतिक घटनांचे तसेच रीतिरिवाज यांच्यावर आधारित संस्कृतीचे स्वरूप इरावती कर्वे यांनी आपल्या 'परिपूर्ती' या ललित निबंधाच्या संग्रहामध्ये स्पष्ट केलेले आहेच; पण त्या स्वरूपामागे असलेले तत्त्वज्ञान आणि तात्त्विक मानवशास्त्रही त्यांनी उलगडून दाखविण्याचा प्रयत्न केलेला आहे.

'परिपूर्ती' हा कर्वेबाईंचा १८ ललित निबंधांचा संग्रह आहे. हे निबंध वेगवेगळ्या व्यक्तींना आणि प्रसंगांना अनुसरून लिहिलेले असले तरी त्या निबंधांच्या माध्यमातून कर्वेबाई मानवी स्वभाव आणि संस्कृती यांच्यातील संबंध सांगण्याचा प्रयत्न करतात. कधी हा संबंध स्त्री आणि संस्कृती यांच्यामधला असतो तर कधी तो स्त्री-पुरुष यांच्यामधील नाते आणि संस्कृती यांच्यामधील असतो. हा संबंध उलगडत असताना कर्वेबाई भारतीय स्त्रीच्या मानसिकतेवर प्रकाश टाकतात. 'परिपूर्ती' या ललित निबंधाच्या आधारे कर्वेबाईंनी उलगडलेली भारतीय स्त्रीची मानसिकता समजून घेण्याचा प्रयत्न प्रस्तुत लेखामध्ये केलेला आहे.

जेव्हा आपण भारतीय स्त्रीच्या मानसिकतेचा विचार करायला लागतो तेव्हा या मानसिकतेचे सामाजिक, सांस्कृतिक, भावनिक असे विविध आयाम आपल्यापुढे येऊ लागतात. हे आयाम एकमेकांमध्ये इतके सुंदर गुंफलेले असतात की त्यातून भारतीय संस्कृतीचे अंतरंग उलगडत जाते; पण त्याबरोबर भारतीय संस्कृतीमधील एकजिनसीपणाचे एक रहस्य स्त्रीस्वभावात कसे दडून बसले आहे याची प्रचितीही येते. भारतीय स्त्रीचे हे एकजिनसी, परिपूर्ण आणि बहुआयामी व्यक्तिमत्त्व कर्वेबाईंच्या 'परिपूर्ती' या छोटेखानी ललित निबंधातून उलगडत जाते.

स्त्रीच्या बहुआयामी स्वरुपाचा जेव्हा आपण विचार करतो तेव्हा पहिला प्रश्न उपस्थित होतो, तो म्हणजे स्त्रीचा स्वभाव हा संस्कृतिनिरपेक्ष असतो की नसतो? स्त्रीचा संस्कृतिनिरपेक्ष स्वभाव म्हणजे एक स्त्री म्हणून असलेला स्त्रीचा स्वाभाविक स्वभाव आणि तिचा संस्कृतीसापेक्ष स्वभाव

म्हणजे स्त्रीच्या स्वाभाविक स्वभावाची, ती ज्या संस्कृतीमध्ये वाढली असेल त्यानुसार होणारी अभिव्यक्ती. 'परिपूर्ती' या ललित निबंध संग्रहाच्या आधारे इरावतीबाईंची याविषयीची काय मते असतील याचा जेव्हा आपण विचार करतो, तेव्हा लक्षात येते की त्यांच्या मते स्त्रीचा स्वभाव संस्कृतीनिरपेक्षही असतो आणि संस्कृतीसापेक्षही असतो. उदा. मातृत्व हा स्त्रीचा संस्कृतीसापेक्ष स्वभाव आहे.

मातृत्वाला सार्वत्रिक सत्य म्हणायला काहीच हरकत नसावी. तो स्त्रीचा संस्कृतीनिरपेक्ष स्वभाव आहे. मातृत्व ही स्त्रीची खरी ओळख आहे. त्याशिवाय एक स्त्री म्हणून तिची ओळख कशी अपुरी आहे हे कर्वेबाईंनी 'परिपूर्ती' या निबंधामध्ये दाखवून दिले आहे. कर्वेबाई एका समारंभासाठी गेलेल्या असतात. त्यांचा परिचय अमक्याची पत्नी, अमक्याची सून असा करुन देण्यात येतो. परंतु या परिचयात काहीतरी राहून गेले आहे असे त्यांना सारखे जाणवत असते. समारंभ संपून घरी येताना शाळेतील एक मुलगा आपल्या मित्रांना सांगतो, 'अरे ही आपल्या वर्गातील कर्वेची आई.' हे ऐकल्यावर त्यांना आपला परिचय पूर्ण झाला आहे याचे समाधान वाटते.

अर्थात मातृत्वाचा हा स्वभाव केवळ विवाहित, मुलाला जन्म दिलेल्या स्त्रीमध्येच असतो असे नाही तर तो अविवाहित स्त्रीमध्येदेखील कसा असतो, हे कर्वेबाईंनी 'सुप्तइच्छा' या निबंधामध्ये मिशनरीबाईची आई होण्याची सुप्त इच्छा वेगवेगळ्या प्रसंगातून कशी अभिव्यक्त होते, हे अतिशय सुरेख मांडून दाखविलेले आहे.

मूल हे स्त्रीचे सर्वस्व असते. त्यासाठी ती वाटेल ते करायला धजावते. आपल्या बाळासाठी बुरुजावरुन उडी मारणाऱ्या हिरकणीची गोष्ट तर प्रसिद्धच आहे. आपल्या बाळावर संस्कार व्हावेत म्हणून ती धडपडत असते. धांगडधिंगा घालणाऱ्या पोरांवर रागावत असते, ओरडत असते. बालमानसशास्त्रातील सगळे नियम धुडकावून देत असते. कारण तिचा विश्वास असतो की आपले मूल या धडपडण्यातून आणि आपल्या रागावण्यातून शहाणे होणार आहे, जबाबदार होणार आहे. एका आईचा हा विश्वास आणि प्रेम कर्वेबाईंनी 'वेड लागलेले घर' या निबंधामध्ये सुरेख मांडला आहेच; पण 'प्रेमाची रीत' या निबंधामध्येही दाखवून दिलेले आहे.

'वेड लागलेले घर' हा निबंध दोन दृष्टिकोनांतून महत्त्वाचा आहे. एक म्हणजे स्त्रीचे मातृप्रेम आणि दुसरे म्हणजे शिक्षणपद्धतीविषयी कर्वेबाईंचे विचार. भारतीय स्त्रीचे एक वैशिष्ट्य आहे, की कितीही शिकली, सवरली तरी घर हे तिचे विश्व असते. घरावर, आपल्या मुलाबाळांवर तिचे अतीव प्रेम असते. त्यामुळे मुले धडपडली, त्यांनी गोंधळ केला, तर ती जरूर चिडते, रागावते; पण तिची मुले जेव्हा शहाण्यासारखी न धडपडता वागतात तेव्हा तिला जरा गडबडल्यासारखे, चुकल्यासारखे वाटते. अशा प्रकारे आईला आपल्या मुलांबद्दल वाटणे ही देखील एक प्रेमाची रीतच आहे.

आपण प्रत्येक जणच सामाजिकीकरण आणि संस्कृतिकीकरणाच्या माध्यमातून शिकत असतो. कधी हे शिकणे स्वयं म्हणणे आपलेच आपण धडपडत, ठेचकाळत शिकणे असते तर कधी दुसऱ्यांनी शिकवणे असते. आता दुसऱ्यांनी शिकवण्याचा मुद्दा निघतो तेव्हा ते कसे शिकवायचे हा प्रश्न उपस्थित होतो. तेव्हा साहजिकच रागावून, मारुन-मुटकून म्हणजेच पंतोजीपद्धतीने शिकवायचे का? त्यामुळे मानसिक वाढ खुंटणार नाही का? असे प्रश्न उपस्थित होतात.

कर्वेबाईंना कदाचित यावर असे सुचवायचे असेल की जर मुलांना रागावले नाही, ती धडपडली नाहीत तरच त्यांचा बौद्धिक विकास थांबेल आणि ती अधिकाधिक निष्काळजी आणि बेफिकीर बनतील. बाईंना आपले हे विचार आई या नात्याने 'वेड लागलेले घर' यामध्ये मांडायचे असावेत. 'प्रेमाची रीत' या निबंधात झोपडीत राहणारी स्त्री आपला मुलगा पडल्यावर त्याला कुठे लागलंय हे बघण्यापूर्वी त्याला रट्टे देते आणि म्हणते, 'पटकी झाली मेल्याला! कशाला तडफडायला रस्त्यावर गेला होता रे? आई भवानीची खैर म्हणून वाचलास!' या तिच्या वागण्यातून त्याच्यावरचे तिचे प्रेमच दिसते.

स्त्री ही स्वतःसाठी नसतेच, ती कायम दुसऱ्यांसाठीच असते. स्त्रीवादी म्हणतात त्याप्रमाणे असे संस्कार जन्मापासूनचे समाजाने आणि संस्कृतीने तिच्यावर केले असतीलच; पण ती वस्तुस्थिती आहे. तिने असे असावे का? समाजाने तिच्या या स्वभावाचा गैरफायदा घ्यायचा का? हे नक्कीच मानवतावादी दृष्टिकोनातून महत्त्वाचे मुद्दे आहेत. पण त्याचा विचार येथे करणे अप्रस्तुत आहे.

तिचे हे दुसऱ्यासाठी करणे एकापरीने स्वतःसाठीच करण्यासारखे असते. कारण ती ज्या दुसऱ्यासाठी करीत असते, ते एकतर तिचा प्रियतम-परमेश्वर असतो किंवा त्या परमेश्वराच्या छोट्या छोट्या प्रतिकृती असतात. त्या छोट्या

प्रतिकृतीमध्ये तिला तिचा परमेश्वर दिसत असतो. आपल्या परमेश्वराचे करण्यातच तिचा आनंद कसा सामावलेला असतो, याचे सुरेख चित्रण कर्वेबाईंनी 'स्त्री-राज्य' या कथेत केले आहे. हीच भारतीय स्त्रीची मानसिकता आहे. या मानसिकतेमुळेच भारतामध्ये कुटुंबव्यवस्था भक्कम आहे.

कुटुंबव्यवस्थेच्या भक्कमपणाचा विषय निघाला की साहजिकच विचार येऊन थांबतो तो स्त्री-पुरुष यांच्यातील नातेसंबंधांशी. हे नाते आई-मुलाचे असेल, पती-पत्नीचे असेल, प्रियकर-प्रेयसीचे असेल किंवा मुला-मुलींमधील असेल. या प्रत्येक नातेसंबंधातील हळुवारपणा, प्रेमामुळे येणारा अधिकार, सर्वांच्या संरक्षणाची देखभाल करण्याच्या भावनेमुळे आलेला मनाचा मोठेपणा आणि जबाबदारीची जाणीव आणि त्याचबरोबर कोणताही स्वार्थी हेतू मनात नसल्यामुळे आलेला भाबडेपणा इरावतीबाईंनी 'गौराई' या निबंधात दाखवून दिला आहे.

गौराई म्हणजेच गौरी. गौरी भारतीय स्त्रीची मानसिकता आहे. स्त्रीचे कोणत्याही प्रकारे उदात्तीकरण न करता असे म्हणता येते की, गौरी भोळीभाबडी, शिवावर नितांत प्रेम करणारी, त्याला सांभाळणारी, त्याच्याशी भांडणारी, पण त्याचवेळी नवऱ्याचा केलेला अपमान सहन न झाल्यामुळे अग्नीत प्रवेश करणारी, शिव या दैवताभोवतीच फिरणारी अशी आहे. गौरी ही स्त्रीस्वभावाचे प्रातिनिधीक रूप आहे. ती सर्वांना बरोबर घेऊन जाणारी, त्यांच्यावर अधिकार गाजविणारी आहे. भारतीय स्त्रीची ही मानसिकताच भारतातील कुटुंबसंस्थेला अबाधित ठेवण्यास कारणीभूत तर झाली नसेल ना? ही गौरी त्यांना आपल्या मित्रांची काळजी घेणाऱ्या लहान मुलीत जशी दिसते तशीच आपले वय झाले, आपल्याला कष्ट होत नाही म्हणून कामावर जाऊ नकोस म्हणून प्रेमळ आग्रह करतो हे सांगणाऱ्या वृद्धेमध्येही दिसते. स्त्री राज्यातील स्त्रिया याच भावनेतून घरातील पुरुषमंडळींची सेवा करीत होत्या.

स्त्री-पुरुष यांच्यातील नातेसंबंध इरावतीबाईंनी एका वेगळ्या पद्धतीने 'स्त्री व संस्कृती' या निबंधामध्ये दाखवून दिला आहे. चांगले, वाईट, सुसंस्कृत, असंस्कृत या सर्व नैतिक कल्पना आहेत. प्रत्येकाने चांगले, सुसंस्कृत असावे. वाईट, असंस्कृत असू नये हे नीतिविचार झाले. या संकल्पनांचे नेमके अर्थ काय याची तात्त्विक चर्चा बरीच आहे. पण या तात्त्विक चर्चा मात्र मानवी स्वभावापुढे, संस्कृतीपुढे कशा निष्प्रभ ठरतात हे या लेखिकेने या निबंधात दाखवून दिले आहे.

ज्या समाजात नवऱ्याने पत्नीला मारणे रीत असेल आणि पत्नीनेही ते हसतमुखाने स्वीकारलेले असेल, किंबहुना प्रेमाची रीत म्हणून तिचा स्वीकार केला असेल तर अशा समाजात सुसंस्कृत असंस्कृतची व्याख्या कशी करणार? तोच मुद्दा सुशिक्षित स्त्रीच्या संदर्भात उपस्थित होतो. स्त्री सुशिक्षित असली तरी तिला तडफदार, रागावणारा, प्रेम करणारा पण त्यावेळी तिला मुठीत ठेवणारा, तिच्यावर अधिकार गाजवणारा नवरा हवा असतो. म्हणूनच कर्वेबाईंच्या मनात प्रश्न निर्माण होतो, वरवर संस्कृतीची आभरणे असलेल्या पण आतून रानटी पौरुषाची पूजा करणाऱ्या ह्या तडफदार तरुणी आणि सुसंस्कृत, शिक्षणाने कोमल मनोवृत्ती झालेले अहिंसक तरुण ह्यांची जोडी एकत्र नांदणार कशी?

स्त्री पुरुषांमधील नाते आणखी एका पद्धतीने कर्वेबाईंनी 'वारकरी' या निबंधामध्ये दाखविले आहे. समाजामध्ये स्त्रीला दुय्यम स्थान देणारा, तिला आर्थिक, राजकीय अधिकार न देणाऱ्या पुरुषाचे दैनंदिन जीवनातील वागणे मात्र त्याच्या जातीने कसे ठरते हे या निबंधात दिसून येते.

मानवशास्त्राच्या जिज्ञासेने कर्वेबाई ब्राह्मणांच्या दिंडीमध्ये तसेच मराठ्यांच्या दिंडीमध्येही मिसळल्या तेव्हा त्यांना स्त्री-पुरुषांमधील नात्यांना सामाजिक वळण कसे असते हे जाणवले आणि त्यांनी त्याचे वर्णन वस्तुनिष्ठपणे केलेले आहे. ब्राह्मणांच्या दिंडीमधील स्त्रिया रांधण्यापासून सर्व कामे करीत असत. मराठ्यांच्या दिंडीमध्ये मात्र बायका स्वयंपाक करीत; पण वाढणे, पाणी आणणे, मोठे सामान मोटारीत भरणे आदी कामे पुरुष करीत. एकूण बायका पुरुषांचे वागणे जास्त मोकळे होते. याउलट ब्राह्मणांच्या दिंडीमध्ये बायका गप्पच असत. स्त्रीची अशाप्रकारे मानसिकता उलगडून दाखविण्याऱ्या कर्वेबाईंना स्त्रीच्या यातनांची, त्यांच्या दुःखाची जाणीव नव्हती असे नक्कीच नाही. यासंदर्भात आजच्या स्त्रीवादी लेखिकांप्रमाणे त्यांनी स्त्रीला दुय्यम ठरवणाऱ्या सामाजिक आणि सांस्कृतिक न्यायाला फैलावर धरले नसेलही; पण या न्यायामुळेच स्त्रीवर अन्याय झाला याची पुरेपुर जाणीव त्यांना आहे. त्याचप्रमाणे हजारो वर्षे झाली स्त्रिया शिकल्या, सवरल्या मोठमोठ्या जबाबदाऱ्या उचलू लागल्या तरी त्यांच्या सामाजिक स्थानामध्ये काही बदल झाला नाही. याची खंत त्यांना जरूर आहे. भारतीय स्त्रीविषयीच्या या भावना त्यांनी

'जन्मांतरीची भेट', 'बीज-क्षेत्र', 'जुळी मुले' या निबंधामधून व्यक्त केल्या आहेत.

'जन्मांतरीची भेट' हा निबंध उत्खननात सापडलेल्या एका स्त्रीच्या सांगाड्याविषयी आहे. उत्तर गुजरातमध्ये कर्वेबाई १५०० वर्षांपूर्वीच्या संस्कृतीचा शोध घेण्याच्या निमित्ताने गेल्या होत्या. त्या उत्खननामध्ये बाईंना एका तरुणाचा, वृद्धाचा, कुत्र्याचा तसेच एका तरुण स्त्रीचा सांगाडा सापडला. एकाच ठिकाणी सापडलेल्या या तीनही सांगाड्यांवर एकत्रित विचार करून त्या काळातील संस्कृतीविषयी काही अन्वयार्थ लावता येतो का याचा विचार करीत असताना त्यांच्या असे लक्षात आले की वसाहतीमध्ये एखादा पुरुष मेला असावा व त्याला पुरताना त्याचे नोकरचाकर, हत्यारे, पत्नी आदींना त्याच्यासोबत पुरले असावे.

त्यातील स्त्रीच्या सांगाड्यावरून त्यांच्या असे लक्षात आले की ती स्त्री अल्पवयीन होती. तो सांगाडा पाहिल्यावर त्यांच्या मनात विचार आला, 'तू ती मीच का ग?' त्यांना यातून असे ध्वनित करावयाचे असावे की ती स्त्री की जिला फुलण्यापूर्वीच समाजाच्या दुष्ट रीतीरिवाजानं गाडले होते. तिच्या भावभावनांचा कुसकुटा केला होता.

जी युगानुयुगे या बंदिस्त समाजातून बाहेर पडण्यासाठी धडपडत होती, जी इतकी वर्षे अंधारात कोंडली गेली होती, जिला सूर्यप्रकाशाचा कवडसासुद्धा दिसत नव्हता, तिला आज शिकून सवरून शहाणी झालेली स्त्री बाहेर काढत होती. सूर्यप्रकाशाचे दर्शन देत होती. येथे कर्वेबाई नकळत सामाजिक, सांस्कृतिक बंधनात जखडलेल्या स्त्रीची स्वतःशीच तुलना करीत होत्या. जणूकाही त्यांना येथे असे सांगावयाचे असावे की स्त्रीच्या वेदना सारख्याच असतात. आज स्त्री शिकली, सवरली असली, जरा मोकळा श्वास घ्यायला तिला संधी मिळाली असली तरी आजही तिचे जीवन सामाजिक, सांस्कृतिक रीतीरिवाजांच्या चौकटीत बंदिस्तच आहे.

समाजामध्ये स्त्रीचे दुय्यम स्थान अधोरेखित करण्यासाठी भारतीय संस्कृतीमध्ये वापरलेली संकल्पना म्हणजे 'बीजक्षेत्र'. या संकल्पनेचा स्त्रीवादी अन्वयार्थ लावत असताना स्त्रियांच्या दुय्यम स्थानाचे समर्थन करण्यासाठी पुरुषांच्या सुपीक डोक्यातून निघालेली संकल्पना असा तिचा अर्थ लावला जातो. परंतु प्रत्यक्षात या संकल्पनेचा वापर स्त्री आणि पुरुषांनी आपल्या स्वार्थासाठी व्यवस्थितपणे कसा केला याचा विचार कर्वेबाईंनी 'बीजक्षेत्र' या निबंधात मांडला.

स्त्री ही चामड्याची पिशवी आहे हा विचार केवळ अशिक्षित स्त्री आपल्या सुनेविषयी मांडत नाही, तर सत्यवतीसारखी राजघराण्यातील स्त्रीसुद्धा असाच विचार करते. दोघींमध्ये फरक इतकाच असतो की अशिक्षित स्त्री असा विचार आपला मुलगा श्रेष्ठ आणि सून दुय्यम हे सांगण्यासाठी करते, तर सत्यवती कुरुवंशाची वृद्धी व्हावी म्हणून करते. म्हणजेच दोघीही स्त्रीकडे साधन म्हणूनच बघतात. असे करताना आपण एका स्त्रीवरच अन्याय करीत आहोत, अशी भावना त्यांना शिवतही नाही. एकूण काय बीजक्षेत्राचा वापर स्त्रीवर अन्याय करण्यासाठी तर कधी स्वतःची सत्ता स्थापित करण्यासाठीच वापरला गेला, कधी हा वापर स्त्रीने केला तर कधी पुरुषाने. हे इरावतीबाईंना या निबंधात सांगावयाचे आहे.

बीजक्षेत्र न्यायाने स्त्रीला समाजामध्ये दुय्यम स्थान का याचे समर्थन केले, तर जुळी मुले असणे या वस्तुस्थितीने स्त्रीला व्यभिचारी, अनैतिक ठरविले. रामायण, महाभारत काळात स्त्रीला व्यभिचारी ठरविण्याचे साधन म्हणजे स्त्रीला जुळी मुले असणे. त्या काळातील जनरीतच होती. म्हणूनच रामाला जनरीतीपुढे मान तुकवून सीतेचा त्याग करावा लागला. आणि कुंतीला अश्विनकुमारांना आवाहन करण्याचा मंत्र माद्रीला दिल्याबद्दल पश्चात्ताप झाला. इरावती कर्वे यांनी 'जुळी मुले' या निबंधात जनरीत आणि शास्त्र यांच्यातील सांस्कृतिक संबंध सांगण्याचा प्रयत्न केलेला आहे.

अशा तऱ्हेने 'परिपूर्ती' या कर्वेबाईंच्या ललित निबंधांच्या संग्रहाच्या आधारे भारतीय संस्कृतीमध्ये वाढलेल्या स्त्रीच्या मानसिकतेचा परिचय होतो. असा परिचय करून घेत असताना आपल्याला असे दिसते की त्या कधी स्वतःच एक मराठी स्त्री म्हणून अनुभव घेतात तर कधी त्या घटना विश्वाच्या बाहेर राहून त्या घटनांमधून स्त्रीच्या चालण्या-बोलण्याचा अन्वयार्थ लावतात. त्यांच्या या स्वानुभवातून तसेच अन्वयार्थातून एक सुखवस्तू, मध्यमवर्गीय, सुशिक्षित, समजूतदार अशी भारतीय स्त्री साकारते. ही स्त्री स्वतःच्या कुटुंबात, तसेच बाह्य समाजात अतिशय आत्मविश्वासाने वावरते. आपल्या सांस्कृतिक मूल्यांचे जतन करीत असतानाच इतरांच्या सांस्कृतिक मूल्यांचा आदर करते.

('हाकारा' 'डॉ. इरावती कर्वे स्मृति विशेषांक'च्या सौजन्याने.)








# भारतीय स्त्री आणि तिचे स्वातंत्र्य

## गौरी देशपांडे

जेव्हा 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हती' असं म्हटलं गेलं त्या काळात निसर्ग, समाज व कामांची शरीर - बळाप्रमाणे विभागणी, या सर्वांना अनुसरुन स्त्रीला जे संरक्षित व नियमबद्ध स्थान दिले गेले त्याच्याविरुद्ध फिर्याद किंवा कारवाई करणे तिला शक्यही नव्हते व पोषकही नव्हते. ते साध्य असण्याची तर कल्पनाही तिच्या मनात फिरकली नसणार. जेव्हा मनुष्यजातीचा उदरनिर्वाह, संरक्षण व सातत्य केवळ मनुष्याच्या दंडातील शक्तीवर व पायातील गतीवर अवलंबून होते तेव्हा वरचेवर पिल्लांस जन्म देण्याचे कामच फक्त मादीवर पडावे यात नवल नाही. एका दृष्टीने या कामामुळे आयुष्याची कित्येक वर्षे तिची इतर सर्व कामे करण्याची क्षमता मर्यादित असणार. हा सर्व प्रस्ताव करण्याचे कारण असे की मनूचे दाखले पुढे करून स्त्रियांनी नेहमीच पुरुषाच्या छायेत व संरक्षणाखाली राहिले पाहिजे असे म्हणणाऱ्या संस्कृतीप्रेमी जनांना बदललेल्या परिस्थितीची जाणीव झाली नाही असे दिसते. जोपर्यंत शिकार करणे, अवजड हत्यारे वापरणे, लढाई करणे यावरच मनुष्याचे आयुष्य अवलंबून होते तोपर्यंत मनूच काय पण कुठलाही आधुनिक स्त्री-स्वातंत्र्याचा भोक्ता, स्त्रीला एकटीला, पुरुषाचे मदतीशिवाय जगता येईल किंवा जगले पाहिजे असे म्हणण्याचा वेडेपणा करणार नाही. स्त्री-स्वातंत्र्याच्या खऱ्या चळवळीस वैज्ञानिक, तांत्रिक व वैद्यकीय शोध यांचा आधारच हवा. हातात बंदूक आल्यावर तिचा चाप ओढणे पुरुषाइतके स्त्रीलाही सहज शक्य आहे. विशिष्ट कौशल्ये, ज्ञान प्राप्त करून घेऊन समाजाच्या आर्थिक आयुष्याचा एक स्वतंत्र भाग, गव्याच्या किंवा रानडुकराच्या मागे न धावता स्त्री बनू शकते. त्याचप्रमाणे तिच्या इच्छेविरुद्ध तिच्या शरीराचा मनुष्यजात वाढविण्याची पोषक जमीन असा उपयोग करून घेणे, संततिनियमनाच्या आधुनिक, स्वस्त व साध्या साधनांमुळे अशक्य आहे. या तीनही विभागात पुरेशी प्रगती होईपर्यंत, स्त्रियांना जे आर्थिक, शारीरिक आणि सामाजिक स्वातंत्र्य मिळणे अशक्यप्रायच होते ते विसाव्या शतकात साध्य होऊ शकेल. केवळ यापूर्वी ही गोष्ट अशक्य होती म्हणून ती आज अनैतिक आहे असे म्हणणे दुराग्रही व प्रतिगामी ठरेल. मनूच्या काळात विमानेही नव्हती म्हणून वैमानिकाचा धंदा अनैतिक आहे असे आज कितीजण म्हणतील?

### स्त्रीची 'स्वाभाविक' कामे

या सर्व गोष्टी वर वर बघता कुणालाही पटाव्या अशा आहेत. स्त्री ही प्रथम एक मनुष्य आहे व मनुष्य म्हणून जगण्यामध्ये तिचे स्त्रीत्व जर आड येऊ लागले तर विशेषकरून 'बायकी' समजल्या जाणाऱ्या सद्गुणांचा तिने त्याग करण्यास प्रत्यवाय नसावा. उदाहरणार्थ : एखाद्या अॅस्ट्रोनॉट स्त्रीला मातृत्वाकडे पाठ फिरवावीशी वाटावे यात गैर काहीच नाही. परंतु ज्यांच्या मनात मातृत्व हे स्त्रीचे एकमेव कर्तव्य होऊन बसले आहे त्यांना ही गोष्ट अनैसर्गिक वाटेल. जगातील बहुतेक देशांनी (विशेषत: अभिमानाची गोष्ट म्हणजे भारताने) स्त्री व पुरुष यांच्यात कायद्याने फरक करणे बंद केले आहे. परंतु पारंपरिक दृष्ट्या काही कामे स्त्रीची तर काही पुरुषांची समजली जातात. त्यामुळे कित्येक धंद्यात असा फरक केला जातो. नर्सिंगच्या धंद्यात बहुधा स्त्रिया आढळतात. याचे कारण स्त्रिया अधिक कनवाळू असे धरले जाते. हे उघड उघड खोटे आहे असे सासूच्या जाचास कंटाळून जीव देणाऱ्या सुना सहज सांगतील. हे खोटे कारण जमेस न धरल्यास थोडे खोलात जाता आतले कारण समजते. रोग्याची शुश्रूषा ही घरात राहणाऱ्या व्यक्तीवर साहजिकपणे पडणारी जबाबदारी असल्याने कित्येक शतके स्त्रिया ती घरात पार पाडत आलेल्या आहेत. याशिवाय सुरुवातीस बरीच वर्षे शुश्रूषा हा धंदा नव्हता. त्यात आर्थिक प्राप्ती जवळपास काहीच नसल्याने ज्यांना निर्वाहाची इतर साधने आहेत अशाच व्यक्ती ती अंगावर घेऊ शकत. त्यामुळे अर्थातच ज्यांचे भाऊ, बाप, किंवा नवरे पैसे मिळवतात अशा व्यक्ती - म्हणजेच स्त्रिया त्यात शिरल्या. पुढेपुढे जेव्हा तो

धंदा झाला तेव्हाही त्यात अगोदरच असणाऱ्या स्त्रियांमुळे, स्त्रियाच तो धंदा करण्याकडे वळल्या.

तसेच ट्रक ड्रायव्हरचा धंदा घ्या. फियाट किंवा ॲंबेसडर गाडी चालवायला लागते त्यापेक्षा काही विशेष अधिक ताकद ट्रक चालवायला लागते अशातला भाग नाही. परंतु अमेरिका, इंग्लंड व रशिया असे काही अपवाद सोडले तर बस किंवा ट्रक बायका चालवीत नाहीत. तसेच जेथे बऱ्याचशा पुरुषांवर अधिकार चालवावा लागतो अशा जागा-शॉप-फ्लोअर-फोरमन, बांधकामाचा मुकादम, ऑफिस-सुपरिटेंडंट - बायकांना देणे बहुतेक सर्व एम्प्लॉयर्स नाकारतात. इस्रायलसारखा एखादाच देश, जेथे मनुष्यबळच अत्यंत मर्यादित आहे, स्त्रियांना त्यांच्या लष्करात भरती करतो. इतर देशांतील लष्करात स्त्रिया फक्त नर्सेस किंवा डॉक्टर म्हणून काम करतात.

### आर्थिक परावलंबित्व

अशा प्रकारच्या केल्या जाणाऱ्या फरकास दोन प्रमुख कारणे आहेत. एक आर्थिक. ज्या ज्या नोकऱ्यांमध्ये पुष्कळ पैसा मिळतो त्या नोकऱ्या पुरुषांना देण्याकडे समाजाचा कल अधिक असतो. याचे कारण विशेषकरून भारतासारख्या देशात पुरुष हा कुटुंबाचा प्रमुख मिळवता घटक समजला जातो. म्हणजेच एका पुरुषाला नोकरी देणे हे एका सबंध कुटुंबास मार्गी लावणे असे समजतात. माझ्या स्वतःच्या अनुभवाप्रमाणे नवऱ्याबरोबर राहून संसार व नोकरी करणाऱ्या स्त्रीला तर 'तुमचा पगार म्हणजे काय, पॉकेट मनी!' असे म्हटले जातेच. परंतु एकटे राहून मुलांचे पोट भरणाऱ्या स्त्रीच्या मिळकतीकडेही असूया व तिरस्कार याच दृष्टीकोनातून पुरुष-सहकारी बघतात. 'माझ्या बायकोला नोकरी करण्याची गरज नाही.' असे अभिमानाने म्हणणारे हजारो पुरुष सापडतात. याचे कारण त्यांच्या मते नराला खुश ठेवून स्वतःची व स्वतःच्या पिल्लांची अन्न-वस्त्र-निवारा ही गरज भागविणे हेच मादीच्या आयुष्याचे सार्थक असते.

आर्थिकदृष्ट्या स्त्रीला परतंत्र करणारा आणखी एक मोठा घटक म्हणजे मर्यादित शिक्षणसंधी. एका आईबापास एक मुलगा व एक मुलगी असेल, आणि त्यांची आर्थिक परिस्थिती दोघांनाही शिक्षण देण्याइतकी नसेल, तर डोळे झाकून कुणीही सांगेल - मुलीला लग्न होण्यापुरते शिकवणार, मुलगा वकील, डॉक्टर, इंजिनीअर, हेडक्लार्क वगैरे व्हायला पाहिजे.' येथे कुणाला अधिक डोके आहे ही गोष्ट अलहिदा. आणि मुलगा कितीही वेळा नापास झाला तरी त्याच्या शिक्षणावरच पैसा खर्चला जाणार. येथे आई-बाप सोयीची गैरसमजूत करून घेतात की कुठल्या तरी दुसऱ्या एका मुलावर असाच पैसा खर्च होतो आहे, जो आपल्या बिनशिकलेल्या मुलीचे पोट भरेल. या प्रश्नावर तोडगा - फुकट पाहिजे तितके शिक्षण सर्व नागरिकांना उपलब्ध करणे. आपल्या देशाच्या सध्याच्या हलाखीच्या स्थितीत हा पर्याय जवळजवळ अशक्य असल्याने शैक्षणिक कुपात्रतेने निर्माण होणाऱ्या पक्षपाताला भारतीय स्त्रियांना आणखी बऱ्याच पिढ्या तोंड द्यावे लागेल असे दिसते आहे.

### पारंपरिक संस्कार

वरील फरकांच्या आर्थिक कारणांनंतर सर्वात मोठा बागुलबुवा उभा राहतो तो हा की स्त्री-पुरुषांवरती पारंपरिकरित्या झालेले हजारो वर्षांचे संस्कार. कुठल्याही का गंडामुळे असो, बहुतेक पुरुषांची आपल्याहून अधिक हुशार, गुणवान, अधिक पैसे मिळवणाऱ्या मशहूर स्त्रीकडे बघण्याची दृष्टी तिरस्काराची असते. तिच्यात असलेल्या इतर उणिवा व दोष ते सतत हुडकून काढतात. ती जर त्यांची स्वतःची बायको नसेल तर मग तिचा नवरा हा नेहमीच बिचारा असतो. ती उत्तम व यशस्वी इंजिनीअर, शास्त्रज्ञ, मंत्री, व्यापारी वगैरेवगैरे आहे याकडे दुर्लक्ष करून, तिला स्वयंपाक येत नाही व तिच्या नवऱ्याच्या सदऱ्याची बटणे शिवता येत नाहीत, असल्या फालतू गोष्टींकडे ते लक्ष वेधू बघतात. त्या नवऱ्याला स्वयंपाक किंवा बटणे शिवणे या गोष्टी येत नाहीत त्याच्याबद्दल टीका करण्याचे कुणाच्या मनात येत नाही. बरे, ती स्त्री जर त्यांचीच बायको असेल तर एखाद्या विशेष किंमती व निरनिराळ्या ट्रिक्स करणाऱ्या कुत्र्याकडे पहावे तरे कौतुकाच्या व अभिमानाच्या दृष्टीने ते तिच्याकडे पाहतात. तिची गुणवत्ता ही त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे एक भूषण होते. अपवादात्मक पुरुष किंवा नवरे नाहीत असे मुळीच नाही. माझे आई-बाप या सर्वास अपवाद होते. अमुक गोष्टी पुरुषानेच करायच्या असतात, तर अमुक स्त्रीनेच अशा मूर्ख गोष्टी आम्हाला शिकवल्या गेल्या नाहीत. ज्यावेळी ज्यास वेळ असेल त्यावेळी त्याने पडेल ते काम केले पाहिजे. घर सर्वांचे आहे. त्याच्या

जबाबदाऱ्या सर्वांनी उचलायच्या. आपापल्या क्षेत्रात मान्यवर असणाऱ्या दोघांनी एकमेकांच्या कामाआड येईल असे काहीही केले नाही. आईला कामानिमित्त घराबाहेर रहावे लागले तेव्हा बापाने आमच्या वेण्या घालण्यापासून घरचे सर्व केले. परंतु हे अपवाद मूळ नियम सिद्ध करण्यापुरते थोडे आहेत यात शंका नाही.

अर्थात ज्या स्त्रियांना घरकाम व मुले सांभाळणे याखेरीज काही करता येणे शक्य नाही त्यांनी हट्टाने घर सोडून चालू लागावे व मिळेल ती नोकरी करावी असे मुळीच नाही. परंतु त्यांना मिळणाऱ्या कपडालत्ता, घर व जेवण या गोष्टीमुळे ते सर्व करणे त्यांचे कर्तव्यच आहे, असे पुरुष व स्त्री दोघांनीही मानणे प्रत्येकाच्या व्यक्ती म्हणून जगण्याच्या आड येते. उद्या घरचे काम करण्यास एक बाई ठेवली, मुलांना नर्स ठेवली, एक अंगवस्त्र ठेवले तर त्या पुरुषाला लग्नाच्या बायकोवर करतो त्यापेक्षा कितीतरी अधिक खर्च पडेल. तेव्हा केवळ नोकरी करण्याइतके शिक्षण नाही म्हणून हाती आलेली गुलाम, असा बायकोविषयी काहीसा तुच्छतापूर्वक दृष्टिकोन बदलून टाकण्यासाठी दोघांनाही स्वतःच्या कल्पना व स्वभाव यात मूलभूत बदल करावे लागतील.

## दुटप्पी नीती

स्त्रीच्या आर्थिक परावलंबनामुळे ती आपल्या मालकीची एक वस्तू, फारफार तर आपण पाळलेले जनावर असा तिच्याबद्दलचा भाव अगदी प्रेमळ व समजुतदार नवऱ्याच्या मनातही खोल घर करून असतो. याचे उत्तम उदाहरण म्हणजे स्त्री-पुरुष संबंधातील दुटप्पी नीती. एकनिष्ठता, विश्वास, त्याग इत्यादी सर्व स्त्रियांनी करावयाच्या गोष्टी हा अलिखित नियम, पुरुषच काय पण स्त्रियाही धरून चालतात. लग्न झालेले असूनही स्वतःची सेक्रेटरी, ऑफिसातील टायपिस्ट, विद्यार्थिनी, स्त्री-सहकारी यांच्याशी कमीअधिक सलगीचे, चेष्टामस्करीचे संबंध ठेवणारा आपला मित्र 'ग्रेट हिरो' आहे असे काहीशा असूयेने त्याच्याकडे बघणाऱ्या पुरुषांना वाटते. याउलट तशी वागणारी स्त्री विवाहित असो किंवा नसो, ती चहाटळ, भोचक, वाईट चालीची किंवा बदफैली आहे असे ते गृहीत धरून चालतात. कित्येक आया (माझ्या माहितीत चार शिकलेल्या आया व शिकलेल्या मुलींच्या आया) स्वतःच्या मुलींना त्यांच्या नवऱ्यांच्या इतर पोरींबरोबर केलेल्या चाळ्यांकडे दुर्लक्ष करायला सांगतात. 'अगं पुरुषच तो, असा वागायचाच.' असा त्यांचा भाव. जी गोष्ट मनूच्या काळात तीच आजही. ज्या काळी, स्त्रियांवर एक-पातिव्रत्य लादलं गेलं त्याकाळी, विशेषतः सुखवस्तु लोकांमध्ये, ज्याला आपली इस्टेट मृत्यूनंतर जायची तो आपल्याच रक्ताचा वारस असल्याची खात्री पटण्याचा तोच एक मार्ग होता. तोपर्यंत स्त्रीचे आयुष्यातील स्थान त्याला वारस पुरवणारी कातडी पिशवी यापलीकडे नव्हते, तेव्हा त्याने दुटप्पी नीतीचा पाठपुरावा करावा इतकेच नव्हे तर त्या नीतीला पोषक अशा कित्येक सुरस व चमत्कारिक गोष्टी स्त्री जातीबद्दल फैलावाव्या यात नवल नाही. परंतु सद्यस्थितीत स्त्री व पुरुष यांच्यातील फरकाला मूलभूत धक्का द्यायचा असेल तर स्त्रीच्या आर्थिक स्वातंत्र्याबरोबरच नैतिक स्वातंत्र्याची जबाबदारीही तिची तिलाच उचलली पाहिजे. समाज (मुख्यतः पुरुषांचा किंवा पुरुषांनी संस्कारित केलेल्या इतर स्त्रियांचा) सांगतो म्हणूनच केवळ अमुक एक गोष्ट करणे किंवा न करणे हे तिने स्वतःची स्वाभाविक प्रवृत्ती व सद्सद्विवेकबुद्धी यावर अवलंबून ठेवले पाहिजे.

## प्रेम आणि त्याग

यामध्ये वरचेवर आड येणारा एक अत्यंत गुळगुळीत झालेला बिचारा शब्द म्हणजे प्रेम. याचा मूळ किंवा मानसशास्त्रीयदृष्ट्या नक्की अर्थ काय असेल तो असो. परंतु, शतकानुशतके कथा, कादंबऱ्या, कविता, सिनेमा, कला, इतिहास सर्वांमधून त्याचा एक फारच विकृत अर्थ निर्माण झाला आहे. स्त्रीच्या बाजूने आपल्या तऱ्हेतऱ्हेच्या आवडीनिवडी पुरविणाऱ्या व आपल्याला आधार देणाऱ्या व्यक्तीबद्दल वाटणारी उपकृत वृत्ती असा त्या भावनेचा तोंडावळा अधिक आहे; तर पुरुषाकडून आपल्यावर अवलंबून असणाऱ्या, आज्ञाधारक व चांगल्या प्राण्या-बद्दल वाटणारी अनुकंपा असा असतो. खरोखर पाहता प्रेम व उपकार या दोन भावना परस्परविरोधी असताना एकीची दुसरीशी गल्लत कशी झाली किंवा केली गेली हा वाङ्मयीन इतिहासाचा एक खंड कुणीतरी 'स्वतंत्र' स्त्रीने जरूर लिहावयास हवा. त्यात किती निरनिराळ्या व कैक वेळा तिरस्करणीय भावना प्रेमाच्या नावाखाली वावरत असतात ते उघड करायला हवे. सर्वसाधारण पोषक-अवलंबित या संबंधात सर्रास सापडणाऱ्या



अनुक्रमणिका

सॅडी-मॅसोचिस्टिक रंगाला (दुसऱ्याला आपल्या तालावर नाचवणे किंवा स्वत: दुसऱ्याच्या तालावर नाचणे यात वाटणाऱ्या आनंदाला) प्रेम म्हणायला कुणालाच गैर वाटत नाही. साधे उदाहरण घ्या. एखाद्या स्त्रीने लग्नानंतर आपले नाव बदलून पुरुषाचे घेतले पाहिजे यात प्रेमाचा संबंध आलाच कुठे? एखाद्याचे दुसऱ्यावर प्रेम असल्यास कुणी कुणाचे नाव कशाला लावायला हवे व हवे असल्यास ते स्त्रीनेच पुरुषाचे लावले पाहिजे हा हट्ट का? तसेच बारीकसारीक इतर गोष्टीतही कित्येक शतके प्रेमासाठी स्त्रीने अमुक गोष्टी करायच्या असतात हे पुरुषांनी तिच्या डोक्यात ठासून भरले आहे. जेव्हा खुद्द उदरभरण व कपडा-निवारा यासाठी स्त्रीला पुरुषावरच अवलंबून राहायला पाहिजे ही परिस्थिती बदलली तेव्हा तिला असल्या गुलामगिरीत अडकवण्यासाठी ज्या नव्या क्लुप्त्या त्याने शोधून काढल्या त्यात 'प्रेमा'ची ही व्याख्या सर्वात डोकेबाज व सर्वात प्रभावी क्लुप्ती आहे यात शंकाच नाही. ही सर्वव्यापी व्याख्या, स्त्रीने पुरुषास चहा करून देणे, त्याची कपबशी विसळणे येथून त्याचे पाय रगडणे, त्याचा मार खाणे इथपर्यंत पसरू शकते! 'प्रेमा'साठी त्याग हा महत्त्वपूर्ण घटक बनण्यासही पुरुषांनी त्या भावनेची नवीन बनवलेली व्याख्याच करणे होते. हा त्यागही स्त्रीनेच करायचा असतो व तो स्वतःचे नाव, नोकरी, घरदार, मित्रमैत्रिणी, आप्तेष्ट वगैरेपासून तो साडी, दागिना, दुपारची झोप इथपर्यंत कशाचाही असू शकतो. याचा परिणाम मुळात अनिष्ट व व्यक्तिस्वातंत्र्यविरोधी अशा कित्येक प्रवृत्तींना उदात्त व सर्वांना गोड वाटेल असे रूप देण्यात झाला. या फसवेगिरीस बळी पडणाऱ्या बहुसंख्य स्त्रिया पाहिल्या की या सर्वोत्कृष्ट क्लुप्तीबद्दल जितका तिरस्कार तितकाच आदर वाटतो हे खरे.

### मातृत्व आणि स्वातंत्र्य

स्त्रीला आता बऱ्याचशा मूलभूत प्रश्नांची उत्तरे परत तयार करायला हवीत. केवळ आपल्याला मुलांना जन्म देणे अपरिहार्य आहे म्हणून बालसंगोपनाचे कार्य आपणच केले पाहिजे काय? कित्येक स्त्रिया केवळ आया आहोत म्हणूनच ते काम करण्यास आपण पात्र ठरतो असे धरून चालतात. हे चूक आहे. याचा पुरावा त्यांनी वाढवलेली मूर्ख, अरेरावी, समाजकंटक, दुष्ट, श्रद्धांध मुलेच होत. मुलांना वाढविण्यास लागणारे शहाणपण, समंजसपणा, शांतपणा, सहनशीलता, सुव्यवस्थितपणा, सामाजिक जागृती हे सर्व गुण काही दुधाबरोबर, मातृत्वाबरोबर, नैसर्गिकपणे उपजत नाहीत. सुधारलेल्या पाश्चिमात्य देशात सामुदायिक मुदपाकखाना, पाळणाघर वगैरेची मागणी स्वातंत्र्य-लढ्यातील स्त्रियांनी केलेली आहे. आपल्या देशात जरी आर्थिक कारणांमुळे हे सर्व शक्य नसले तरी पुढे मागे या सुधारणा सामाजिक घटनेमध्ये कराव्या लागतील. हे स्वातंत्र्य इच्छिणाऱ्या स्त्रियांनी डोळ्यासमोर ठेवले पाहिजे. या सुधारणांस विरोध करणाऱ्या लोकांना त्यांच्या हुशार पूर्वजांनी सुंदर सुंदर सुभाषिते वगैरे पुरवली आहेतच. (जननी जन्मभूमिश्च, जिच्या हाती पाळण्याची दोरी, आई म्हणोनि कोणी इ.इ.) पण त्यांचा मुख्य आक्षेप हा की या सुधारणांमुळे कुटुंबव्यवस्था व विवाहसंस्था कोलमडून पडतील. याला उत्तर एकच. पडेनात का, त्यात काय बिघडले? प्रत्येक कोलमडून पडणाऱ्या संस्थेची जागा नवीन जीवनपद्धती व नवीन विचारसरणी यांच्याशी अधिक सुसंबद्ध असणारी संस्था घेत असते. (उदाहरणार्थ - एकत्र व विभक्त कुटुंबपद्धती) तसेच याही संस्थांच्या बाबतीत घडेल व तेच इष्ट आहे.

वरील सर्व उदाहरणास व विचारसरणीस आपल्या देशातील समाज - स्त्रिया आणि पुरुष किती प्रतिकूल आहेत हे दर्शविणारी पुढील दोन उदाहरणे-

१.घरकामास येणारी बाई. मधून मधून गैरहजर. कधी रडून डोळे सुजलेले. सतत पैसे उसने घेणार. सात-आठ पोरे. तब्येत यथातथाच. अंगावर चार घरमालकिणी देतात म्हणूनच केवळ धडुते. एक दिवशी आली, तो डोळा सुजून काळानिळा झालेला.

'काय ग? कुठे दारावर आपटलीस का काय? थांब, औषध लावते.' ती रडायला लागते.

'दुखतं का फार? झालंच आता.'

'छे हो ताई! काल फार मारलंन कारभाऱ्यांनी!'

'काय?'

'हां. पिऊन आले की तसंच करतात.'

'मग ऐकून कशाला घेतेस? घाल लाटणं डोक्यात.'

तिच्या रडण्यात हसू उमटतं.

'काय सांगता! असं कुठं झालंय! तुमी शिकलेले लोक. तुमचे कारभारी माया लावतात. तुमाला ते काय ठावं नाय तेच बरं.'









'तेच बरं काय!माझ्यावर हात उचलायची काय त्याची छाती!'

ती जोरजोरात हसते.

'काय! उचलाल हात त्यांच्यावर?'

'तर!' मी मजाच करतेय असं वाटून ती कामाला लागते. मी मागोमाग जाऊन विचारते. 'केशरबाई, तू मिळवती आहेस, तुझी तू मुखत्यार आहेस. कशाला नवऱ्याला पोसतेस नि दारूचे पैसे देतेस? दे हाकलून एक लाथ मारून!' बोलता बोलता मला तिच्या नवऱ्याऐवजी तिचाच राग यायला लागतो.

ती काम थांबवून मोठ्या तत्त्वज्ञानी दृष्टीने माझ्याकडे बघते. 'ताई! जल्माच्या गाठी या. परमेश्वराने बांधलेल्या अशा कोण तोडतात चार चपराकी मारल्या म्हणून?'

यालाच बहुतेक भारतीय नारीची उज्ज्वल परंपरा म्हणत असावेत. आणि पुरुष हा परमेश्वर आहे यात शंकाच नाही.

२. एका औद्योगिक संघाने घडवून आणलेली चर्चा - हजर : दोन मानसशास्त्रज्ञ (पुरुष), एक संघाचा सेक्रेटरी (पुरुष), एक समाजकल्याण कार्यकर्ता (पुरुष), एक डझन मध्यमवर्गीय बायका (स्वतः, नवरा व बाप यांचे उत्पन्न मिळून रु. १००० ते २००० बायकांची वर्गवारी पुढीलप्रमाणे - दोन सेक्रेटरी, दोन रिसेप्शनिस्ट, एक डॉक्टर, एक पत्रकार, एक लेखक, (मी!) एक शिक्षिका, चार गृहिणी. वये : २५ ते ३५. संघाचा सेक्रेटरी, 'स्त्री मुक्ती चळवळ आणि भारतीय नारी' या विषयावर चर्चेची सुरुवात करायला मला सांगतो. त्याआधी तो म्हणतो, 'आपण प्रत्येकाने स्वतःची ओळख करून द्यावी.' पुरुष उभे राहून सांगतात : मी अमुकतमुक, मानसशास्त्रज्ञ. मी सोम्यागोम्या कापसे, सेक्रेटरी. मी गुंडो धोंडो आवळे, समाजकल्याणवाला. वगैरे वगैरे. मग स्त्रियांची पाळी. तीन अपवाद सोडून (मी, एक सेक्रेटरी, व शिक्षक) बाकी सर्व स्त्रिया : 'मी सौ. येऱ्या गबाळे. माझे यजमान हे ते करतात.' वगैरे.

याचा उल्लेख करून मी म्हणाले की या परिस्थितीत भारतीय स्त्रीची स्वातंत्र्याची कल्पना परत तपासून पाहिली पाहिजे, नाही का? उत्तर : आम्ही प्रेमाखातर आमचे नाव, व्यक्तिमत्त्व वगैरे त्याग केला आहे. (येथे पुरुषांनी हा त्याग केला नाही यावरून त्यांचे त्यांच्या बायकांवर प्रेम नाही असे समजायचे का, हे मी विचारताच 'तुमचं लग्न झालंय का?' हा प्रश्न. एक सोडून दोन, असे म्हणताच मजबद्दल तुच्छता.)

**स्वातंत्र्य आणि जबाबदारी**

त्यांचे सर्वांचे म्हणणे पडले की भारतीय स्त्रीला हवे तेवढे स्वातंत्र्य मिळाले आहे 'हे कुठले?' असे मी विचारले. उत्तर : आपल्याला 'बघून' गेलेल्या पुरुषांशी लग्न करायचे की नाही ते आईबापांनी त्यांना विचारले व 'नाही' म्हणायचे स्वातंत्र्य त्यांपैकी बहुतेकींना मिळाले. एवढेच काय, (प्रचंड धाडस!) एकदोघींनी दोन-तीन जणांना नको देखील म्हटले. असो. तरी हे स्वातंत्र्य मिळूनही, पुरेसे व हवे तितके मिळूनही त्यांच्यात व त्यांच्या जीवनपद्धतीत काहीही बदल नाही. कारण देश/देव/मुले/पती/प्रेम यांच्यासाठी आपल्या स्वातंत्र्याचा त्याग करण्याकडे त्यांची उदात्त प्रवृत्ती अधिक आहे. हे ऐकून निराश होण्यापलीकडे मी तरी काय करणार? स्वातंत्र्याची दुसरी बाजू जबाबदारी. स्वतःची आर्थिक, सामाजिक, नैतिक, नैसर्गिक मूल्ये स्वतः घडवून त्यांना प्रत्यक्षात आणण्याची जबाबदारी. ती पेलण्याची अवघड, कष्टप्रद, सतत आत्मशोधनाची कास धरायला लावणारी कामगिरी करण्याची या स्त्रियांना भीती वाटते. ती भीती दूर सारून स्वतःला सर्व बाजूंनी मिळणारी, वेढणारी सुरक्षितता तोडून टाकायला त्या नाराज असतात. या भीतीची व दुबळेपणाची जाणीव कुठेतरी आत असल्याने, प्रेम, त्याग, अशा गुबगुबीत व 'उदात्त' शब्दांचा त्या आधार घेत राहतात.

आपल्या देशात स्त्रियांना खरेखुरे स्वातंत्र्य मिळण्यास आपला आर्थिक मागासलेपणा हे जसे प्रमुख कारण आहे, तसेच आपल्या कल्पनांचा, मनोवृत्तीचा व जीवनपद्धतीचा भयानक प्रतिगामीपणा हेसुद्धा आहे. जोपर्यंत स्त्रिया स्वतःचा बौद्धिक आळस झटकून, पुढे केल्या जाणाऱ्या प्रत्येक शब्दाला, संस्थेला, कल्पनेला स्वतःच्या अनुभवांचा, खात्रीचा, बुद्धीचा कस लावून तपासून पाहणार नाहीत, तोपर्यंत भारतीय स्त्रीपुढे पुरुषनिर्मित तरी किंवा स्वनिर्मित तरी, अंधारच. बंदीगृहातला. मग ते बंदीगृह केशरबाईच्या अंधश्रद्धेचे असो किंवा सुशिक्षित स्त्रियांच्या 'प्रेमा'चे असो!

(मागोवा, स्त्रीमुक्ती विशेषांक, सप्टेंबर ७३ च्या सौजन्याने.)



# कम्युनिस्टाचा जरा मुलामा काढा की...
## लेनिन

स्पष्ट तात्त्विक भूमिकेवर आणि योग्य संघटनात्मक पायावर आधारलेली जागृती व चळवळ स्त्रीसमूहांमध्ये उभी करणे, हा कम्युनिस्ट पक्षाच्या कार्यातला महत्त्वाचा प्रश्न आहे. पण आपण स्वतःला फसवण्यात अर्थ नाही. आपल्या पक्षाच्या बऱ्याचशा विभागांमध्ये या प्रश्नाविषयीची समज स्पष्ट नाही कम्युनिस्टांच्या नेतृत्वाखाली श्रमिक स्त्रियांची सामूहिक चळवळ उभी करण्याबाबत त्यांचा दृष्टिकोन उदासीन, 'बघू, काय होतं ते' असा असतो. अशी चळवळ उभी करून तिला योग्य दिशेला नेणे किती महत्त्वाचे आहे हे त्यांना कळत नाही. खरेतर पक्षाच्या कामापैकी अर्धे अधिक काम हे असायला हवे...

स्त्रियांमध्ये प्रचार व आंदोलने करणे आणि त्यांच्यात क्रांतिकारक जागृती करण्याचे काम करणे हे लोक दुय्यम समजतात. ते फक्त स्त्री-कार्यकर्त्यांचे काम आहे असे समजतात आणि स्त्रीचळवळ पुरेशी वाढत नाही म्हणून फक्त स्त्री-कार्यकर्त्यांनाच दोषी ठरवले जाते. हे चूक आहे, साफ चूक आहे. हा चक्क अलगतावाद आहे. स्त्री व पुरुष यांच्यातल्या समानतेची ही कल्पना उफराटी आहे. (खरे तर स्त्रियांकडे पक्षाने खास लक्ष द्यायला पाहिजे - अनुवादक.) पक्ष-विभागांच्या या चुकीच्या कल्पनांच्या मुळाशी स्त्री व तिची कर्तबगारी यांना कमी लेखण्याची वृत्ती आहे, दुसरे तिसरे काही नाही. दुर्दैवाने आपल्या बऱ्याच कॉम्रेडस्‌विषयी आजसुद्धा आपण तसे म्हणू शकतो की, 'कम्युनिस्टाचा जरा मुलामा काढा की एक असंस्कृत माणूस दिसू लागेल.' अर्थात यासाठी तुम्हाला सगळ्यात नाजूक जागा खरवडायला लागतील. उदाहरणार्थ, स्त्रियांविषयी त्यांची वृत्ती! याला काही पुराव्याची गरज आहे का? फालतू, कंटाळवाण्या, वेळ आणि शक्ती खाणाऱ्या घरकामासारख्या कामात स्त्री रगडली जात असताना शांतपणे तिच्याकडे पाहत बसणारा पुरुष हे नेहमीचे दृश्य घ्या. तिचा उल्हास मावळत जात असतो, मन मारले जात असते, हृदयाचे ठोके सावकाश होत असतात आणि तिची इच्छाशक्ती नष्ट होत असते आणि हा मात्र पाहत असतो. हे सांगायला नकोच की मोलकरणीवर सगळे घरकामाचे व मुलांचे ओझे ढकलून देणाऱ्या उच्चभ्रू महिलांविषयी मी बोलत नाही. मी जे म्हणतो आहे ते बहुसंख्य स्त्रियांविषयी, कामगारांच्या बायकां-विषयीसुद्धा खरे आहे; मग त्या दिवसा कारखान्यात काम करून पैसे मिळवत असल्या तरी.

फार थोडे नवरे अगदी कामगारवर्गातले नवरेसुद्धा, असा विचार करत नाहीत की या 'बायकी कामां'मध्ये जर आपण मदत केली तर बायकांची किती काळजी जाईल, किती ओझे कमी होईल! पण छे:! असे करणे 'पतिदेवाच्या विशेष स्थाना'ला कसे शोभेल? त्याला विश्रांती आणि आराम पाहिजे असतो. रोजचे घरकाम म्हणजे हजारो क्षुद्र कामांकरता काणाकणाने झिजून स्त्रीने केलेला त्याग. तिच्या मालकाचे, स्वामीचे सनातन हक्क नकळत शिल्लक असतात. वस्तुनिष्ठ दृष्टीने पाहता, ही गुलाम स्त्रीसुद्धा सूड घेत असते. तो ती अप्रत्यक्षपणे घेते. तिचा मागासलेपणा आणि नवऱ्याच्या क्रांतिकारी कार्याविषयीचे अज्ञान यांच्यामुळे त्याच्या लढण्याच्या निर्धारावर प्रतिकूल परिणाम होतो. ह्या गोष्टी वाळवीसारख्या हळूहळू व नकळत पण निश्चितपणे त्याचा निर्धार पोखरत असतात. मला कामगारांच्या जीवनाची माहिती आहे, आणि फक्त पुस्तकातून नाही. स्त्रियांमधील आणि सर्वसाधारण जनतेतील आपल्या राजकीय कार्याचा एक भाग म्हणून पुरुषांमध्ये मोठ्या प्रमाणात आपण शैक्षणिक कार्य करत असतो. गुलाम-मालकाचा दृष्टिकोन आपण मुळापासून उखडून टाकला पाहिजे, पक्षातून व जनतेतून. हे एक आपले राजकीय काम आहे; कष्टकरी स्त्रियांमधल्या कार्याकरता अनुभवी व विचारांनी पक्क्या असलेल्या स्त्री व पुरुष कॉम्रेड्‌सचा एक संच तयार करण्याइतकेच महत्त्वाचे व तातडीचे हे काम आहे.

(मागोवा, स्त्री-मुक्ती विशेषांक,
सप्टेंबर ७३ च्या सौजन्याने.)



अनुक्रमणिका








# तरुणांनी निर्विकार प्रेम कसे करावे

## उरळी कांचन युवक शिबिरात झालेली एक उपयुक्त प्रश्नोत्तरी

आचार्य दादा धर्माधिकारी

प्रश्न - कार्यकर्त्यांचे स्वतःचे विकार, दोष आणि उणिवा कामाच्या आड येत असतात आणि कामावर त्याचा प्रभाव पडतो. असे कोणते विकार आहेत? त्यांचे कसे निराकरण करायला हवे?

दादा - हा मोठा गुंतागुंतीचा प्रश्न आहे. याचे निश्चित उत्तर काही तुम्हाला मिळणार नाही. परंतु या प्रश्नाचा विचार करणे आवश्यक आहे.

अनेक वर्षांपासून आपल्या देशातल्या आणि दुसऱ्या देशांतल्याही माणसांसमोर हा प्रश्न आहे की समाजसेवा आणि आत्मोन्नती ही एकच साधना आहे, की या दोन भिन्न साधना आहेत? म्हणजे माणसाला स्वतःच्या मुक्तीकरिता जे करायचे आहे ते आणि समाजसेवेकरिता जे करणे आवश्यक आहे ते, या दोन साधना आहेत की या दोन्ही मिळून एक होऊ शकतात? आतापर्यंत लोकांनी मानले की आपल्या व्यक्तिगत उन्नतीकरता निरनिराळी साधना केली पाहिजे. व्यक्तिगत उन्नतीकरता जी साधना करायची तिचे नाव ठेवले धर्म आणि समाज उन्नतीकरता जी साधना करायची तिचे नाव ठेवले लोककार्य, सार्वजनिक कार्य, लोकसेवा. प्रश्न असा येतो, की त्यांच्यात विरोध आला तर काय करावे? कारण या दोन भिन्न जर मानल्या तर केव्हातरी आत्मोन्नती आणि समाजसेवा किंवा समाजोन्नती यांच्यामध्ये विरोध येणार. मग त्यांच्यात श्रेष्ठ काय? माणसाने काय स्वीकारावे? हा प्रश्न प्रत्येकाच्या समोर नेहमी आला आहे.

### विकारांचे शमन

यातून एक मार्ग आहे - तुमच्या प्रश्नातच. प्रश्न असा आहे की माणसाचे जे विकार आहेत ते लोककार्याच्या आड येतात. तेव्हा त्या विकारांचे शमन कसे व्हावे? एक गोष्ट मी तुम्हाला पूर्वी सांगितली आहे की चारित्र्याचा विकास एकट्यात काही होत नाही. आणि गुणांचा संबंध जर चारित्र्याशी असेल तर गुणविकास हा एकट्यात काही येणार नाही. शक्तीचा विकास एकट्यात होऊ शकतो. ध्यान एकांतात होऊ शकते. तेव्हा माणसाला स्वतःशी जुळवून घेता आले पाहिजे. टु बी ॲट पीस वुईथ वन सेल्फ.

माणसामध्ये, स्वतःच्या आत अंतर्गत विरोध आहे. स्वतःमध्ये संघर्ष आहे, कॉन्फ्लिक्ट आहे. तीन प्रकारचे विरोध मानवाशी संबंधित आहेत. माणसाचे अंतर्गत विरोध, माणूस आणि इतर माणसे यांच्यातले विरोध व माणूस आणि सृष्टी यातील विरोध. अशा विरोधांमध्ये माणूस सध्या आहे.

### वृत्तीचे साक्षित्व

हा जो प्रश्न आहे, हा पहिल्या प्रकारचा म्हणजे माणसाच्या अंतर्गत विरोधांचा आहे. तर याच्याकरता ध्यानाच्या प्रक्रिया अनेक सांगितल्या आहेत. यापैकी कुठलीही एक प्रक्रिया निभ्रांत नाही. याचा एकच मार्ग आहे, त्याला मार्ग म्हणायचेच असेल तर, 'स्वतःकडे वळून पाहायचे.' हा काही विधी नव्हे ही केवळ एक सावधानता, साक्षित्व. पुढे या साक्षित्वाच्याही वर जावे लागेल. तो अध्यात्माचा विषय आहे. त्याच्याशी तुम्हाला सध्या कर्तव्य नाही. पण स्वतःच्या वृत्तींचे साक्षित्व त्याला आले पाहिजे. या साक्षित्वातून एक तटस्थपणा येतो आणि तटस्थपणा म्हणजे विनयशीलता. जो नम्र माणूस असतो तो तटस्थ असतो. तटस्थ म्हणजे स्वतःकडे सुद्धा तिऱ्हाइतपणाने पाहू शकणारा. तिऱ्हाइताचा अर्थ असा की जे आहे त्याला दोषही देत नाही आणि स्तुतीही करीत नाही. जसे आपण डोंगराकडे पाहतो, तसे तिऱ्हाईतपणे, तटस्थपणाने स्वतःकडे पाहता आले पाहिजे. हिला बुद्धीची नम्रता, ह्युमिनिटी असे म्हणतात. याने स्वतःचे दर्शन होते माणसाला. मग ते कितीही हिडीस असो, कितीही विद्रूप असो, त्याचा तिरस्कार करू नये. यातून एक मोठी शक्ती लाभते की इतरांच्या दोषाविषयीचा तिरस्कार नाहीसा होतो मनातून. ही एक गोष्ट.

### आत्मग्लानी वाईट

यातून दुसरी गोष्ट ही लाभते की दोषांचे चिंतन घडत नाही, स्वतःच्या आणि दुसऱ्याच्याही. आता काय करू,

अनुक्रमणिका

माझ्यात कामवासना आहे. आता काय करू, स्त्री पाहिली की ...ा असे होते. आता काय करू, संपत्ती पाहिली तर असे वाटते की आपल्याजवळ असावी, किंवा उत्तम कपडे पाहिले की लोभ निर्माण होतो. छे: मी फार वाईट माणूस आहे...! यांतून आत्मग्लानी येते आणि आत्मग्लानी ज्या माणसामध्ये असते तो माणूस दुसऱ्यावर प्रेम करु शकत नाही. माणसाची त्याला ...दर नसते. कारण इतर माणसे आपल्यापेक्षा चांगली आहेत हे त्याला सहन होत नाही. लाज वाटते त्यांच्यात वावरण्याची. आपल्यासारखीच ही माणसे असती तर बरे झाले असते असे वाटते. तेव्हा गुण किंवा दोषाचे जजमेंट नको. म्हणून साक्षित्व पाहिजे हे मी म्हटले. या साक्षित्वामध्ये आत्मस्तुती किंवा आत्मनिंदा यापैकी काहीही नको, हे कठीण आहे. पण तुमच्या मनात जाम आहे. तुम्हाला साधण्यासारखे आहे. ज्याचे मन जरा-जरा ...ाले आहे, निबर झालेले आहे, ज्याचे संस्कारच हे झालेले ...हे की चित्तांत एक वृत्ती उठली की तिची निंदाच मना... ..., अन् ती दडपून टाकण्याचा विचार येतो, त्याला हे ...धणार नाही.

**...िकार दडपू नये**

तेव्हा याच्यातून दुसरी गोष्ट ही येईलकी विकार हा दडपता कामा नये. मग दडपता कामा नये, तर मग काय त्याच्या मागे जावे? तर मागेही जाता कामा नये. कंडेम्नेशन नाही नि इंडल्जन्स सुद्धा नाही. ही आहे तटस्थता. हा समोरचा डोंगर आता माझा नाही, तर मला काय करायचे आहे याच्याकडे बघून. काही उपयोगाचा नाही, असे काही मला वाटत नाही आणि 'माझा व्हावा' असेही वाटत नाही, तर त्याच्याबद्दल लोभही निर्माण होत नाही अन् त्याच्याबद्दलचा तिरस्कारही नाही. ही मोठी आगळी प्रक्रिया आहे. परंतु हेच वास्तविक ध्यान आहे. ते तुम्हाला कुठे मिळेल? जे कृष्णमूर्तींची भाषा जरा अवघड आहे. तर त्यांत त्या साक्षित्वाचे स्वरूप तुम्हाला बघायला मिळेल. हे ध्यान विकार नाहीसे करण्याकरिता आहे. विकार दडपण्याकरिता ध्यान निराळे. विकार दडपले जावेत आणि गुण उफळले जावेत ही मुक्ती नव्हे. हे निराळेच. मी आधी म्हटले ते साक्षित्व नाही.

**निरोगी चित्त**

यातून एक स्वस्थ चित्त निर्माण होते. व स्वस्थ चित्ताला इतरांचे विकारही निंदनीय वाटत नाहीत. विनोबा आपल्याला सांगतात की गुणांचे ध्यान करावे. दुसऱ्यांच्या दोषाकडे पाहू नये. हा अभ्यास आहे. विनोबा म्हणतात ती ही उपासना आहे. पण साक्षित्वातून आणि तटस्थपणातून निर्माण होणाऱ्या शुद्ध चित्ताला या अशा अभ्यासाची अथवा उपासनेचीसुद्धा गरज नाही. स्वतःमध्ये सहजच ते होते. बाहेर अशी काही उपासना नाही करावी लागत, की दुसऱ्याचे दोष पाहू नयेत. त्याचे गुणच तेवढे पहावे, म्हणजे त्याचे गुण आपल्या ठिकाणी येतील. दोष येणार नाहीत. तर आपल्या गुणांनीही हुरळून जाऊ नये, आपल्या दोषांनी व्याकूळ होऊ नये. हे साक्षित्व आहे. याला तटस्थपणा म्हणतात. स्वतःच्या बाबतीत माणूस तटस्थ होऊ शकला पाहिजे म्हणजे विकार दाबावे लागणार नाहीत आणि त्यांचे ध्यानही राहणार नाही. पाहिले मुलीकडे, आला मनामध्ये विकार. पहावे की आला म्हणजे काय? काय वाटते मला, काय करावेसे वाटते, त्याचे स्वरूप काय? यात अर्धा जीव निघून जातो त्या विकाराचा. 'हा नको, हा नको' म्हणाल तर तो जोर करील. जसजसा दाबण्याचा प्रयत्न कराल तसतसा तो उफाळतो. त्याच्याकडे नुसते बघत राहिला तुम्ही की हा तरंग आलाय आता, काय करायचे नाही, करु शकत नाही मी. परंतु आलाय खरा.' तर या पद्धतीने हळूहळू तुमच्याशी त्या विकाराची मैत्री होईल अन् तो त्रास देणार नाही. हे एक.

**विकारमुक्तीची इच्छा नको**

प्रश्न - यातून सहजच हळूहळू विकार नाहीसे होत असतील?

दादा - हो, परंतु त्याचीही इच्छा किंवा अभिलाषा धरू नये. विकार नाहीसे झाले पाहिजेत हे ध्यान नको. मनामध्ये जर संकल्प असला तर लक्ष विकाराकडेच राहिले ना? म्हणून इतर ध्यानाच्या पद्धती आणि कृष्णजींची पद्धती यांपैकी कृष्णजींचे मी लेटेस्ट मानतो. त्याचे कारण हे आहे. आजच्या सायकॉलॉजीच्या पुढचे आहे हे. सायकॉलॉजी आणि सायकिॲट्री आज जिथपर्यंत गेली आहे, विज्ञान जिथपर्यंत पोहोचलेले आहे त्याच्या पुढचा माणूस आहे हा आजचा. ही सायकॉलॉजी आणि हे विज्ञान यांचे कुठे पर्यवसान शेवटी होईल तर हा माणूस म्हणतो त्यात होईल. पण ही प्रक्रिया नव्हे. हे एक सामान्य सायन्स. यातून ज्याचे त्याला स्वतःपुरते निवडावे ते लागेल. मग प्रत्येक माणसाचे विशेष राहील.

सामान्य धोपट मार्ग सांगितला 'असं करा रे,' याला अर्थ नाही. सर्वांसाठी सरसकट एकच सामान्य मार्ग तर तसलाच होऊ शकतो की - 'आपल्या श्वासोच्छ्वासाकडे लक्ष ठेवा किंवा आपल्या नाकाच्या शेंड्याकडे लक्ष ठेवा,' म्हणजे एकाग्रता शिकवण्याची प्रक्रिया होऊ शकते. पण सावधानता साधण्याची काही प्रक्रिया राहू शकत नाही. चळवळीतल्या माणसामध्ये एकाग्रता येते. आणि सावधानता कमी होते. कारण त्याखेरीज चळवळीला जोम येत नाही. मी आपली सगळी शक्ती आणि चिंतन यांत लावीन. असे आहे ना लोकसेवेच्या प्रतिज्ञा-पत्रकात? म्हणजे दुसरीकडे मेला तो. दुसरीकडे लक्षच देत नाही. एकच डोळा आहे. तर याची दृष्टीही सार्वत्रिक राहत नाही.

### सार्वत्रिक सावधानता

हवे काय? सार्वत्रिक सावधानता. एकनिष्ठता तर हवीच आणि तिच्याबरोबर सार्वत्रिक सावधानता. हे साक्षित्वातून येते. याचा परिणाम असा होईल की सगळ्या इंद्रियांची संवेदना सूक्ष्म बनेल. इंद्रिये बथ्थड नाही होणार की दुसरीकडे लक्षच नाही, ऐकूच येत नाही, ॲबसेंट माईंडेड आहे. असे नाही होणार. सगळ्या इंद्रियांची संवेदना सूक्ष्म होईल. इतरांना जे ऐकू येणार नाही ते त्याला ऐकू येईल. इतरांना ज्याचा वास येणार नाही तो वास त्याला येईल. कारण शुद्ध होतात ना इंद्रिये! इंद्रिये जितकी शुद्ध होतील तितकी संवेदनशील झाली पाहिजेत ना? ती जड कशी होतील? गाण्याची गोडी जशी याला कळेल तशी इतरांना कळणार नाही. वाद्याची जी माधुरी याला कळेल तशी इतरांना कळणार नाही.

### आणि एकनिष्ठता

प्रश्न - तुम्ही सांगितले, सार्वत्रिक सावधानता व एकनिष्ठता येईल. एकनिष्ठता कशी येईल?

दादा - इंटरेस्ट ज्या कामात असेल ते काम करतो तो. काम हे कर्तव्य किंवा समाजसेवा म्हणून स्वीकारलेले असावे. ते काम सांगितलेले असेल, वाटल्यास दुसऱ्याने, योजनाही कोणीतरी आखली असेल, कोणाच्याही पैशांनी, पण त्यात आपली आवड पाहिजे, प्रेरणा आवडीची पाहिजे, प्रेरणा मिशनची नसावी. प्रेरणा कर्तव्याची नको. तर आवडीची. यातून कामात जी एकनिष्ठता येते ती सहज येते. जशी मुलांना खेळात येते. एकनिष्ठेत प्रयास नाही. आनंद आहे. कुठलाही प्रयास नाही, सहज आहे ती एकनिष्ठता, कारण तिच्यात आपली आवड आहे, म्हणून मुख्य प्रेरणा इंटरेस्टची पाहिजे. विकार जर नाहीसे व्हायचे असतील तर त्यात इंटरेस्ट पाहिजे. कर्तव्याची भावना नाही. कर्तव्याची भावना वगैरे या सगळ्या गौण. मुख्य इंटरेस्ट, काम आवडीचे आहे. त्यात मन रमते असे व्हावे. त्या कामात मन गढून गेले पाहिजे. यातून अर्धेअधिक विकार कमी होऊन जातील. मूर्तीकार किंवा चित्रकार ज्यावेळी मूर्ती तयार करतो किंवा चित्र तयार करतो त्यावेळी विकार नसतोच कुठे. पण मूर्ती आणि चित्र हातावेगळे झाले की विकार आला. तसे आमचे काम काही अखंड चोवीस तास चालणार नाही. तेव्हा जेव्हा काम नसेल तेव्हा आमचे काय होईल? तिची कंटीन्युटी राहिली पाहिजे हेही मनात ठेवू नका. हा मनात अभिसंधी नको की ते टिकले पाहिजे. जी माझी वृत्ती आहे काम करताना, ती सतत टिकली पाहिजे असे तुम्ही म्हटल्याबरोबर, असे मनात आल्याबरोबर टाईमचा प्रवेश होतो, तुमच्या जीवनामध्ये टाईम फॅक्टर येतो. टिकली पाहिजे हे वेळेचे भान आहे ना? वेळाचे भान आले की जीवनाचे भान कमी होते. म्हणून तर वेळ हा जीवननाशक आहे असे म्हणतो ना आपण? त्याचे नावच काळ आहे. काळाचा प्रवेश जीवनात झाला की जीवनाचा नाश होतो. त्यामुळे आपल्याला असे करावे लागेल की कंटीन्युईटीची भावना सोडावी लागेल. अन् ही भावना जर नसली तरच कंटीन्युईटी राहण्याचा संभव फार. जे आवडीचे काम असते ते व्यर्थ जात नाही ना! त्याचे चिंतन चालते माणसाचे. सतत मन त्यात मुरलेले असते. जसे लहान मुलाचे खेळात गुंतलेले असते, तसे याचेही गुंतलेले असते. आणि मग विकार अधूनमधून आले तरी त्यांचा अंमल फारसा त्यांच्यावर राहू शकत नाही.

### क्षणिक आवेग

प्रश्न - आवड असली पाहिजे असे म्हटले तर भगतसिंग वगैरे जे फासावर गेले, ते सर्व आवडच म्हणावे लागेल?

दादा - तो आवेश होता. आवेश येतो ना? आवेश निराळा. आवेशामध्ये एखादी बाई विहिरीत उडी मारून जीव देते हा आवेश निराळा. तुमचे जे काम आहे ते सततचे काम






आहे. भगतसिंगाचे काम कसे होते? एक माणूस मारून टाकला, आता त्याचा परिणाम होईल तो सहन करू. ज्यावेळी माणूस आवेशात असतो त्यावेळी तो सगळे विसरतो. बेफाम झालेला असतो. जी बाई विहिरीत उडी घेते ती राजवाड्यातील असली तरी काय झाले! त्यावेळचा आवेश व संताप मुख्य आहे की नाही? त्यावेळी तिच्यासमोर राजवाडा नसतो. किंवा समजा एखाद्या पुरुषाचे आपल्या बायकोवर प्रेम आहे. राग आला, मारून टाकले तिला. त्यावेळी त्याला काही फाशीची कल्पना नसते. परंतु तो राग त्याचा सतत राहिला तर तो फासावर सुद्धा चढेल. आणि असे करतात काही लोक. जातात पोलिसात नि सांगतात की मी बायकोला मारून आलो आहे. तरी हे निराळे. हा आवेश निराळा. तुमचा मूळ प्रश्न आवेशाचा नाही. आवेशामध्ये माणूस विचार करतो हे निराळे. तो एकच विचार प्रबल होऊन जातो. बाकीचे विचार या विचारामध्ये सगळे विरून जातात.

आता जे कार्यकर्ते कर्तव्यनिष्ठेने येतील त्यांचे विकार कार्यातून कसे नाहीसे होतील हा विचार करावा लागेल. ज्या कार्याची आवड नसेल त्यात आपण जीवनाचे मुख्य कार्य म्हणून गुंतून राहू नये. त्या कामाला मदत करणे निराळे. त्या कार्याला हातभार लावणे निराळे. हे माझ्या जीवनाचे कार्य आहे, असे कार्य ज्यात आवड आहे तसेच असले पाहिजे. धंदा आवडीचा असला पाहिजे, रुचीप्रमाणे असला पाहिजे. इथपर्यंत आपण गेलो आहोत ना आता? तेव्हा त्यात आवडीचा प्रश्न मुख्य आहे. इंटरेस्ट ही मुख्य गोष्ट आहे.

व्यक्तिगत उन्नती म्हणजे आत्मोन्नतीकरिता आपण साक्षित्व व तटस्थपणा मानला नि आत्मोन्नतीला अनुकूल सामाजिक कार्य बनण्यासाठी आपण इंटरेस्टचे कार्य असावे हे बघितले. आता या दोहोंचा समावेश कसा करायचा हा प्रश्न आहे आपल्यासमोर. दोहोंमध्ये अविरोध साधायचा आहे ना?

रजनीश एक उदाहरण देतात, की माणूस म्हणतो मी पंचवीस वर्षे झाली त्याग करीत आहे. कसला त्याग केला, वैभवाचा त्याग केला, सुखाचा त्याग केला? तर तो म्हणाला की हे तर अजून दिसतेच तुमच्या मनामध्ये. त्या सगळ्या बंगल्यावर, वैभवावर लाथ मारली तुम्ही. पण ती लाथ तुमच्या डोक्यात आहे. म्हणून शांती मिळणार नाही. तर हे काम जे असेल ते आमच्या आवडीचे असले पाहिजे. आवडीच्या कमाकरिता आम्हाला त्याग नाही करावा लागत. तिथे कॉनफ्लिक्ट नाही. आम्ही जे करतो तो आमचा खेळ आहे, आमची गंमत आहे. आम्हाला फुटबॉल खेळताना धावावे लागते आणि घामाघूम होतो तर इट इज इन दि गेम. हा त्या खेळातला भाग आहे असेच वाटते. म्हणून मुख्य प्रेरणा आवडीची असली पाहिजे. समाजसेवेची नाही. आपण म्हणालो ना की सेवकवर्ग हा नको. मधला वर्ग आहे हा. तेव्हा आपल्यापुरते पहिल्यांदा पाहिले पाहिजे की काय कॉन्फ्लिक्ट राहू नये.

आता तिसरा मुद्दा. जे कर्तव्यभावनेने आले किंवा अवांतर प्रेरणांनी, दुसऱ्याच्या प्रेरणांनी आले असतील, 'हे मिशन आहे, सत्कार्य आहे' या भावनेने आले असतील, त्यांच्या ठिकाणी आवेश असेल, काही प्रसंगी उन्मादही असेल. हे फॅनॅटिक्स असतील. आवेश आणि उन्माद यांतील सूक्ष्म फरक लक्षात घ्या. आवेश म्हणजे जोम, एक प्रकारचा आवेग असतो चित्तामध्ये विकाराचा आणि उन्माद म्हणजे स्वतःला विसरून जाणे.

उन्माद ज्याच्या ठिकाणी असतो, तो माणूस फॅनॅटिक असतो आणि आवेश ज्याच्या ठिकाणी असतो त्याच्या ठिकाणी त्या वेळेपुरता इम्पल्स असतो. जसे हे बॉंबथ्रोअर असतात. ह्या मुलांच्या ठिकाणी उदात्तता अभंग असते. त्या त्या वेळेपुरता चित्तामध्ये उठाव आला, उदात्त उठाव आला तो आवेश असतो. आणि हा फॅनॅटिक कसा? हा स्वतःलाही विसरून जातो आणि जगालाही विसरून जातो. आणि अमुक एक हे काम करण्याकरिता मला हजारो माणसांची कत्तल करावी लागली तर हे करीन असे तो म्हणतो. म्हणजे दारूने उन्मत्त झालेला माणूस असतो तसे. उन्मत्तामध्ये उन्माद असतो. असे जे काही लोक आले असतील त्यांत आवेशही राहील. उन्मादही राहील आणि परिणामपरायणताही (इम्पॅक्ट) राहील. समजा, एकीकडे हा अशोक आहे. दुसरीकडे वसंता बसला आहे. खेळ चालला आहे. तर या दोघांच्यामध्ये खेळाडूपणाची जाणीव आहे की 'एक जिंकणार आहे आणि एक हरणार आहे.' हे असल्यामुळे खेळात लक्ष आहे, आनंद आहे. हरण्या-जिंकण्यात नाही. पण अवांतर प्रेरणांनी आलेला जो माणूस येईल हा परिणामपरायण असेल. इम्पॅक्टची चाड असेल. मग या माणसाचे दोष कसे जावे या सत्कार्यामधून? जर हे सत्कार्य असेल तर मग त्यात दुसऱ्यांचेही दोष कमी झाले पाहिजेत त्यातून. त्याचे दोष कमी कसे होतील?

अनुक्रमणिका

**वेदान्तिक राष्ट्रवादी**

हे आपल्या अंडरस्टँडिंगने आणि प्रेमाने होईल. जे आवडीने काम करायला आले असतील त्यांच्या ठिकाणी अंडरस्टँडिंग असले पाहिजे. त्याला समजून घेण्याची तयारी आणि त्याच्या विषयीचे प्रेम असले पाहिजे. याचा काय परिणाम होईल? आपण त्याच्या दोषांशी समरस होणार नाही, पण त्याच्या दोषांचे परिणाम भोगायला तयार राहू. त्याने संस्थेत व्यभिचार केला असेल तर व्यभिचारात आम्ही सामील नाही पण त्याच्याकरिता संस्थेला जे काही भोगावे लागेल त्यात आम्ही सामील आहोत. ही शिक्षा तुझ्याबरोबर भोगू आम्ही. कारण तुझे जे सोबती आहोत, आमची जी बदनामी होईल, छीथू होईल, ती सगळी आम्ही सहन करु तुझ्याबरोबर, आम्ही असे म्हणणार नाही की हा आमचा कुणी नाही. डिसक्लेम नाही करणार आम्ही त्यावेळेला. त्याला डिनाय नाही करणार. ही प्रेमाची बाहेरची खूण. आमचे प्रेम आहे याची खूण. आणि अंडरस्टँडींग काय? की हा कुठल्या भूमिकेवरुन आलेला आहे, त्यामुळे याचे असे होते? ही समजून घेण्याची वृत्ती असावी. आता एक भगतसिंगाचे नाव घेतले. भगतसिंगाचे एक निर्मळ चरित्र होते. परंतु अनेक बाँबथ्रोअर वेश्यांकडेच राहत होते. दोन कारणे - एक तर वेश्यांच्या घरी शोध लागणे कठीण आणि दुसरे लग्न करायचे नाही. स्त्रीच्या प्रेमपाशात सापडायचे नाही. म्हणून कामवासना तृप्त करून घेण्याची सोयही पाहिजे. आणि प्रेमाचे बंधनही नको, त्यांच्यापैकी काही असेही म्हणणारे होते की क्रांतिकारकाने शक्यतो होमोसेक्च्युअल असावे. म्हणजे स्त्रीच्या बंधनाचा संभवच नाही. स्त्रीच्या मोहपाशात सापडण्याचा प्रश्नच नाही. ते ब्रह्मचर्य तर नको, जे अरविंदांना हवे होते किंवा जे रामदासाच्या सांप्रदायांतल्या लोकांना हवे होते. त्यांना आता नाव दिले की हे वेदांतिक राष्ट्रवादी लोक आहेत. तेव्हा हे यांचे ब्रह्मचर्य तर नको पण संसाराचे बंधनही नको, प्रपंचाचे बंधन नको. तेव्हा स्वतःचा संसारही नको आणि नैष्ठिक ब्रह्मचर्यही नको, पण क्रांती तर पाहिजे असा एक वर्ग होता. या वर्गाचे म्हणणे असे की शक्यतो जी सार्वजनिक स्त्री असेल तिचा उपयोग करून घ्यावा किंवा मग एकमेकांचा उपयोग करून घ्यावा. असे त्यांचे तत्त्वज्ञान होते. त्यांच्यापैकी पुष्कळ लोक मला भेटले आहेत माझ्या आयुष्यामध्ये. आणि त्यांनी हे प्रतिपादन केले आहे. तेव्हा त्यांची भूमिका समजून घेतली पाहिजे. आपल्या मनात काय येईल? एकदम तिरस्कार. अशा माणसांशी आम्ही संबंध ठेवणार नाही. पण हे इष्ट नाही. काय पाहिजे? पापाबद्दलचा तिरस्कार आणि पापी माणसाबद्दलची सहानुभूती.

हे निर्माण करता आले पाहिजे स्वतःच्या चारित्र्यातून. सद्गुणांतून नाही होत हे. सद्गुणांमधून काय होते? 'तुम्ही शुद्ध माणसे आहेत, आम्ही तुमच्याबरोबर राहू शकत नाही. तुमच्यापासून लपवून ठेवले पाहिजे.' विडी ओढायची असेल तर संडासात ओढली पाहिजे. पाप, व्हाईस हे असे अंडरग्राउंड जाऊ नये. वर राहिले पाहिजे, तरंगत. केरकचरा जसा पाण्यावर तरंगतो तसे हे पाप वर तरंगत रहावे, अशी तरतूद करता आली पाहिजे. तर याकरिता फार मोठे मन लागते. नाही तर काय होते? ज्याला तुम्ही पापी म्हणता तो म्हणतो, 'मी पापी असेन पण तू पावित्र्यवादी आहेस ना?' पावित्र्यवाद हे सुद्धा एक पाप आहे. होलिअर दॅन दाऊ. ही वृत्ती पारमार्थिक संस्थांमधून असते.

पारमार्थिक संस्थांमध्ये काय होते? सदस्यत्व आहे पण मैत्री नसते. सदस्यत्व आहे पण मैत्री नाही ही त्यांची पावित्र्यवादी मनोभूमिका असेल ती आपण ठेवायची नाही.

गिल्टी कॉन्शसमध्ये काय असते? एक मोठे त्याच्यामध्ये सेव्हिंग ग्रेस आहे की पापी माणूस निदान आत्मसमर्थन करीत नाही. एक दुष्ट असतो नि एक नष्ट म्हणजे वाया गेलेला, कारण तुमच्या हाती काही राहात नाही. पण जोपर्यंत दुष्ट आहे तोपर्यंत तो केवळ दूषितच आहे. तो वळणावर येऊ शकतो. म्हणून त्याच्याबद्दल सहानुभूती असली पाहिजे. तरच तुम्ही त्याला वळवू शकाल म्हणजे मग तो तुमच्याबरोबर येईल. त्याला म्हणायचे की तू करतोस ते आम्ही करत नाही. तुझ्यात आमच्यात काही फरक आहे का? तुझ्या हातून घडले नाही, कदाचित त्यासाठी आम्हाला संधी मिळाली नसेल, किंवा हिंमत नसेल. हे दोन्ही शक्य आहे. म्हणून तू आपले वाईट वाटून घेऊ नकोस. पण तो पावित्र्यवाद सगळीकडे राहिला. म्हणून मी तीन संस्था घेतल्या, ज्यांचा धर्म आणि अध्यात्माशी संबंध आहे. शिक्षणाच्या मध्येही या संस्थांनी प्रवेश केला आणि तो पावित्र्य आणण्याकरिता प्रवेश केला. पण पावित्र्याचा तुम्ही सिद्धांत बनविला की तो जीवनात येत नाही. ते काय होते, एकमेकांचे अपावित्र्य 'पहायला' लागतात. मग तेथे एकमेकांची हेरगिरी सुरु होते, पाळत ठेवतात एकमेकांवर आणि त्यातून येतात डोझीयर्स. पापांचे

रेकॉर्ड ठेवण्याची प्रवृत्ती येते. रेकॉर्ड ठेवायचे म्हणजे काय? हा कुठे कुठे गेला होता, किती याने बदमाषा केल्या याचे रेकॉर्ड ठेवायचे. आणि मग हे एकमेकांच्या विरुद्ध सांगायचे. निवडणुकीच्या वेळी तिकिटाची वेळ आली की एकमेकांच्या गुन्ह्याच्या लिस्टस एकमेकांजवळ राहतील. पावित्र्यवादाचे असे होते. पावित्र्यवाद म्हणजे 'पवित्रतेला सिद्धांत बनविणे.' आणि तो सिद्धांत बनविला म्हणजे तो जीवनात येत नाही, हेरगिरी सुरु होते. हे सगळे पारमार्थिक संस्थांत घडून येते. त्यामुळे दोस्ती राहत नाही. दोस्ती राहू शकली पाहिजे. त्याचे सूत्र आहे - म्हण आहे इंग्रजीत. ती म्हण लक्षात ठेवायची - 'एव्हरी सेंट हॅज ए पास्ट, एव्हरी सिनर ए फ्युचर.'

प्रत्येक महात्मा हा केव्हा तरी पापी राहिलेला असतो आणि प्रत्येक पापी हा कधीतरी महात्मा बनू शकतो. ही आहे माणसाची माणुसकी!

रस्किनच्या मते सगळ्या तरुणांची तोंडे शाळेकडे वळवा. सर्व तुरुंग हे विद्यालयाभिमुख झाले पाहिजेत. पण आज आपण सर्व शाळांचे तुरुंग बनविले आहेत.

आपण एकमेकांचे सभासद आहोत. 'मेंबर्स ऑफ वन अनदर' यातून अपराधाबद्दल तिरस्कार व अपराधी माणसाबद्दल सहानुभूती निर्माण होईल.



## अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन २००७
## महिला - सत्र चिंतन

स्त्रियांचे कथानक गोष्टीपलीकडे जात नाही. चिंतन, वाचनात त्या कमी पडत असल्याने त्यांच्या साहित्यनिर्मितीवर मर्यादा येते. तरीही महिलांनी लिहिले पाहिजे, अशी आर्त हाक ज्येष्ठ साहित्यिक पुष्पा भावे यांनी येथे दिली. गीता साने साहित्य परिसरात 'स्त्रियांचे लेखन' या विषयसूत्राच्या अध्यक्षा म्हणून त्या बोलत होत्या. यावेळी छाया दातार, डॉ० आशा बगे आणि मेघना वाहोकर व्यासपीठावर होत्या. याप्रसंगी पुष्पा भावे यांच्या हस्ते अखिल भारतीय साहित्य अकादेमी पुरस्कार मिळाल्या-बद्दल डॉ० आशा बगे यांचा सत्कार करण्यात आला.

पंडिता रमाबाई यांचे 'माझा इंग्लंडचा प्रवास' किंवा अलीकडच्या काळातली मीना प्रभू यांची प्रवास वर्णने वाचनात येतात. तरी स्त्रियांची साहित्याची समज ही फक्त विधान करण्यापर्यंत दिसून येते, असेही भावे म्हणाल्या.

'स्त्री वाद' हा पुरुषसत्ता चालू ठेवण्यासाठी चालवलेले मोठे राजकारण असल्याचे सांगताना अनेक स्पष्टीकरणे, उदाहरणे त्यांनी दिली. स्त्री वाद स्वातंत्र्याची जबाबदारी असल्याने जमीन, जंगल, पाणी याचाही विचार स्त्रियांच्या लेखनामध्ये उमटणे आवश्यक आहे. कारण सत्ताकारणात राहून जागतिकीकरणाच्या विरोधात भूमिका घेणाऱ्या महिलांमुळे पैठणी आणि मॉल संस्कृती एकत्र नांदणे शक्य नाही, असे भावे म्हणाल्या.

सत्तेसाठी जागतिक महायुद्धानंतर पाश्चिमात्त्य राष्ट्रांनी महिलांना घरी बसण्यास भाग पाडले, तेच भारतीय स्वातंत्र्यानंतर घडले. आता तर महिलांना ३३ % आरक्षणाच्या प्रश्नात गुंतवून ठेवण्यात येत आहे. तेव्हा लेखन ललित राहून चालणार नाही, स्त्रियांना राजकारणही कळले पाहिजे, असा त्यांचा आग्रही सूर होता.

छाया दातारांनी सुवासिनींपासून ते बारबालां-पर्यंतच्या स्त्री अंतरंगाचा पट उलगडला. महिलांची विभागणी करण्याचे राजकारण खेळले जाते. मोठ्या 'कॅनव्हास'-वर त्या प्रगत होऊ नयेत, याची पुरुष सत्तेकडून काळजी घेतली जाते, असे त्यांनी सागितले. स्त्री आणि पुरुष लेखकांच्या प्रतिमांमध्ये तफावत जाणवते. पुरुष लेखक काल्पनिक स्त्री रंगवतात, असेही त्या म्हणाल्या. सीमा रोठे यांनी संचालन केले. मेघना वाहोकर यांनी आभार मानले.

(सौजन्य : लोकसत्ता, प्रतिनिधी वृत्त, ४ फेब्रुवारी २००७)








# गृहिणी मूल्य

## वीणा पुरंदरे - सुराणा

गृहिणींच्या श्रमाचे माप स्त्रीवर्गाला दिलेले नाही. त्यांना दागिन्यांनी सजवले खरे. ते फक्त पुरुषी नजरेला 'सुखवेडा' करण्यासाठी. दागिन्यांची मालकी कधीच स्त्रीकडे नव्हती. पुरुषी लहरीनुसर वा आर्थिक नडीनुसार ते काढून घेतले जात. कुठेही गुंतविण्याचे किंवा वेश्येला देण्याचेही धाडस तो करी अन् त्यामुळे त्यावर असहायपणे रडणे याखेरीज स्त्री कोणताही विरोध वा निषेध करण्यास शिकली नाही. जगाने तिला 'बिच्चारी' म्हणावे अन् तिने मात्र नवऱ्याच्या धाकामुळे गप्प बसावे. अशा प्रकारच्या अगणित अनुभवांनी आजच्या स्त्रिया चिडून गेल्या आहेत. आता त्यांना पतीच्या बरोबरीने संपत्तीधारणाचा (स्वतंत्रपणे) हक्क वा सोय मिळण्याशिवाय अन्य काहीही भूलथाप नको आहे. म्हणून पालकांनी मुलाप्रमाणे मुलीलाही वारसा हक्काने हिस्सा द्यावा. ही मागणी करताना आईवडिलांच्या कर्ज फेडीतही जबाबदारी उचलण्यात आम्ही मागे राहू शकत नाही. शिक्षण मिळविण्यास स्त्री मागे हटत नाही. सुशिक्षित, सुजाण होऊन गृहिणीपदाची जबाबदारी अभिमानाचा 'पेशा' प्रोफेशन म्हणून सार्थ करू. गृहिणीपद हे अन्य सामाजिक कर्तव्य-पदाप्रमाणे प्रतिष्ठित, बौद्धिक, आर्थिक, सामाजिक गरजपूर्तीचा 'हक्ककृतीसमूह' आहे. त्या पदाची अवहेलना समाजघातक ठरेल ही महत्ता आम्ही स्त्रियांनी जाणली आहे. परित्यक्ता, विधवा अशा अपमानजन्य अवस्था समाजातून घालविण्यासाठी योग्य असे कायदे खंबीरपणे करू. आजवर गृहिणीवर्ग उंबऱ्याच्या आतच असे. समाजाने जणू गृहितच धरले की, घराबाहेरील जगाचा व गृहिणींचा संबंध नाही. हे निखालस असत्य आहे. कारण चुलीवरच्या हंडीत काय शिजवायचे हे गृहिणी बाजारतली महागाई-स्वस्ताईवरुन ठरविते. ते तिला कळते. उद्याचे जग ज्यांच्या कर्तृत्वाने फुलणार त्या तरुण-तरुणींना शहाणपणा देणारी त्यांची आई म्हणजे त्या कुटुंबाची 'इच्छाशक्ती गृहिणी' समंजस व धोरणीच असेल. त्यासाठी तिला आजच्या व उद्याच्या काळाची सामाजिक अवस्था व वातावरण यांची पूर्ण माहिती हवी. म्हणून तिचे स्वतःचे वाचन चिंतन हवे.

गृहिणी हे पद डॉक्टर, वकील आदि सामाजिक पेशांप्रमाणे महत्त्वाच्या 'कामगिरी'चे आहे हे तिने जाणले पाहिजे. म्हणून ती सुशिक्षित हवी. पुरुष-पिता अशिक्षित असेल तर फारसे बिघडणार नाही पण आई अडाणी राहिली तर समाज अडाणी राहील हे खरे आहे. यासाठी स्त्री-पुरुष यात कुणी श्रेष्ठ नाही अन् कोणी कनिष्ठ नाही. उलट दोघेही समान होत. त्या उभयतांचे साहचर्य हे खरे जीवन होय. त्यांनी परस्परांचे मोल करावे व मूल्य जोखावे. सुशिक्षित, समंजस स्त्रीच अपत्यरूपी भावी समाज उभा करील. 'समताधिष्ठित समाजरचना' हे आमचे ध्येय निश्चित झाले आहे. त्यात वृद्धांचा आदर व सोय केली आहे. विश्वात आज सर्वत्र स्त्रिया तोलामोलाची अधिकारपदे आत्मविश्वासाने सांभाळीत आहेत. सुश्री कल्पना चावला ही 'स्पेस वीरांगना' झाली. त्या जिद्दीने गृहिणीवर्गाने 'कुटुंबव्यवस्थापन' हा अपर्यायी - पेशा ठरवून त्याला संपत्तीधारणेचा पाया व सोयी निर्माण कराव्यात. गृहिणी व गृहस्थ ही समाजरथाची दोन चाके होत. यापुढे आपल्या अपत्यांच्या स्वभावनिर्मितीच्या मानसशास्त्रीय महत्त्वाच्या कुशल दालनाची नोंद व निर्मिती व अभ्यास करून कार्यपरीघ वाढवावा. पुरुषाला मोहविण्याची भाषा सोडून त्याला जीवनसाथी बनवावे - सहकारी म्हणावे. आपण भावी राष्ट्रनिर्माती आहोत, याचा अभ्यास व संशोधन करावे. अपत्ये व वृद्ध यांची सेवा म्हणजे भविष्य भूतकाळाची गुरुकिल्लीच नव्हे का? त्यासाठी आपली बुद्धी वापराची, परस्पर सौहार्द वाढवावे. कुटुंब व्यवस्थापन हे समाज व्यवस्थापनाचे प्रवेशद्वार आहे. स्त्रीपुरुष ही परस्परपूरक रूपे होत/ स्पर्धक नव्हेत - हे प्रथम व अंतिम सत्य आहे हे जाणावे. आपण राष्ट्रनिर्माती आहोत. नवसमाजरचनेचे पाईक आहोत. अशा अभिमानास्पद विचारामधून प्रशिक्षित व्हावे आणि गृहिणीवर्गाचे जीवनकार्य देशार्पण/समाजार्पण करावे आणि स्वकर्तृत्व सार्थ करावे ही निर्धारी मांडणी होय. अर्धांगिनीला

अनुक्रमणिका

अर्धा वाटा एवढीच घोषणा देण्याने समान पालकत्व - वारसा हक्क व जबाबदारी अस्पर्श राहतात. म्हणून समतेची पूर्ण मांडणी करणे योग्य आहे याकरिता ...

१. मुलगा / मुलगी समान

२. वडिलांच्या संपत्ती / कर्जफेडीत भावाबरोबर भगिनी जबाबदारी घेतील.

३. सासरी पतीचा हिस्सा + स्वतःचा माहेरचा वाटा मिळून होणाऱ्या संपत्तीत (कर्जफेडीमध्येही) दोघेही समान वाटेकरी ) ५०+५०

४. अपत्यांना वडिलांप्रमाणे आईकडूनही समान वाटा मिळेल. अशा तऱ्हेने पूर्णत: समतादर्शक मांडणी आम्ही करीत आहोत.

संवेदनशील व जाणकार बंधूभगिनींनी समता-धिष्ठित समाजरचनेची स्थापना करण्यात अग्रेसर व्हावे ही नम्र अपेक्षा आहे.

### अभ्यासक्रम

व्यवस्थापन हा (Management) अनेकपदरी अभ्यासविषय म्हटला जातो. आता 'कंपनीव्यवस्थापन' या विषयाला प्रतिष्ठित व्यवसायाचा दर्जा आहे. त्यासाठी स्वतंत्रपणे आर्थिक तरतूद केलेली असते. कंपन्यांच्या दैनंदिन व्यवहारात विविध प्रकारची कामे करायची असतात. विविध संपर्क मिळवावे लागतात. त्या त्या सर्व दिशांचे (सर्व व्यापांचे) व्यवधान व्यवस्थापकाला ठेवायचे असते. त्या वेगवेगळ्या कामामध्ये एकसूत्रताही राखायची असते. अशी विविधतेतून एकसूत्रता साधताना कंपनीची भरभराटही सर्व बाजूंनी अपेक्षित असतेच. अशी सर्वांगीण प्रगती झाली तरच व्यवस्थापकाचे कसब मान्य होते. व्यवस्थापनाचा अभ्यास सखोलपणाने वाढत्या परिघांना व्यापित आहे. त्यातूनच तो विषय / व्यवसाय वटवृक्षासमान जोमदार व डौलदार होतो आहे. त्या व्यवसायाचे अनुषंगिक असे नवी रूपेसुद्धा सन्मानाने अवतीर्ण होत असते.

जसे विविधांगी कंपनी-व्यवस्थापन, अगदी तेच विविधांगी कुटुंब व्यवस्थापन होय. कुटुंब व त्याच्या सगळ्या घटकांची काळजी घेणे, सोयी पुरविणे, सेवा, अर्थ नियोजन करणे आणि समंजस मानसिकता निर्माण करणे असा कुटुंब व्यवस्थापनाचा परीघ वाढतो आहे. या सर्व गोष्टी व्यवस्थित होणे यासाठी गृहिणीला दक्ष असावे लागते. हा सर्वांगीण विचार कुटुंबकर्त्याला व गृहिणीला विशेषत्वाने करावा लागतो.

प्रत्येक घरात कोणकोणती कामे सेवा, सोयी अपेक्षित आहेत हे विस्ताराने पाहू. त्याबाबतचे सामान्य नियोजन, आर्थिक तरतूद, सफलता यांचा विचार करणे योग्य ठिकाणी येईल. प्रथम घरकामांचा विस्ताराने परामर्श घेऊ.

### नित्याची कामे

१. खाण्यापिण्यासाठीच्या सामानाची खरेदी करून ते निवडून स्वच्छ करणे, धान्य दळून आणण्याची व्यवस्था करणे, मीठ-मिरची आणणे, निवडून भाजून तळून मसाले करणे, रोजच्यासाठी भाजीभाकरी तर रटाळपणा वाटू नये. थोडा बदल हवा म्हणून शिरा, उप्पीट, भजी, इडली, द्वाशी अशा वस्तूंची तयारी ठेवणे, कृती शिकणे इ.

२. दररोजचा केरकचरा काढणे, सफाई करणे, घरातली जाळीजळमट झाडणे, धूळ झटकणे, फरशा मधूनमधून पुसणे किंवा महिन्यातून एकदा तरी घासून धुणे, पदार्थात झुरळेमुंग्या होऊ नयेत म्हणून एकवेळ कीटकनाशक औषधांची फवारणी करणे वा करविणे, नव्या ठेवणीतल्या कपड्यांमध्ये डांबरगोळ्या ठेवणे, (म्हणजे त्या नव्या कपड्यांना चाई-झुरळ लागत नाही.) मधून नव्या कपड्यांच्या घड्या बदलून वेगळ्या वा उलटवून केल्या नाहीत तर कपडा घडीचे जागी फाटतो. आणखीही बऱ्याच बारीकसारीक साफसफाई व इतर गोष्टींवर ध्यान देणे.

३. घरातल्या प्रत्येक माणसांचा स्वभाव, सवयी पाहणे - अभ्यासणे, त्यांचा अभ्यास आणि वर्तनाला योग्य दिशा देणे, बारीक नजर ठेवणे, मुलांना टापटिपीच्या शिस्तीच्या, स्वच्छतेच्या सवयी लावणे, तंदुरुस्तीसाठी योग्य असा व्यायाम शिकवणे, सामूहिक व सामाजिक कर्तव्याचे भान ठेवून समजावून जागे ठेवणे, अभ्यास करताना पत्रलेखन, टपालाचे सर्वसामान्य प्रकार सांगणे, वृद्धांची व आजाऱ्यांची सेवा शिकवणे. आजची म्हातारी माणसे जवळच्याच भूतकाळातली कर्तृत्ववान, जबाबदार अशी प्रौढ, आदरणीय, ज्ञानी व्यक्ती असतात म्हणून त्यांचेबद्दल आदरभाव ठेवण्याचे वळण नव्या पिढीला असणे समाजस्वास्थ्याचे दृष्टीने फार महत्त्वाचे व अगत्याचे आहे. हे चाणाक्ष पालकांनीच जाणावे/शिकवावे लागेल. या वर्तनकला नव्या, उमलत्या

पिढ्यांना त्यांच्या लहान व किशोर वयापासूनच शिकवायच्या असतात. उडाणटप्पूपणा करण्याचा दोष तरुणांना देताना त्यांच्या कुमार वयाकडे त्याकाळच्या प्रौढांनी नीट चौकस लक्ष दिलेले नाही असा दृष्टिकोन प्रौढांनी ठेवला तरच तरुणांचा विवेक जागा होतो हे प्रेमळ मातेशिवाय अन्य कुणाच्या मनात येणार? एवढ्या सखोलपणाने बुद्धी चालविण्याचे भान गृहिणांना कसे येईल असे मनात आले की मागच्या पिढ्यांनी स्त्रीशिक्षणाची केलेली दूरावस्था मनात येते व ते अस्वस्थ होते.

४. घरात येणाऱ्या सर्व पाहुणे लोकांची व्यवस्था, सोय करणे.

५. 'जिचे हाती पाळण्याची दोरी ती जगाते उद्धारी' असे वाक्यप्रचार करून प्रत्यक्षात मात्र स्त्रियांना अशिक्षित ठेवणाऱ्या समाजरीतीपुढे हसावे की रडावे? आपल्या अपत्यांना शिकवू पाहणारी मातारूपी गृहिणी अडाणी राहताच कामा नये. 'अडाणी आई । घर वाया जाई ।' हे सार्थ आहे. अज्ञान आई मुलांवर सुसंस्कार करणे जाणूच शकणार नाही. हे पुरेशा गांभीर्याने घेतले पाहिजे. एक वेळ पिता अज्ञान असेल तर फारसे बिघडणार नाही पण मातेला अज्ञानी राहणे समाजघातक ठरेल. गृहिणी कुटुंबसंस्थेची मॅनेजर - व्यवस्थापक असते. जिथे गृहिणीही घराबाहेर नोकरी करीत असेल तर त्या कुटुंबासाठीचे नीतीनियम वेगळे असतील. पण जिथे ती घराबाहेर कुठेही नोकरी करीत नाही त्या 'केवळ गृहिणी' साठी सुयोग्य अभ्यासक्रम विकसित करायचा आहे. कुटुंब घटकांचे स्वभाव अभ्यासण्यासाठी मानसशास्त्राचा अभ्यास प्रत्येक गृहिणीसाठी आवश्यक आहे. बालवय, किशोरावस्था, तारुण्य, प्रौढत्व, वृद्धत्व हे सर्व माणसांच्या आयुष्याचे टप्पे आहेत. या प्रत्येक पायरीच्या मानसशास्त्रीय विवेचनाचे ज्ञान गृहिणीला हवे. म्हणून अभ्यासक्रमात मानसशास्त्र नक्की हवेच.

६. आपल्या घराच्या आर्थिक कुवतीचे / उत्पन्नाचे ज्ञान असणे ही तर मूलभूत गोष्ट आहे. त्याखेरीज महिन्याचे घरखर्चाचे अंदाजपत्रक तिला करता येणार नाही. उत्पन्न कमी आणि खर्च जास्ती झाला तर काय उपयोगाचे. खर्चावर लगाम ठेवणे अन् दरमहा योग्य (घरखर्चाच्या १० ते २० टक्के) बचत करणे ही फार महत्त्वाची गरज होय. तिने आपल्याही दिवसभराच्या कामाची व्यवस्थित आखणी केली पाहिजे. किमान एक तास तरी स्वतःचा खास छंद जोपासण्यासाठी, किंवा वाचनासाठी म्हणून ठेवला पाहिजे. मुलामुलींना वळण लावायचे तर तिचे स्वतःचे जीवनाला वळण असले पाहिजे. अशा रीतीने सुजाण गृहिणीवर्ग घरात-समाजात आनंदी वातावरण निर्माण करून घरादाराला कार्यरत राखेल यात शंका नाही.

७. बालवयाचे संगोपन हे कुटुंबाचे अक्षरश: प्रथम क्रमांकाचे आहे. त्याची सुरुवात जन्माच्या पहिल्या क्षणापासून नव्हे तर गर्भावस्थेच्या पहिल्या क्षणापासून होते. त्याचे आडाखे अंदाज वैद्यकीय म्हणून नव्हे तर सर्वसामान्य स्त्रीच्या नजरेतून आपण पाहू व ती प्राथमिक अभ्यासक्रमात समाविष्ट करू.

बहुतेक स्त्रियांची मासिक पाळी दरमहा नियमितपणे येत असते. तर काहींची अनियमितता 'नियमित' असते. त्यामुळे मासिक येण्याची वेळ चुकली वा टळली तर गर्भधारणेची शक्यता कुणाही स्त्रीला कळते. तिच्या शरीरात नवे बदल होण्याला सुरुवात होत असल्याने ते बदल अंगवळणी पडेपर्यंत मळमळणे, चक्कर आल्यागत वाटणे, अधूनमधून शक्ती गळून गेल्याचा अनुभव येतो... वगैरे. या काळात गर्भिणी व गर्भ दोघांचे वाढीसाठी हवे-नको ते, तेच खाल्ले जाते. डॉक्टरांचा सल्ला घेतला जातो. हे सगळे जाणत नाही अशी स्त्री मिळणार नाही. पौष्टिक वस्तू प्रत्येक स्त्री पैशांच्या तरतुदीनुसार आणते. नातेवाईक कोडकौतुक करतातच. गृहिणीच्या या अवस्थेचे सर्वसाधारण ज्ञान अभ्यासक्रमात येईल.

जन्माच्या पहिल्या क्षणापासून चार महिने पूर्ण होईपर्यंत अर्भकाची मान सांभाळावी लागते. माता व मूल पूर्णपणे एकरूप असतात. लहान मुलाशी बोबडे बोलणे, नजरेचे हावभाव, त्याचे पालथे-उताणे होणे, बसायला तसेच बसून-बसून सरकण्याला, बोलायला शिकणे, उभे राहणे, पाऊल टाकणे...वगैरे. सर्व प्रक्रियात पारंपरिक संस्कारानुभवातून स्त्री पारंगत झालेली असते. मुलाच्या वाढत्या वयाबरोबरच आईचेही (नवेपणा कमी होऊन) मातृत्व संस्कार परिपक्व होत जाते. हे जणू ती जन्मतःच (म्हणजे स्त्रीत्वामुळे) जाणत असते - वागत असते व अपत्यांना शहाणपणा शिकवत असते. अपत्यांच्या वयाच्या १४-१५ वर्षापर्यंत त्यांना आईवडिलांनी वा वयाने मोठ्या असलेल्या बहीणभावांनी/ नातेवाईकांनी सांभाळावे लागते. त्यानंतर ते मूल हळूहळू स्वावलंबी होऊ पाहते.

अनुक्रमणिका

८. गृहिणींना पारंपरिक सवयीतून स्वयंपाक करता येतो. आई, आजी, चुलती, मावशी वगैरे वयस्कर नातेवाईकसुद्धा लक्ष देत असतात. तरी त्याचे शास्त्रीय ज्ञान पाकशास्त्राच्या पद्धतशीर अभ्यासाने पक्के होते. कोणती वस्तू किती शिजवावी, वरणासाठी डाळ भरपूर (अगदी गाळ होईपर्यंत मऊ) शिजवायची, भाज्या बेताने शिजवायच्या / नाही पेक्षा त्यातला सत्वांश-व्हिटॅमिन्स नष्ट होतील, शिजायला पाणी किती घालावे, तिखट-मीठ मसाले किती टाकावे... वगैरे, आईचे - मोठ्यांचे पाहतपाहत ती शिकून जाते. परंतु त्याचे शास्त्रशुद्ध ज्ञान तिने स्वाध्यायाने मिळवावे. कोणत्या वस्तू कच्च्या खाणे चांगले आहे हेही ती निरीक्षणाने शिकते. अभ्यासक्रमात पाकशास्त्राचे शिक्षण थोडे चालेल पण अपत्यांना वळण लावणेसाठी तिला पूर्ण जीवनटप्प्यांचे मानसशास्त्र अभ्यासणे जरूर आहे. आजाऱ्यांची सेवा, प्राथमिक स्वरूपाच्या सोप्या सोप्या वैद्यकीय गोष्टी (उदा. ताप मोजणे, किरकोळ जखमा साफ करून ड्रेसिंग करणे, दातांची काळजी व स्वच्छता राखणे, डोके/अंग दाबून देणे) वगैरै कामात ती निष्णात असावी. हे साधारण क्रियाकलाप तिला यायला हवेत.

९. वृद्धांची सेवा हा मानवाच्या वृद्धत्वाचा हक्क व सन्मान आहे, या मनोभूमिकेची शिकवण अभ्यासातला महत्त्वाचा मुद्दा आहे. वृद्धांचा पाणउतारा वा अपमान करणे हे अज्ञान व दुष्टपणाचे द्योतक आहे हे गृहिणींना मान्य होण्यायोग्यच आहे. प्रेमळपणाने वृद्धसेवा ही तिची कसोटी ठरणार आहे. त्यात पास व्हायचे की नापास हे जिचे तिनेच ठरवायचे आहे. कारण तिलाही वृद्धत्व यायचेच आहे.

('गृहिणी एक पेशा' २००३, महिला उत्कर्ष प्रतिष्ठान, बार्शी) संपादित सारांश.



**प्रथमदर्शनी विचित्र वाटणाऱ्या या मांडणीत चर्चेसाठी खूपच अवकाश आहे. उदा० दारुड्या नोकरांच्या पगारातून सरळ पत्नीला काही भाग देणे तरी युक्त होणार नाही का? आर्दि.**

(पृष्ठ क्र. २७ वरून)

किमान सर्वसामान्यपणे जगण्याचे हक्क द्या अशी मागणी जर मोलकरीणींच्या संघटनेमार्फत केली जात असेल तर ही मागणी मान्य करणे ही शासनाची जबाबदारी ठरते आणि या जबाबदारीत राज्यशासन यत्किंचितही कमी पडणार नाही.

ते म्हणाले, घरेलू मोलकरणींचा प्रश्न मार्गी लावण्यासाठी आपण केवळ आश्वासन देणार नाही. तर येत्या एक महिन्याच्या आत समाजाच्या या घटकाविषयी आस्था असणाऱ्या आणि प्रामाणिकपणे काम करणाऱ्या सदस्यांची एक समिती कॉ. गोविंद पानसरे यांच्या अध्यक्षतेखाली नियुक्त करण्यात येईल. या समितीने घरेलू मोलकरणींचे सर्वेक्षण करणे आणि त्यांच्या विविध प्रश्नांवर चर्चा करून एक प्रस्ताव शासनाला सादर करणे अपेक्षित आहे. या समितीचा प्रस्ताव शासनाला सादर झाल्यानंतर तातडीने याप्रश्नी मोलकरणींना न्याय मिळवून देण्यासाठी आपण राज्यशासनाकडे सामाजिक बांधिलकी मानून विनामोबदला वकिली करणार आहोत.

आर. आर. पाटील यांनी यावेळी राज्यात माथाडी कामगारांच्या धर्तीवर मोलकरणींसाठी कायदा करण्याचे सूतोवाच केले. ते म्हणाले, घरेलू मोलकरणी तर श्रम करणारा घटक आहे. अतिशय प्रतिकूल परिस्थितीत त्यांनी आपल्या जीवनाची वाटचाल केली आहे. त्यांच्या भवितव्याची काळजी करणारा कायदा दुर्दैवाने आजपर्यंत झाला नाही. महाराष्ट्रातच काय संपूर्ण देशात आज असा कायदा अस्तित्वात नाही. तथापि ही उणीव भरून काढण्यात आपण पुढाकार घेणार असून लवकरच असा कायदा संमत करणारे महाराष्ट्र हे देशातील पहिले राज्य असेल अशी ग्वाही मी देतो.

समारंभाचे स्वागत मोलकरणींच्या राज्य संघटनेच्या अध्यक्षा कॉ. सुशिला यादव यांनी केले. अध्यक्षीय भाषणात कॉ. पानसरे यांनी मोलकरणींच्या विविध प्रश्नांकडे उपस्थितांचे लक्ष वेधले.

(लोकसत्ता वृत्तांत, १७ जानेवारी २००६)



अनुक्रमणिका








# आदिवासी स्त्रीजीवन : एक अल्पसा परिचय

## डॉ० धैर्यशील शिरोळे

आदिवासी स्त्री जीवनाचा सर्वांगीण विचार करणे हा एक मोठा विषय आहे. शहरात निवास करणाऱ्या बहुसंख्य नागरिकांना आदिवासी जीवनाची विशेष माहिती नसते. त्याचे प्रमुख कारण म्हणजे आदिवासी लोकांशिवाय शिक्षित समाजाचे काहीही अडत नाही. आदिवासी समाज अतिप्राचीन आहे आणि त्यांच्या प्रथा, जीवनपद्धती यापासून शहरी संस्कृतीला बरेच काही शिकण्यासारखे आहे. स्त्री ही कोठल्याही समाजाची कणा असते. आदिवासी स्त्री त्यांच्या समाजात महत्त्वाची भूमिका निभावते. अशा आदिवासी स्त्रीचे आयुष्य जन्मल्यापासून ते वृद्धत्वापर्यंत कसे असते, याची ढोबळमानाने ओळख करून देण्याचा या लेखाचा हेतू आहे.

सुरुवातीलाच एक महत्त्वाची गोष्ट स्पष्ट करणे आवश्यक आहे. भारतात जवळजवळ तीनशे आदिवासी जाती आणि उपजाती आहेत. त्यांच्या भाषा, संस्कृती आणि जीवनपद्धती यांच्यात काही साम्य निश्चित असले तरी सर्वांना लागू पडेल असे आदिवासी स्त्रीचे चित्र उभे करणे फार अवघड काम आहे. भारतीय आदिवासींमध्ये गोंड या जमातींचे संख्येच्या दृष्टीने आणि भौगोलिक विस्ताराच्या दृष्टीने प्राबल्य आहे. ह्या लेखात उल्लेखिलेली माहिती विशेषकरून गोंड आदिवासींना लागू पडते. शिक्षणाच्या प्रभावामुळे आता आदिवासी समाजही हळूहळू बदलणे शक्य झाले आहे. शहरी समाजात आणि आदिवासी समाजात एक प्रचंड दरी आहे आणि ही दरी दुर्दैवाने वाढतच चाललेली आहे. अशा परिस्थितीत आदिवासी जीवन समजावून घेऊन त्यांना समाजाच्या प्रवाहांत सामावून घेणे काळाची गरज झाली आहे. आदिवासी स्त्री-पुरुषांवर शेकडो वर्षे अनन्वित अत्याचार होत आले आहेत. त्याचे दुष्परिणाम समजावून घेऊन त्यावर उपाय योजणे आवश्यक झाले आहे. नक्षलवादी चळवळी आदिवासी भागांत उभ्या राहत आहेत आणि त्यावर योग्य ते उपाय योजणे राष्ट्रहिताच्या दृष्टीने आवश्यक आहे.

आदिवासी स्त्री-जीवनाची सुरुवात नकारात्मक पद्धतीने होत नाही. शहरी संस्कृतीत प्रत्येकाला मुलगा पाहिजे असतो. मुलगी झाल्यास 'मुलगी झाली हो' म्हणून सर्वजण गळा काढतात. आदिवासी समाजात मुलगी झाली तरी तिचा कोठल्याही प्रकारचा भार तिच्या आईवडिलांवर नसतो. विवाहयोग्य झाल्यावर तिला आणि तिच्या पित्याला वधू-मूल्य मिळते. हे वधूमूल्य मिळणार असल्याने मुलीचा जन्म आनंददायकच ठरतो. स्त्रीला आपला जोडीदार निवडण्याचा आणि जरूर पडली तर घटस्फोट देण्याचा अधिकार असतो. नवऱ्यानंतर त्याच्या मालमत्तेवर त्याच्या विधवेचा हक्क असतो. त्यामुळे आदिवासी स्त्री शहरी स्त्रीपेक्षा अधिक सुरक्षित जीवन कंठू शकते. कोठलीही आदिवासी स्त्री विधवा म्हणून जीवन जगत नाही. आदिवासी समाज आपल्या स्त्रियांना चांगले संरक्षण देतो.

सर्वात मोठा फरक म्हणजे आदिवासी स्त्री आपले बाळंतपण स्वतः करते. ह्या आदिवासी बाळाचा जन्म आकाशाखाली धरतीमातेच्या मांडीवर होतो. बाळंत होणाऱ्या स्त्रीला त्यावेळी तिच्या वस्तीवरील वडीलधारी अनुभवी स्त्री सूचना देते. बाळंत होणाऱ्या स्त्रीला कोणीही शिवत नाही. त्यामुळे बाळंतपणातील सर्व पायऱ्या तिलाच पार पाडाव्या लागतात. बाळंत कळा सहन करता करता नाळ कापणे, वार पुरणे, बाळाला आंघोळ घालणे ह्या आणि इतर अनेक जबाबदाऱ्या ही आदिवासी तरुणी पार पाडते.

आदिवासी समजुतीप्रमाणे गर्भ राहिल्यावर नऊ महिन्यांनी मुलगी होते आणि दहा महिन्यांनी मुलगा होतो. गरोदरपणात स्त्रीवर काही निर्बंध असतात. बाळंतपणानंतर दहा दिवसांनी पुन्हा घरात येते. शारीरिक संबंध मूल एक वर्षाचे होईपर्यंत ठेवले जात नाहीत. गरोदरपणी पाचव्या महिन्यानंतर शारीरिक संबंध ठेवले जात नाहीत. गरोदर असताना ग्रहणाच्या वेळी तिला उंबरा ओलांडण्याची मुभा नसते. गरोदरपणी चोरी केल्यास व्यंग असलेले मूल जन्मास येते असा समज आहे. डोहाळे पुरविण्याचा सर्वजण प्रयत्न करतात. कशाचे डोहाळे लागले ह्यावरून अनेक आडाखे बांधले जातात. ते खूपच कल्पनारम्य असतात. बाळंत झाल्यावर काही दिवसातच नेहमीच्या कामाला आदिवासी स्त्री लागते. सर्वांना जेवण देऊन बारसे साजरे केले जाते. आदिवासींच्या सर्व समारंभात

अनुक्रमणिका

एकत्र जेवणाला फार महत्त्व असते. नाचणे, दारू पिणे यांचाही अंतर्भाव असतो.

पक्षिणीच्या पंखांच्या उबेत जसे तिचे पिल्लू वाढते त्याप्रमाणे आदिवासी मातेच्या छायेत मूल मोठे होते. मुलगी आईच्या पाठोपाठ रानावनात जाऊ लागते, लाकूडफाटा गोळा करते, द्रोण-पत्रावळ्यांसाठी झाडांची पाने गोळा करू लागते. मुलगी पाच-सहा वर्षांची झाली की तिचे आईबाप तिला वस्तीवरच्या सामुदायिक शयनगृहामध्ये पाठवू लागतात. तिथे तिला त्यांच्या जमातीच्या चालीरीती, सणवार, नृत्य, गाणी आणि सामाजिक कर्तव्ये यांची जाणीव करून दिली जाते. आयुष्यासंबंधीचे व्यवहारज्ञान तिला सामुदायिक शयनगृहामध्ये मिळते. दिवसा घरची सर्व कामे आटोपून सायंकाळी ही तरुणी आपल्या सवंगड्यांसह नृत्य करायला 'घोटुल'मध्ये जाते. विवाहपूर्व शारीरिक संबंधांना आदिवासी जमातींमध्ये मान्यता असते, परंतु विवाह झाल्यावर आपल्या पतीशी तिला एकनिष्ठ राहावे लागते. तिचे पाऊल वाकडे पडले तर तिला पंचांना जबाब द्यावा लागतो.

विवाहपूर्व शारीरिक संबंधांपासून दिवस राहू नयेत म्हणून आदिवासी तरुणी तिच्या पद्धतीने सर्व ती खबरदारी घेते. दर मासिक पाळीच्या वेळी ती नदीवर जाऊन तिची पाळी न चुकण्याबद्दल नदीची प्रार्थना करते. येवढे करूनही दिवस राहिले असतील तर ज्या तरुणापासून दिवस राहिले असतील त्याला पंच बोलावून घेतात आणि त्यांचे विवाह लावून देतात. हे जोडपे समाजात आनंदाने वावरू शकते.

आदिवासी तरुणींना त्यांच्या मासिक पाळीच्या वेळी अनेक बंधनांना तोंड द्यावे लागते. पाळीच्या काळात घराबाहेर उभारलेल्या खास झोपडीत राहावे लागते. त्या कोणाच्या दृष्टीस पडता कामा नयेत. त्यांना कोठल्याही गोष्टीला शिवता येत नाही, स्वयंपाक करता येत नाही. मासिक पाळीच्या वेळी वापरलेली वस्त्रे त्यांनी अत्यंत काळजीपूर्वक नाश करावी लागतात.

मासिक पाळीच्या काळात शरीरसंबंध ठेवले तर त्या तरुणाचा मृत्यू ओढवतो. आदिवासी पुरुषांना मासिक पाळी चालू असलेल्या स्त्रीचे आत्यंतिक भय वाटते. पहिली पाळी येते तेव्हा जमातीतील इतर स्त्रिया त्या तरुणीला जेवण देऊन तिचे स्त्रीजातीत स्वागत करतात. पाळी येणे, पाळी जाणे, लैंगिक संबंध यांच्यासंबंधी आदिवासी मुलींना अगदी लहानपणापासून माहिती असते, त्यात कोणतीही गुप्तता पाळली जात नाही.

सामुदायिक शयनगृहामध्ये (घोटुल) राहत असताना आदिवासी तरुणीचा इतर आदिवासी तरुणांशी निकटचा संबंध येतो. त्या तरुणांमधून तिला योग्य वाटलेल्या तरुणाशी ती शारीरिक संबंध ठेवू शकते आणि त्या आदिवासी तरुणाला ती आवडल्यास त्या तरुणाचे आईबाप त्या मुलीला विवाहासाठी मागणी घालतात. मागणी घालण्याचे वेळी एक पायली तांदूळ आणि मडक्यात दारू घेऊन वरपिता वधुपित्याच्या घरी जाऊन त्याला म्हणतो की, 'तुमच्या बागेत एक सुंदर फूल उमललेले आहे. ते खुडून आम्ही आमच्या डोक्यात खोवू इच्छितो.' असे म्हणून तो सोबत आणलेले तांदूळ आणि दारू वधूपित्याच्या हवाली करतो. वधूपिता त्याच्या पितरांना कौल लावतो. कौल चांगला लागला तर तांदूळ आणि दारू स्वीकारली जातात आणि नंतर जेवण होते. मुलीला स्थळ पसंत असले तरच विवाह ठरतो. मुलीला मुलगा पसंत नसेल तर वधूपिता वरपित्याला सांगतो की, 'आमच्या बागेतील हे फूल खुडण्यासाठी नाही.'

आदिवासी विवाह तीनचार दिवस चालतात. जेवणे, दारू पिऊन भरपूर नाचणे हा मुख्य कार्यक्रम असतो. वस्तीवरचा भगत लग्नाचे पौरोहित्य करतो. वधूवर एकमेकांना अंगठ्या देतात. झोपडीच्या छपरावर उभे राहून मुलाचा चुलता वधूवरांचे अंगावर हळदीचे पाणी ओततो आणि विवाह संपन्न होतो. तरुणीला विवाहपूर्व काळात तिच्या चाहत्यांकडून कंगवे भेटवस्तू म्हणून मिळालेले असतात ते सर्व कंगवे ही नवविवाहित तरुणी आपल्या पूर्वीच्या चाहत्यांना परत करते.

आदिवासी तरुणींना आपल्या शरीराची काळजी घ्यायला, न्हायला फार आवडते. स्वच्छ काही वस्त्रे नेसून त्यातील उरलेल्या वस्त्राने त्या वक्षस्थळ झाकतात. अनावृत्त वक्षस्थळाबद्दल त्यांना तमा नसते. आदिवासी तरुण तरुणींच्या वक्षस्थळांवरून त्यांचे सौंदर्यमापन करतात. त्या तरुणींचे चाहते सुंदर नक्षीकाम केलेले कंगवे त्यांना भेट देतात. असे भेट मिळालेले कंगवे उत्तम केशभूषा करून ह्या तरुणी केसात खोचतात आणि महाराणीच्या रुबाबाने रस्त्यावरून मिरवत जातात. आपल्या प्रियकराला खुश करण्यासाठी त्या त्याला तंबाखू देतात. आरसा उपलब्ध नसल्याने स्वतःच्या सावलीकडे न्याहाळून त्या आपले वस्त्र ठीक करतात. सुडौल बांधा, स्वच्छ

शरीर, पांढरे शुभ्र कटीवस्त्र, सुंदर रितीने बांधलेला केशसंभार, सुंदर भरपूर दागिने, लयबद्ध नृत्य न थकता करण्याची क्षमता, घरकामात आणि शेतीकामात मदत करण्याची क्षमता या आदिवासी तरुणींच्या जमेच्या बाजू समजल्या जातात.

आदिवासी तरुणी घोटुलमध्ये आपल्या जोडीदाराचे केस विंचरून त्याला मालीश करतात. सर्वच आदिवासींचा भुताखेतांवर विश्वास असतो. त्यांना खुश ठेवण्यासाठी ते तत्पर असतात. बळी देण्याची पद्धत सर्वत्र आढळते. ह्या अंधश्रद्धेमुळे विकास कार्याला खीळ बसते. आता मुलींच्या शिक्षणामुळे थोडा थोडा फरक जाणवत आहे. घोटुलमध्ये रात्री जाताना प्रत्येकजण आपापली चटई बरोबर घेऊन जातो. ह्या चटईभोवती तरुण तरुणींच्या अनेक नाजूक आठवणी गुंफलेल्या असतात. प्रत्येक कार्य करताना शकुन-अपशकुन पाहिले जातात आणि चांगला शकुन असेल तरच त्या कार्याची सुरुवात करतात.

मृत्यू आलेला आदिवासी जर अविवाहित असेल तर त्याचा आत्मा मृत्यूनंतर वस्तीवरच्या झाडावर वास्तव्य करतो आणि लोकांवर लक्ष ठेवतो अशी त्यांची समजूत आहे. त्याचप्रमाणे पाण्यात पाणपऱ्या असतात आणि त्या तरुणांना पाण्यात ओढून नेतात असाही समज आहे. आदिवासींच्या अंधश्रद्धांची लांबच्या लांब यादी करता येईल. त्यांच्यातील अंधश्रद्धा निर्मूलन करणे अतिशय कठीण काम आहे हे त्यांच्या सहवासात राहिले की ध्यानात येते.

दर आठवड्याच्या बाजाराला मैत्रिणींबरोबर हसतखिदळत जाणे ह्या तरुणींचा आनंदाचा भाग असतो. बाजाराला जाताना त्या अर्थपूर्ण सुंदर गीते गात जातात. 'मधमाशीसारखी बारीक माझी कंबर आहे, उंदराच्या शेपटीसारख्या सुंदर माझ्या भुवया आहेत. खारीच्या शेपटीसारखे माझे काळेभोर भरगच्च केस आहेत, पूर्ण वाढ झालेल्या आंब्यासारखी माझी वक्षस्थळं आहेत. मी सुंदर कटिवस्त्र नेसले आहे आणि देखणे दागिने घातले आहेत. अशाप्रकारे नटूनथटून मी जेव्हा नकुलतारच्या बाजाराला जाते तेव्हा तरुणांना वेड न लागले तरच नवल!' बाजारात त्या त्यांच्या आवडीच्या वस्तू विकत घेतात. मदिरेबरोबर त्यांना आवडणारे पदार्थ खातात आणि सायंकाळी मोठ्या आनंदात घरी परत येतात. आदिवासींच्या बाजाराला 'हाट' म्हणतात आणि ह्या बाजाराला आपण जाणे हा एक अविस्मरणीय अनुभव असतो. बऱ्याच वेळा हा बाजारातच ह्या तरुणींना त्यांचा जोडीदार भेटतो.

आपल्या जोडीदाराशी पटत नसल्यास आदिवासी तरुणी पंचाकडे दाद मागून घटस्फोट घेऊ शकते. अशा घटस्फोटित तरुणींचा विवाह होण्यात अडचण येत नाही. घटस्फोटानंतर कोणत्याही प्रकारची कटुता बहुधा आढळत नाही.

वृद्धांना आदिवासी जमातीत मानाचे स्थान असते. हे सर्व समारंभात भाग घेतात. आदिवासी वृद्ध स्त्री अनेक प्रकारे उपयोगी पडते. शेवटपर्यंत काम करीत असल्याने वृद्ध स्त्रियांचा कोणावर भार पडत नाही. वृद्धाश्रमांची ह्या समाजाला अजिबात गरज नाही.

आदिवासी स्त्रिया स्मशान-यात्रेत भाग घेतात. आत्मा अमर आहे अशी त्यांची समजूत असल्याने त्यांना मृत्यूचे भय वाटत नाही.

आदिवासी स्त्री-जीवनावर आणखी खूप काही सांगण्यासारखे आहे; तिच्याकडून बरेच काही शिकण्यासारखे आहे. आदिवासींच्या शेकडो वर्षांच्या जीवनपद्धतीत हस्तक्षेप करावा की नाही हा एक मोठा यक्षप्रश्न आहे. यावर कोणाचेही एकमत होणे केवळ अशक्य आहे. आदिवासी स्त्रिया शिक्षित झाल्या की त्या त्यांच्या हिताचे निर्णय घेतील, धोरण ठरवतील अशी आशा आपण करूया. शहरी भ्रष्ट संस्कृती त्यांच्या माथी मारून त्यांचे निर्मळ, आनंददायी जीवन नाश पावायला नको. आदिवासींच्या उत्थानामध्ये स्त्रियांचे फार मोठे आणि महत्त्वाचे स्थान आहे हे लक्षात ठेवूनच त्यांच्यासाठीच्या विकास योजना केल्या पाहिजेत. ह्या योजना केवळ कागदोपत्री न राहता बचत गट, स्त्रियांच्या बँका आणि इतर संघटना यांच्यामार्फत कार्यान्वित केल्या पाहिजेत.

सध्या आदिवासी स्त्रीच्या आरोग्याच्या अनेक समस्या आहेत. त्याचप्रमाणे स्त्रीशिक्षणाचे प्रमाण नगण्य आहे. ह्या दोन प्रश्नांवर लक्ष केंद्रित करून आदिवासी स्त्रीची प्रगती साधता येईल. हे साध्य होण्यास खूप अवधी लागेल. कोणताही सामाजिक बदल घडण्यास बराच मोठा काळ जावाच लागतो.

('हाकारा' विशेषांक २००६ च्या सौजन्याने.)











# पारधी

## गिरीश प्रभुणे

**(श्री० गिरीश प्रभुणे यांच्याशी सविस्तर कृतिशील चर्चा ज्यांना करावयाची असेल त्यांनी प्रा० देवदत्त दाभोलकर यांच्याशी संपर्क साधावा.)**

२ ऑक्टोबर १९९१. 'भटके विमुक्त विकास परिषदे'ची स्थापना. त्यानिमित्त मेळावा भरला होता. सामाजिक समरसता मंचाच्या जिल्हा संयोजकांनी आपापल्या भागातील, परिचयातील भटकेविमुक्तांमधील काम करणाऱ्या कार्यकर्त्यांचा शोध घेऊन त्यांना निमंत्रित केलं होतं. तीन-चारशे कार्यकर्ते आले होते.

एकतर असा प्रयोग करण्यापूर्वी त्यावर अनेकदा बैठका झाल्या. राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या प्रमुख कार्यकर्त्यांच्या बैठका झाल्या.

हिंदू समाजातील काही समाजघटकांना जातीच्या आधारावर, सांस्कृतिक आधारावर एकत्र करावं का?

त्याचे परिणाम काय होतील...?

'विषमताविरहित हिंदू समाज' या मूळ बैठकीला यानं तडा तर जाणार नाही?

समरसता मंचाच्या स्थापनेच्या वेळी अशाच प्रकारच्या चर्चा झाल्या होत्या. यापूर्वी संघ स्वयंसेवकांनी जातिनिहाय संघटनांचं काम करू नये, असे संकेत होते. 'हिंदू सारा एक' या भावनेला छेद जाणारं वर्तन स्वयंसेवकांकडून होऊ नये, असा आग्रह असे.

पण समाजाचं व्यापक हित लक्षात घेऊन अशा एकत्रीकरणास संमती मिळाली. शिवाय मागास जाती-जमातींना प्रगत घटकांबरोबर आणण्याचे स्वतंत्र प्रयत्न करणं आवश्यक होतं. एकीकडे भारतीय संविधानानं सर्वांना समान हक्क, सर्वांना समान न्याय, प्रत्येकाला मतदानाचा अधिकार बहाल केला होता. शिवाय त्या मताचं समान मूल्य, असा क्रांतिकारक कायदा करून सर्वांना समान पातळीवर आणून ठेवलं होतं. परंतु मुळातले प्रगत घटक या सर्व गोष्टींचा फायदा जेवढा घेऊ शकत होते, तेवढा फायदा मागास जाती-जमातींना घेता येत नव्हता.

सर्वांना शिक्षणाची संधी होती. पण शिक्षणाचं महत्त्व त्यांच्यापर्यंत पोहोचलं नव्हतं. मागास घटकांच्या विकासासाठी अनेक कायदे करून त्यांच्या विकासप्रयत्नांना घटनात्मक स्थान देण्यात आलं. पण मुळातूनच प्रयत्न अपुरे पडले. स्वतःचा विकास साधण्यासाठी शिक्षणाची मूलभूत सोय त्या घटकापर्यंत पोहोचू शकली नाही.

राहायला घर नाही, स्वतःचा गाव नाही.

दान-भिक्षेवर गुजराण करण्याचा एकमेव मार्ग.

शेतकऱ्याच्या उत्पन्नातला त्याचा वाटा हा शेतकऱ्याच्या इच्छेवर मिळायचा. शेतकरीच दिवसेंदिवस अडचणीत येऊ लागला, तर तो या लोकांना कुठून देणार? बरं, शेतकरी हे दान फुकट देत नसे. त्या बदल्यात काही ना काही सेवा या समाजघटकांकडून त्याला मिळत असे. यांच्याकडून त्या सेवा घेण्याची त्याला आवश्यकता राहिली नाही. त्या दुसरीकडून पुरवल्या जाऊ लागल्या.

जसे,

- कैकाड्यांकडून धान्याच्या कणग्या मिळायच्या, त्यांची जागा लोखंडी पिंपांनी व आता प्लॅस्टिकच्या टाक्यांनी घेतली.
- वडारांकडून घर बांधकाम, विहीर बांधकाम-खोदाई व्हायची. आता विटांचा वापर सर्रास होऊ लागला. विहीर खोदाईला यंत्र-सुरुंगांचा वापर मोठ्या प्रमाणात होऊ लागला.
- पारधी-बेरड-रामोश्यांच्याकडे प्रामुख्यानं शिवाराच्या, गावाच्या रक्षणाची जबाबदारी असे. आता त्यासाठी पोलीसदल आहे. इंग्रजांनी त्यांच्या व्यवस्थेसाठी उभारलेली प्रशासकीय यंत्रणा आहे.
- ओतारी-घिसाडी-गाडीलोहार... या जमाती पूर्वी देवतांच्या मूर्ती, अवजारं-हत्यारं बनवून देत असत. आता हे सर्व बाजारात तयार मिळतं. त्यामुळे ओताऱ्यांच्या भट्ट्या बंद पडल्या. ओतकाम थंडावलं. घिसाडी-गाडीलोहार यांचे धंदे बंद पडले. निर्मिती थांबली. दुरुस्ती एवढाच व्यवसाय राहिला.
- वैदू - आयुर्वेद आणि ॲलोपथीचे दवाखाने - कारखाने निर्माण झाले. गावोगाव डॉक्टर आले.








वैदूंच्या पारंपरिक ज्ञानाची गरज संपली. रुग्ण आणि वैद्य यांतला जिव्हाळा संपला.

वासुदेव-गोंधळी-सरवदा-बहुरूपी इ. कलाकार जाती-जमातींची जागा, 'आकाशवाणी', 'दूरदर्शन' इ. दृक्-श्राव्य माध्यमांनी घेतली. अनेक धार्मिक विधी हळूहळू लोप पावू लागले.

परस्पर सहयोगावर अवलंबून असलेली सांस्कृतिक एकात्मता लोप पावू लागली. त्यातील आर्थिक देवाणघेवाणी बरोबरच परस्परसामंजस्य संपलं. नवी व्यावहारिक नाती निर्माण झाली. पूर्वी अनेक बारीकसारीक गरजासुद्धा भटक्या जमातींकडून पूर्ण होत असत. त्या त्या काळात, ऋतूत तो भटका आला नाही, तर चुकल्या चुकल्यासारखं वाटत असे. नियमित येणारा पाऊस, नव्या नवतीनं नटणारी सृष्टी, दुरून कुठून कुठून येणारे पक्ष्यांचे थवे आणि गावाच्या बाहेर मालावर उतरणारे भटक्यांचे, नंदीवाल्यांचे तांडे, कोल्हाटी-डोंबारी-माकडवाले-वैदू यांची पालं या सर्वांनी गाव 'गाव' बनत असे. त्यांनी ग्रामीण संस्कृतीचं रसायन बनत असे. साऱ्या दुनियेची खबरबात या भटक्यांकडून पाटलाला मिळत असे. हजारो वर्षांची ही चालतीबोलती प्रसारमाध्यमंच होती !

पाच-पन्नास वर्षांपूर्वीपर्यंत दिसणारी विविधरंगी समरसता पाहता पाहता लुप्त झाली.

हरणांचे कळप...
वाघसिंहांच्या डरकाळ्या...
बगळे-करकोचे...
पोपटांचे थवे...
मोरांचा कर्कश परंतु ओढ लावणारा केकारव...
कोकीळ, भारद्वाज...
अगदी गिधाडं-घुबडं-कावळेसुद्धा कमी झाले.

पुरुष पुरुष उंचीची ती गिधाडं. थरकाप उडवणाऱ्या त्यांच्या चोची.

हे सारं कुठे गेलं...?
आता फक्त माणसांचे कळप...
माणसांचीच गर्दी...
माणुसकीहीन माणसांचं अरण्य...
एकरंगी...
एकसुरी...

या सगळ्यातल्या किमान मानवी जीवनाचा, त्यातल्या त्यात परंपरेनं एकमेकांशी नातं जुळलेल्या आणि जखडलेल्या हिंदू समाजाचा तरी विचार करावा.

या मागास घटकांसाठी विशेष प्रयत्न करावेत. विकासाचा आराखडा तयार करावा. प्रगत घटकांनी अप्रगत सामाजिक घटकांना हात द्यावा आणि आपल्याबरोबर घ्यावं. आर्थिक, सामाजिक, राजकीय तसेच सांस्कृतिक विकास घडविण्यास सहकार्य करावं. आणि जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात प्रगती करण्यासाठी संधी उपलब्ध करून देण्यासाठी प्रयत्न करावेत.

त्या दृष्टीनं २ ऑक्टोबर ९१, महात्मा गांधी जयंतीचा दिवस हा परिषदेच्या स्थापनेचा दिवस ठरला. महात्मा गांधींनी मनुष्यकेंद्रित विकासाची संकल्पना मांडून प्रयत्न केले आणि भारतीय संस्कृतीच्या संकल्पनेत विकासाची रचना व प्रयोग केले. पंडित दीनदयाळ उपाध्याय यांनी मांडलेलं एकात्म मानव दर्शन आणि गांधी दर्शन यांत मूलत: भेद काही नाही.

२ ऑक्टोबरच्या परीषदेसाठी, बेळगावच्या 'उत्थान' या देवदासींसाठी काम करणाऱ्या संस्थेचे प्रमुख आणि 'बेरड' या आत्मवृत्तानं सुप्रसिद्ध झालेले डॉ० भीमराव गस्ती यांना उद्घाटनासाठी निमंत्रित करण्यात आलं.

भिकूजी उर्फ दादा इदाते त्या वेळी संघाचे महाराष्ट्र प्रांत कार्यवाह होते. दादा स्वत: एका भटक्या सरवदा ह्या घटकातले. गीतं गाऊन भविष्यकथन करणारी ही एक प्राचीन जमात. दादांचे आई-वडील कमालीच्या दारिद्र्यामुळे अखेर मुंबईला स्थलांतरीत झालेले. सिद्धिविनायक मंदिरासमोर भिक्षा मागून गुजराण करीत असत. पुढं तिथेच ते पानाफुलांचे वाटे घेऊन बसू लागले. दादांचा संघाचे स्वयंसेवक असलेल्या भागवत गुरुजी यांच्याशी बालपणीच संपर्क आला. आणि भागवत गुरुजींनी त्यांना शाखेत आणलं. त्यांच्या शिक्षणाकडे लक्ष पुरवलं. वसतिगृहात त्यांची सोय केली. दादांनी आई-वडिलांचे हाल पाहवत नसतानाही, वारंवार पैसे कमविण्याचा मोह होत असताना तो बाजूला सारून शिक्षण पूर्ण केलं आणि मग ते माध्यमिक शिक्षक म्हणून लागले.

सरवदा समाजाची स्थिती अत्यंत वाईट. राहायला घर नाही. भिक्षेवर गुजराण. सर्व कार्यांत दारूला मध्यवर्ती स्थान. अंधश्रद्धा आणि अशिक्षितता यांत अडकलेल्या समाजाला दादांनी वस्त्यावस्त्यांवर जाऊन शिक्षणाच्या

अनुक्रमणिका

प्रवाहात आणलं. त्याचबरोबर सरवदा संघाशी संबंधित झाला. एका जातीच्या विकासाचा आलेख डोळे दिपवणारा आहे. पंचवीस-तीस वर्षांपूर्वी असणारी सरवदा ही भटकी जमात आता रत्नागिरी जिल्ह्यात शंभर टक्के साक्षर झाली आहे. अनेक जणांना विविध प्रकारच्या नोकऱ्या लागल्या आहेत. उद्योगधंद्यांत मंडळी गुंतली आहेत. त्याचबरोबर समाजसेवेचं व्रत घेऊन अनेकजण कार्य करीत आहेत.

दादांच्याकडे भटके-विमुक्त विकास परिषदेच्या अध्यक्षपदाची जबाबदारी आली. या वेळेपासून माझ्याकडे समरसता मंचाचं काम, विशेषत: भटके, विमुक्त विकास परिषदेचं काम सोपवण्यात आलं. परिषदेतील अनुभवकथन सुरु होतं...



दि. १२-५-०६

आदरणीय श्री. दाभोलकरसो,

शि. सा. नमस्कार

पूर्वी रामगरवाडी, पंढरपूर, तसेच सातारा समरसता संमेलनात आपली समक्ष भेट आणि उभारी देणारे मार्गदर्शनही झाले आहे. (मला).

आपण केलेल्या आग्रहामुळे 'पारधी' हे अनुभवावर आधारित पुस्तक नुकतेच राजहंसने प्रकाशित केले आहे. अलिप्तपणे लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. आपल्या अवलोकनार्थ पाठवित आहे. प्रकल्प -त्याचं यश-अपयश कशात मोजायचं असतं मला समजत नाही. पण मी या कामानं फारसा समाधानी नाही. समाज रूढी बंधनातून अत्याचारा-तून मुक्त होईलही. नक्कीच. कारण त्यांची तशी इच्छा आहे. पण उर्वरित समाजाचं काय? त्याच्यातले बदल? या प्रश्नानंच अस्वस्थता वाढते.

आपण कसे आहात? प्रकृतीस जपावे. अधिक काय लिहिणार? प्रत्यक्ष भेटीची इच्छा आहे. पुस्तक वाचनानांतर.

आपला

गिरीश प्रभुणे



१८-०५-०६

स्नेहपूर्वक पाठविलेले मिळाले. धन्यवाद. प्रत्ययकारी. वाचत आहे. सोबतचे पत्रही मिळाले. भटक्यांच्या प्रश्नाबाबत चर्चात्मक सविस्तर मांडणी आपण करावी असे मी आपल्याला म्हणालो होतो. आपण 'नवभारत' मध्ये प्रसिद्ध करू. काही गति मिळते का ते पाहू.

अवश्य विचार करावा.

सस्नेह

देवदत्त दाभोलकर



## पारधी जीवनातील जळजळीत वास्तवाचे दर्शन

- डॉ० शुभदा शहा

"माजा जनम झाला तवा माजी माय तुरुंगात व्हती... किसनचा जनम असाच जाला... आमाला इतबर जिमिन नाय पाय टेकायला. आमचं आभाळ कोन्तं आमाला नाय म्हाईत. आमचं रास्ट्र कोन्तं आमाला नाय म्हाईत." हिंदू समाजातील एका घटकाची ही स्थिती...! परस्पर सहयोगावर उभ्या असणाऱ्या भारतीय सांस्कृतिक एकात्मतेतील भटके-विमुक्त म्हणजे हजारो वर्षांची चालती-बोलती प्रसारमाध्यमं होती. आज मात्र माणुसकीविहीन माणसांच्या अरण्यात अन्याय-अत्याचारांच्या असह्य भळभळत्या जखमा उरात-शरीरावर वागवत जगण्याची धडपड करताहेत. भटके-विमुक्त, पारधी यांच्या विकासासाठी पावलं कशी टाकता येतील, या दिशेनं वेध घेताना गिरीश प्रभुणे यांना पारधी समाजाचं जे दर्शन झालं; त्यांच्या मानसिकतेचा जो वेध त्यांनी घेतला; त्यांच्या जीवनानुभवांशी जिव्हाळ्यानं समरस होऊन त्यांच्यावर होणाऱ्या अन्यायाचा व त्यामागील कारणांचा जो शोध घेतला, त्याचे अत्यंत वस्तुनिष्ठ व मनाचा थरकाप उडविणारे चित्रण 'पारधी' पुस्तकात वाचावयास मिळते. हृदय हेलावून टाकणाऱ्या अनेक पारधी स्त्री-पुरुषांच्या, बाल-बालिकांच्या जीवनघटना यात आहेत. सत्याधिष्ठित अनुभवांना शब्दबद्ध करीत गिरीश प्रभुणे पारधी समाजाचा इतिहास, त्यांचे

समाजातील स्थान, माणूस असूनही त्यांना मिळणारी अमानुष वागणूक यांचे आलेखन करीत पारधी समाजाच्या वास्तवाचे अंतर्बाह्य दर्शन घडवितात.

एकेकाळी पारधी जमातीची व समाजाची घट्ट वीण असणाऱ्या या स्वातंत्र्यप्रेमी पारध्यांच्या जातपंचायती, त्यातली न्यायदानाची पद्धत, न्यायदानाची कठोर अंमलबजावणी, न्याय देणाऱ्या पंचांची स्मरणशक्ती, परंपरेने चालत आलेल्या न्यायनिवाड्याच्या गोष्टी जितक्या विस्मित करणाऱ्या तितक्याच तीन-चारशे वर्षांची इंग्रजांची राजवट आणि पन्नासएक वर्षांची स्वातंत्र्याची परंपरा. या सगळ्यांतून या भटक्या जमातींनी राखलेलं आपलं स्वतंत्र अस्तित्व चकित करणारं ठरतं. जगण्यासाठी - अस्तित्वासाठी वीतभर जमीन, अंग झाकण्यासाठी कपडा अन् पोट भरू शकेल इतकं अन्न एवढी माफक गरज असणाऱ्या या समाजाला आज मात्र मिळत आहे, आयुष्यभराची वणवण, अत्याचार अन् वंचना! भयानक अत्याचारांना सामोरे जाणाऱ्या व असुरक्षिततेची टांगती तलवार सतत डोक्यावर वागवणाऱ्या पारध्यांचे जीवन लेखकाला चक्रावून टाकते. भटक्या-विमुक्तांचं, पारधी बांधवांचं जगणं सुसह्य व्हावं व काळाच्या ओघात झालेल्या जखमा भरून येऊन समाजातील दरी नष्ट व्हावी, हा 'पारधी'च्या लेखनामागील उद्देश आहे.

भटक्या-विमुक्तांच्या, विविध जातीजमातींच्या अनेकविध समस्यांचं स्वरूप 'पारधी'मध्ये दृगोच्चर होते. अंतर्गत कलह व पोलिसांकडून झालेले व होणारे अत्याचार यांचे दर्शन घडवीत लेखक पारध्यांच्या जीवनशैलीचे चित्र वाचकांसमोर उभे करतो. एकेका कुटुंबाचे प्रश्न म्हणजे महाभारत असणाऱ्या पारध्यांच्या जीवनशैलीत, विचारशैलीत परिवर्तन घडवून सध्याच्या गतिमान युगाशी त्यांचा सांधा कसा जुळेल, तसेच त्यांचा मूळ निसर्गाशी तादात्म्य पावलेला सूर लोपणार नाही, या दृष्टीने उभारलेल्या विविध प्रकल्पांचे स्वरूप जसे लेखक स्पष्ट करतो, तसेच अशा प्रसंगातून निर्माण झालेल्या चांगल्या वाईट घटनांचे निवेदन, विवेचन, विश्लेषणही लेखक करतो. पोलिसांकडून त्यांना होणारी मारझोड, अत्याचार, बलात्कार व ते सहन करणाऱ्या स्त्री-पुरुषांचे अनुभव मनाला खिन्न-विषण्ण करणारे आहेत. "पनास वरसं झाली माजी, माजं आयुष्य आसंच गेलं. नवऱ्याला मारझोड करून आत टाकायचं पोलिसानं. तरी त्यो पळून जायचा. माज्याव कितींदा या पोलिसानं अत्याचार क्येला आसल. कुनाला सांगावं? सारा जनम गेला पोलिसांचं जोडं उराशी धरन्यात. आता माज्या पोराची बायको बी भडव्यानं बाटवली. थू आमच्या जिनगिनीवर... आमचो आबरून खोबरे जालो..." स्त्रियांच्या मनातील वणव्याच्या झळा वाचकांपर्यंत लेखक नेऊन पोहोचवितो. त्यांची चीड, आक्रोश, आकांत व हतबलता अत्यंत परिणाकारकतेने लेखकाने दृश्य केली आहे. गांधींचा भारत..., डॉ. आंबेडकरांचा भारत..., विवेकानंदांचा भारत आणि या पारध्यांचा भारत यांच्यातील दरी दर्शविणारी पारध्यांची जीवनशैली वाचकांना अंतर्मुख करणारी आहे. पारध्यांनी संघटित होऊ नये म्हणून पारतंत्र्यात ब्रिटिशांनी त्यांना विघटित केलं आणि सर्व संकटांचं मूळ 'बाई' अशा विचित्र समजुतीनं पारध्यांनी स्व-समाजाचं अधिकच विच्छेदन केलं. पारधी समाजात स्त्रीचं स्थान अगदी नगण्य. किंबहुना पारधी स्त्री ज्या सतरंजीवर बसेल, त्यावर पारधी बसत नाहीत; ज्या पाण्याला स्पर्श करेल ते पाणी पीत नाहीत; असे अनेक रीत-रिवाज, प्रथा-परंपरांचे अनेक कवडसे पारधी समाजाची जीवनशैली दर्शविताना स्वाभाविक सहजतेनं प्रगटतात. या जमातीतील काही शिक्षितांच्या वाट्याला येणारी दुःखाची जातकुळी काहीशी वेगळी असली तरी त्यांची होणारी कुचंबणा प्रत्ययकारितेनं 'पारधी'मधून प्रकटते. अथक चालणं, एकाग्रता, चपळता, साहस या गुणविशेषांनी युक्त असणाऱ्या पारध्यांचा विकास करण्यासाठी लेखक प्रयत्नशील असल्याचे जाणवते. तसेच मानवतेचे पोवाडे गाणाऱ्या समाजाची दांभिक बाजूही प्रकाशात येते. भटक्या-विमुक्तांच्या उद्ध्वस्त समाजाचं-जीवनाचं चित्र, सुसंस्कृत म्हणविल्या जाणाऱ्या समाजाचा बुरखा फाडत जातं. स्वातंत्र्य मिळालं तरी, सत्ताधारी, प्रशासकीय यंत्रणा, समाजातील लोकांची या प्रश्नाविषयीची अनास्था यामुळे स्वातंत्र्याचा एकही किरण न पाहिलेल्या समाजाचे हे दर्शन जितके वास्तव तितकेच विदारक आहे.

गंभीर, अंतर्मुख करणारे विषयविवेचन, त्यातून उमलत जाणारी बोलकी व्यक्तिचित्रे, हृदयस्पर्शी सरस भावचित्रे, चित्रदर्शी शैली, काव्यात्मता, संवेदनांना आवाहन करणारी लेखकमनाची स्पंदने, औत्सुक्य जागतं ठेवणारी वातावरण निर्मिती यामुळे 'पारधी' प्रत्येकानं वाचावा, असा ग्रंथ आहे.








# स्त्री-पुरुष समानता

एसेमशी झालेल्या अनसूया लिमये यांच्या चर्चेचे काही प्रसंग (एस्० एम्० पृ० ५४-५६)

अनुताई : "अण्णा, पुरुषांचं बरं असतं. त्यांना बाहेरच्या कामाबरोबर घर, मुलं यांची कर्तव्यं मागे नसतात."

अण्णा : (समजुतीच्या स्वरात) "ते खरे आहे. पण माझं म्हणणं तू लक्षात घे. माझं तर असं म्हणणं आहे की आम्हा पुरुषांपेक्षा तुम्ही स्त्रिया भाग्यवान आहात. कारण तुम्हाला निसर्गानेच मातृत्वाची जबाबदारी दिली आहे. समाजवादाची शिकवण लोकांना देणं तुम्हा स्त्रियांनाच जास्त चांगलं जमेल. असं बघ, आईला चार मुलं असली तर, एकाला जास्त, दुसऱ्याला कमी असं आई कधी करते का? उलट, एखादं मूल दुबळं असेल, अपंग असेल, तर खरी आई त्याच्यासाठी जास्त वेळ देईल. त्याला जास्त सकस अन्न देईल, त्याची जास्त काळजी घेईल. समाजवाद तरी दुसरं काय शिकवतो? आई कुटुंबासाठी हे करीत असते. समाजवाद समाजाच्या क्षेत्रात हीच शिकवण देतो. गरीब, मागास, हरिजन, स्त्रिया यांना इतर समाजाबरोबर आणा यावरच आपण भर देतो ना? मग हे सारं तुम्ही स्त्रिया जास्त करू शकाल की आम्ही पुरुष? मी तर म्हणतो तुम्ही माता म्हणून आमच्यापेक्षा जास्त चांगल्या कार्यकर्त्या व्हाल!"

दुसरा प्रसंग क्रांतीसंबंधातला. देशाची फाळणी होणार हे ठरलं आणि नोआखालीचं हत्याकांड सुरु झालं. महात्मा गांधी स्वातंत्र्य सोहळ्यासाठी न थांबता, नोआ-खालीत जाऊन बसले.

अण्णांनी मुद्दाम मला बोलावून माझी आणि महात्माजींच्या मदतीला धावलेल्या माझ्या पतींची - श्री० शिरुभाऊंची - चौकशी केली. पण त्याहीपेक्षा महत्त्वाचं म्हणजे इंदू केळकर आणि सिंधू देशपांडे - ज्या माझ्याबरोबर १९४२ च्या चळवळीत जेलमध्ये होत्या - त्यापण नोआ-खालीत कामाला जाऊ इच्छित होत्या. बऱ्याच पुरुष कार्यकर्त्यांचं म्हणणं, आणि अर्थातच स्त्रियांचं देखील, असं होतं की तिकडे स्त्रियांवर अत्याचार घडत आहेत, त्यांच्या अब्रूवर घाला पडत आहे, तिथे स्त्रियांनी जाणं धोक्याचं! शेवटी मी त्या दोघींना घेऊन अण्णांकडे गेले. अण्णांनी सगळं ऐकून घेतलं, आणि म्हणाले, "विरोध करणाऱ्या मंडळींना तुम्ही सांगा, एखाद्या ध्येयासाठी प्राणावर उदार झालेल्या स्त्री-कार्यकर्त्यांच्या अब्रूची काळजी तुम्ही कशाला करता? त्या पाहून घेतील. मी तुम्हाला मुळीच अडवणार नाही. मात्र विचारपूर्वक पाऊल टाका." आमच्या विचारांचा तो विजय होता.

नंतर सीमा लढा जोरात चालू असताना, शेकडो सत्याग्रही बेळगावच्या दिशेने वाटचाल करणार होते... पण त्यापूर्वी अण्णांनी मला सांगितले होते, "तू एक स्त्रियांची तुकडी घेऊन गुजराथमध्ये जा. मुंबई, बेळगांव, निपाणी सह संयुक्त महाराष्ट्राची आमची मागणी असली तरी मुंबईत गुजराथी मंडळींवर जे अन्याय होत आहेत ते मुळीच योग्य नाहीत. गुजराथी मंडळींशी आमचा मुळीच विरोध नाही. उलट भाषावार प्रांतरचनेच्या बाबतीत त्यांनी चालवलेल्या महागुजराथ आंदोलनालाही आपण पाठिंबाच देत आहोत. हे व्यक्त करण्यासाठी तिकडेही एक तुकडी गेली पाहिजे व ती स्त्री-सत्याग्रहींची तुकडी असेल, तर मला बरे वाटेल."

"आंतरजातीय विवाहाचा पुरस्कार राष्ट्रसेवा-दलाने केला. अनुभवाने एक मुद्दा माझ्या लक्षात येतो तो असा की समाजात स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीने स्थान मिळाले पाहिजे हा संस्कार मनात खोलवर रुजलेला नसेल तर जातीतील विवाहही अपेशी ठरतात; तेथे आंतरजातीय विवाहांचे काय विचारावे? स्त्रीपुरुष समानतेचा विचार राष्ट्रसेवादलात केवळ अभ्यासवर्गातूनच येतो असे नाही तर तो कलापथक, सेवा-ऊर्फ-श्रमदान पथक यामधूनही येतो. मैदानी व शारीरिक शिक्षण मुलींना पूर्णपणे स्वतंत्ररित्या द्यावे व मुलींच्या शाखानायक मुलीच असाव्यात, एवढा कटाक्ष व्यावहारिक गरज म्हणून सेवादलाने बाळगला. मात्र कला-पथकाची, श्रमदानाची कामे, सेवाकार्य, अभ्यासवर्ग ही उपांगे स्त्री-पुरुष सेवादल सैनिकांनी एकत्र करण्याची कामे होत हे कृतीने दाखवून दिले." (मी एस्०एम्० पृ० १६३.)

(प्रा० देवदत्त दाभोलकर यांच्या 'नवयुवक युवतींसाठी एस्०एम्० जोशी : जसे मला भावले, समजले, उमजले' या पुस्तिकेतून. पृ० १९-२०.)



# ग्रामपंचायत - ग्रामसभा - महिला
## तृणमूले (पांढऱ्या मुळ्या)
('पंचायत भारती', २० डिसेंबर २००६ च्या सौजन्याने)

१

### ग्रामपंचायतीने काय केले पाहिजे?

**श्री० रा०वि० भुस्कुटे**

ग्रामपंचायती गावाचा कारभार पाहण्यासाठी असतात. गावातील रहिवाशांचे सर्वतोपरी तिने हितरक्षण करावयाचे असते. ग्रामपंचायत म्हणजे कोणती एक व्यक्ती नाही. गावातील मतदानाचा अधिकार असलेले मतदार, या मतदारांची ग्रामसभा, मतदारांनी निवडून दिलेले ग्रामपंचायत सदस्य आणि या सदस्यांनी आपल्यातून निवडलेले सरपंच आणि उपसरपंच मिळून ग्रामपंचायत होते. थोडक्यात ग्रामपंचायत ही सामुदायिकरित्या काम करणारी संस्था आहे. तिला स्थानिक स्वराज्यसंस्था म्हणूनही संबोधण्यात येते. स्थानिकांचे स्वतःचे राज्य म्हणजे ग्रामपंचायत असाही याचा अर्थ होतो.

महाराष्ट्र ग्रामपंचायत अधिनियम १९५८ च्या तरतुदी आणि त्याखाली करण्यात आलेल्या नियमानुसार ग्रामपंचायतींनी आपला कारभार करावयाचा आहे. या कायद्याच्या प्रकरण ३ कलमे ४५ ते ५४ नुसार ग्रामपंचायतीच्या शासकीय शक्तींची निश्चिती केली आहे. तसेच, ग्रामपंचायतींनी पार पाडावयाची कर्तव्येही सुनिश्चित केलेली आहेत. ग्रामपंचायतींनी पार पाडावयाची कर्तव्ये म्हणजे विकासकामे कलम ४५ नुसार अनुसूची एक मध्ये दिलेली आहेत. एकूण ७९ प्रकारची विकासकामे ग्रामपंचायतींनी पार पाडावयाची आहेत. अनुसूची एक ची नोंद सन १९७० च्या सुधारणा कायद्याप्रमाणे सुधारण्यात आली असली तरी सरकारी ठराव क्र. २६८१/२१२६९ ता. १७ ऑगस्ट पर्यंत ती सुधारण्यात आली आहे. म्हणजे ती अद्ययावत आहे.

कलम ४५ प्रमाणे अनुसूची एक मध्ये नमूद केलेल्या ७९ कर्तव्यांचा काळजीपूर्वक अभ्यास केला तर असे दृष्टोपत्तीस येते की, यापैकी ६० टक्के म्हणजे जवळजवळ ४८ ते ५० विकास कामे गावातील जमिनीशी निगडित आहेत म्हणजे जमिनीवर सर्वस्वी आधारीत आहेत. तेव्हा ही विकासकामे पार पाडावयाची असतील तर गावाच्या अधिकार कक्षेत असलेल्या सर्व प्रकारच्या जमिनीच्या इत्थंभूत तपशीलवार माहिती ग्रामपंचायतीने उपलब्ध केललीच पाहिजे. तसेच गावच्या ज़मिनींना लागू असलेल्या विविध महत्त्वाच्या कायद्यांच्या प्रमुख तरतुदीही ग्रामपंचायतींनी जुजबी का होईना माहिती करून घेतल्या पाहिजेत. एवढेच नव्हे तर ग्रामपंचायतीला विकासकामे पार पाडण्यासाठी जे निर्णय घ्यावे लागतात, ते बिनचूक योग्य आणि साधार आहेत हे वेळप्रसंगी सिद्ध करण्याकरिता महसूल खात्याकडील कागदपत्रांच्या प्रती आवश्यक तो खर्च करून मिळवल्या पाहिजेत आणि त्या संग्रही ठेवण्याची नितांत आवश्यकता आहे. या दृष्टीने ग्रामपंचायतीकडून काही पद्धतशीर सुनियत प्रयत्न झाले आहेत का याची माहिती घेण्याचा प्रयत्न येथे करण्यात आला आहे. परंतु असा काही प्रयत्न आजपर्यंत झाला असल्याचे आढळून आले नाही. तेव्हा खालील काही उद्दिष्टे ठेवून लेखमाला गुंफली आहे.

१. महसूल खात्याकडून ठेवण्यात येणाऱ्या गावातील जमिनींबाबतची माहिती देणे आणि ग्रामपंचायतींनी पार पाडावयाच्या विकासकामांच्या संदर्भात माहितीची वैशिष्ट्ये सांगावयाचा प्रयत्न करणे.

२. जमिनीविषयीची कोणकोणती अत्यावश्यक मूलभूत कागदपत्रे महसूल खात्याकडून प्राप्त करावी लागतील हे सांगणे.

३. अनुसूची-१ मधील विकास कार्यापैकी जमिनीसंबंधातील विकासकामे पार पाडण्यासाठी ग्रामपंचायतीला निर्णय घ्यावे लागतात. ग्रामपंचायतीचे हे निर्णय कायदेशीर असावेत म्हणून अवश्य असलेल्या संबंधित कायद्याच्या तरतुदी विशद करणे.

प्रत्येक ग्रामपंचायतीला कायद्याच्या कलम ४५ प्रमाणे नेमून दिलेली ७९ विकासकामांपैकी जास्तीतजास्त कामे पार पाडायची आहेत. त्यासाठी अचूक साधार निर्णय

अनुक्रमणिका

घेता यावेत म्हणून काही कायद्याची पुस्तके ग्रामपंचायतीने संग्रही ठेवणे जरूरीचे आहे.

१. महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम १९६६ आणि नियम.
२. महाराष्ट्र जमीन महसूल नियमपुस्तिका खंड १ ते ५
३. मुंबई कुळवहिवाट आणि शेतजमीन अधिनियम १९४८ आणि नियम.
४. मुंबई तुकडे पाडण्यास प्रतिबंध करणे आणि शेतजमीन तुकड्याचे एकत्रीकरण करणे. अधिनियम १९४७ आणि नियम.
५. महाराष्ट्र शेतजमीन (जमीनधारणेची कमाल मर्यादा) अधिनियम १९६१ आणि नियम.
६. महाराष्ट्र अनुसूचित जमातींना पुनर्स्थापित करण्याचा अधिनियम १९७५
७. भूमी संपादन अधिनियम १८९४ आणि नियम.
८. मुंबई सावकारी नियंत्रण कायदा १९४७ आणि नियम.
९. मुंबई कर्जदार शेतकरी सहाय्य अधिनियम १९४७
१०. महाराष्ट्र प्रकल्प विस्थापितांचे पुनर्वसन अधिनियम १९७७ आणि नियम.
११. हिंदू उत्तराधिकार अधिनियम १९५६ आणि नियम.
१२. भारतीय वन कायदा १९२७ आणि नियम.
१३. मिळकत हस्तांतरण अधिनियम १९८२ आणि नियम.
१४. चौदा भारतीय नोंदणीचा अधिनियम १९०८ आणि नियम.
१५. महाराष्ट्र सहकारी अधिनियम १९६० आणि नियम.
१६. किमान वेतन कायदा आणि नियम.
१७. माहिती अधिकार अधिनियम आणि नियम.
१८. अनुसूचित जाती अनुसूचित जमाती अत्याचार प्रतिबंधक कायदा १९८९.
१९. वेठबिगार पद्धती (उच्चाटन) कायदा १९७६.
२०. रोजगार हमी योजना कायदा.

आर्थिकदृष्ट्या परवडणार असेल तर टिपणीसह कायद्यांची पुस्तके शक्यतो खरेदी करावीत. त्याचप्रमाणे उचित वाटल्यास प्रस्तुत लेखकाची खालील काही पुस्तके ग्रामपंचायतीला उपयोगी पडणारी आहेत. जमीन प्रशिक्षण भाग १ ते ४, हक्क नोंद (पाचवी आवृत्ती), सातबारा आदिवासी वनहक्क मान्यता आणि जमीन सुधारणा कायदे.

## २
## महिला मंडळ आणि ग्रामसभा

सुप्रिया संदीप सावंत

### खवली कातकरवाडी समाजमंदीर

दिनांक २५-८-०६ रोजी महिला बचत गट व इतर सर्व महिला गोळा होऊन काही विषयांवर चर्चा व्हावी यासाठी मीटिंग करण्यात आली. पिलोसरी, खवली, विडसई, विठ्ठल-वाडी, खवली-आदिवासी वाडी या गावातील काही महिला या मीटिंगमध्ये उपस्थित होत्या. मीटिंग दुपारी १ वाजता सुरु झाली.

प्रथम महिला एकत्रीकरण हा विषय मांडण्यात आला. अशा काही सार्वजनिक मीटिंग ज्यावेळी ठरविल्या जातात त्यावेळी सर्व महिलांनी एकत्र येऊन मीटिंगला उपस्थित राहणे हे आपले कर्तव्य समजले पाहिजे यावर चर्चा झाली.

### अडचणींची चर्चा

त्यानंतर सर्वात महत्त्वाचा मुद्दा मांडण्यात आला तो म्हणजे महिला ग्रामसभा व जनरल ग्रामसभा. या ग्रामसभेला सर्व महिलांनी उपस्थित राहणे आणि त्या ग्रामसभेत आपल्या काही अडचणी असतील त्या मांडणे. ग्रामसेवक व सरपंच यांच्याशी आपल्या अडचणींविषयी चर्चा करणे. त्यातून त्यांच्याकडून आपल्याला काही सल्ला मिळतो व आपल्या अडचणी सुटल्या जातात. ही चर्चा करताना लगेचच विडसईच्या महिलांनी त्यांच्या पुलाविषयी व पाण्याविषयी प्रश्न टाकला. आज कितीतरी वर्षे पावसाळ्यात त्या पुलाला धोका असतानासुद्धा व ग्रामसभेत विषय टाकूनसुद्धा आमच्या पुलाचा प्रश्न सोडविला जात नाही. असे विडसईच्या महिला म्हणाल्या. त्यावेळी केळकरबाईंनी असा सल्ला दिला की गावातील या प्रश्नाला त्या गावातील लोकांनीच नव्हे तर खवली गावातील लोकांनी व खवली आदिवासी लोकांनीसुद्धा पाठिंबा दिला पाहिजे. अर्ज केला तर त्यावर सगळ्यांच्या सह्या असणे जरूरीचे आहे. एकीच्या बळानेच प्रश्न लवकरात लवकर सुटू शकतात.

तसेच पाण्याविषयी आणि पुलाविषयी असलेला आपला प्रश्न सुटत नाही यासाठी प्रत्येक ग्रामसभेला प्रत्येक रहिवाशाने उपस्थित राहणे फार महत्त्वाचे आहे. हा सर्वात

अनुक्रमणिका

महत्त्वाचा मुद्दा केळकरबाईंनी मांडला.

आदिवासी वाडी खवली यांचा बचत गट आहे. पण काही अडचणी आल्यामुळे त्यांचा गट दोन-तीन वर्षे स्थगित झाला आहे. हा विषय आदिवासी महिलांनी काढला. त्यावेळी अशी चर्चा झाली की ज्या महिलेवर कर्ज असेल त्या महिलेकडून फक्त मुद्दल घेण्यात यावे आणि मासिक वर्गणी १० रुपये किंवा २० रुपये असेल तर फक्त प्रत्येक महिलेची वर्गणी ५ रु. धरून असे किती महिने स्थगित झाले असतील त्या महिन्यांची वर्गणी गोळा करण्यात यावी. म्हणजे अशा रीतीने गट विस्कळित होण्याऐवजी पुन्हा चांगल्या रीतीने उभा राहिला जाईल. प्रत्येक महिलेने समज घेऊन आनंदाने पुन्हा गट उभा करावा असे ठरविण्यात आले.

त्यानंतर पुढच्या महिन्यातील मीटिंग पिलोसरी येथे घेण्यात यावी असे ठरले. मीटिंगमध्ये सर्व महिलांनी केळकरबाईंना असं सांगितलं की या मीटिंगमध्ये आम्हाला ग्रामसभेची माहिती जास्तीतजास्त मिळेल, अशी आम्ही तुमच्याकडून आशा बाळगतो. हा शेवटचा विषय मांडण्यात आला. यानंतर सर्व महिलांचे आभार मानून मीटिंग संपविण्यात आली.

३

## ग्रामसभेविषयी - मुक्काम पिलोसरी

मीटिंगला सुरुवात दुपारी १२.३० वाजता झाली. कळविलेल्या सर्व गावातील महिला म्हणजेच विडसई आदिवासी वाडी पिलोसरी, खवली, आदिवासी वाडी खवली, विठ्ठलवाडी व पिलोसरी गावातील महिला व वाफेघर गावातील महिला अत्यंत उत्सुकतेने उपस्थित राहिल्या होत्या. सगळ्यांच्या चेहऱ्यावर हसू फुलून आलं होतं. मीटिंगला पहिली सुरुवात देशमुखबाईंनी गाण्यानी केली. देशमुखबाई गाणे म्हणत होत्या. गोड आवाजात सर्व महिलांनी गाणे म्हटले. त्यामुळे सर्वांचा उत्साह वाढला.

यानंतर पिलोसरी गावात श्रीयोग महिला बचत-गटाच्या अध्यक्ष सौ. सुप्रिया संदीप सावंत यांनी सर्व महिलांचे स्वागत केले. यानंतर खवली गावात रा.ज.प. मराठी शाळेत निर्मिती संस्था उद्धर यांनी मीटिंग लावलेली होती. त्यानंतर विडसई व खवली आदिवासी वाडी येथे झालेल्या ग्रामसभेच्या मीटिंगविषयी माहिती मृणालला दिली. पहिल्या ज्या दोन मीटिंगा झाल्या त्यावेळी जास्त महिलांची उपस्थिती नव्हती. पण आज या मीटिंगला सर्वच गावातील महिला जातीने उपस्थित राहिल्या म्हणून मृणालताईंना आनंद झाला आणि त्यानी त्यांच्या वतीने व निर्मिती संस्थेच्या वतीने सगळ्यांचे स्वागत केले.

### ग्रामसभा महत्त्वाची

सगळ्यात महत्त्वाचा मुद्दा ग्रामपंचायतीमधील ग्रामसभेविषयी झाला. ग्रामपंचायतीतील सदस्यांना आपण निवडून देतो. म्हणून आपण त्यांच्याजवळ आपल्या अडचणी मांडल्या पाहिजेत. ग्रामसभेला बहुतेकवेळा पुरुषांची थोडीफार तरी उपस्थिती असते पण महिलांची मात्र अगदीच कमी उपस्थिती असते. त्यामुळे ग्रामसभेचे सदस्य मीटिंग तहकूब करतात. म्हणून प्रत्येक गावातील नागरिकांनी प्रत्येक ग्रामसभेला गेले पाहिजे. महिला असा विचार करतात की आमचे पुरुष गेले आहेत तर आम्ही कशाला जाऊ? पण महिलांनी असा विचार करायचा नाही. प्रत्येक सभेला हजर रहायलाच पाहिजे. वर्षातून एकूण सहा ग्रामसभा होतात. प्रत्येक जनरल ग्रामसभेच्या आधी महिला ग्रामसभा होते. प्रत्येक ग्रामसभेला हजर राहून आपण आपले प्रश्न मांडले पाहिजेत. आपल्या गावातील व इतर गावातील लोकांच्या ज्या काही अडचणी असतील त्या आपण मांडायला पाहिजेत. पाण्याविषयी, घरकुलाविषयी व गावातील रस्त्याचा प्रश्न मांडला पाहिजे. आपण एखादी अडचण मांडली, एखादा प्रश्न मांडला, त्याचा अर्ज दिला तर त्याची दखल घेतली जात आहे की नाही हे प्रथम आपण पाहिलं पाहिजे. गावातील रस्त्यामध्ये एखादा खड्डा पडला असेल तर तो रस्ता दुरुस्तीसाठी आपण प्रश्न मांडला पाहिजे. अशा प्रकारे प्रत्येक ग्रामसभेला हजर राहून आपण आपली खवली ग्रामपंचायत सक्षम केलीच पाहिजे.

तसेच आता शासनाने ज्या रस्ता दुरुस्तीबद्दलचे उपक्रम राबवले आहेत त्याबद्दल मृणालताईंनी थोडीशी तक्रार मांडली. ती अशी की जे रस्ते बांधले आहेत, त्यात जास्तीतजास्त सिमेंटचा वापर केल्यामुळे रस्ते फार गुळगुळीत झाले आहेत. गावात जी छोटी वाहने येतात, त्यांना तो रस्ता सुरक्षित आहे पण पाणी भरणाऱ्या महिलांना मात्र तो रस्ता धोकादायक आहे. कारण रस्ता गुळगुळीत झाल्यामुळे महिलांचे पाय सरकतात.










त्यामुळे महिला पडण्याची शक्यता आहे. एखाद्या महिलेच्या पायाला लागले किंवा शरीराच्या कुठल्याही अवयवाला मार लागला तर याला जबाबदार कोण? मृणालताईंनी हा विषय मांडायचे कारण की अशी घटना गावात झाली आहे.

### योजना काळजीपूर्वक राबविणे

यानंतर देशमुखबाईंनी पंचायत भारती या अंकातील ग्रामपंचायतीतील जबाबदारी ही माहिती वाचून दाखवली. यानंतर पाण्याविषयी व रेशनिंग कार्डाविषयी वाफेघरच्या अपर्णाताईंनी बोलायला सुरुवात केली. ग्रामपंचायत ग्रामीण भागात पाणी पुरवठा करत असते. पण तो व्यवस्थितरित्या करणे ही जबाबदारी ग्रामपंचायत व गावातील सरपंचांची आहे. कारण खवली आदिवासी वाडीमध्ये जी नळाची टाकी बांधली आहे त्या टाकीवर झाकण नाही म्हणजे त्या पाण्यात घाण कचरा जाऊन ते पाणी दूषित होणार मग अशा पाण्याचा जनतेला काय उपयोग? म्हणून ग्रामपंचायतीने ज्या योजना राबवल्या आहेत त्या काळजीपूर्वक राबवाव्यात असे अपर्णाताई म्हणाल्या. त्यानंतर विडसईच्या पुलाचा प्रश्न उपस्थित करण्यात आला. अर्ज जाऊनसुद्धा ग्रामपंचायत जर दखल घेत नसेल तर विडसईच्या महिला असे म्हणाल्या की, "आम्ही उपोषण करु."

२ ऑक्टोबर ह्या दिवशी जनरल ग्रामसभा मीटिंग होत असते तर ह्या ग्रामसभेला सर्व महिलांनी जायचं असं मृणालताई म्हणाल्या. मागे ज्या ग्रामसभा झाल्या त्या उपस्थिती नसल्यामुळे तहकूब झाल्या. पण आपण मागचा विचार करायचा नाही कारण उपस्थिती वाढल्याशिवाय आपली ताकद वाढणार नाही, आपले प्रश्न सुटणार नाहीत, शासनाकडून आलेल्या योजना आपल्याला घेता येणार नाहीत. आत्ताच शासनाने बचट गटांना अंगणवाडी येथील खाऊ शिजवण्याबाबत योजना राबविण्यास देण्यात आली आहे. ती योजना बचत गटांनी राबवण्यास घ्यायची आहे. बचत गटांनीसुद्धा योजनेचा लाभ घ्यायचा आहे आणि पुढे पुढे जायचं आहे.

### अंदाजपत्रकाची ग्रामसभा

यानंतर अनंत लहाने निर्मिती संस्थेचे कार्यकर्ते यांनी बोलायला सुरुवात केली. प्रत्येक ग्रामसभा व्हायच्या आधी जी महिला ग्रामसभा असते त्या ग्रामसभेला १००% उपस्थिती महिलांनी दाखवली पाहिजे. कारण गावाच्या विकासासाठी ज्या काही शासन योजना देते त्या आपल्याला समजतात व आपण त्याचा पुरेपूर फायदा घेतला पाहिजे. २ ऑक्टोबरच्या मीटिंगला सर्वांनी उपस्थित रहावं. तसेच नोव्हेंबरची जी ग्रामसभा असते त्या ग्रामसभेला तर आवर्जून सगळ्यांनी उपस्थित रहावे कारण अंदाजपत्रकाबद्दल ही मीटिंग लावली जाते. अंदाजपत्रक म्हणजे काय याची संपूर्ण माहिती लहाने यांनी दिली. ती अशी -

सरकारकडून किती पैसे आले? दिवाबत्ती कर, वाळूकर, पाणीकर या कराचे किती पैसे जमा झाले हे विचारण्यांचा ग्रामसभेत प्रत्येक पुरुषाला व प्रत्येक महिलेला अधिकार आहे. महिलांसाठी ग्रामनिधीतून १० % रक्कम बाजूला केली आहे. तसेच आदिवासींसाठी, अनुसूचित जातींसाठी १५% पैसे ठेवलेले असतात त्यांचे सर्व प्रोसिडिंग आपण स्वत: लिहून ठेवले पाहिजे किंवा लक्षात ठेवलं पाहिजे. कारण याविषयी शासनाशी आपण न घाबरता बोलू शकतो.

ग्रामस्थ ज्यावेळी ग्रामसभेला हजर होतात त्यावेळी आपला प्रश्न आपण मांडतो म्हणजेच त्या महिलांना घरदुरुस्तीसाठी बोलायचं असेल, अर्ज करायचा असेल, तिचं कर्ज मंजूर करुन घ्यायला पाहिजे. जे अत्यंत गरीब असतील त्यांचं नाव दारिद्र्यरेषेखाली नसेल तर त्या महिलेने व इतर लोकांनीसुद्धा त्याविषयी धडपडलं पाहिजे. गेल्या वर्षीची किती शिल्लक ग्रामपंचायतीमध्ये आहे त्याबद्दल आपण ग्रामसेवकाला विचारून घेतलं पाहिजे. महिलांना ३३ टक्के आरक्षण दिले आहे. आपल्या राज्यांचा कारभार कशा प्रकारे चालतो याबद्दल थोडी माहिती लहान्यांनी दिली.

प्रथम दिल्लीकडून कारभार मुंबईला येतो, मुंबईहून अलिबाग त्यानंतर पंचायतीकडे येतो. त्यानंतर सरकारी योजनांबद्दल थोडीशी माहिती दिली. आता महिलासुद्धा पोलिस व विमानचालक झाल्या आहेत. सर्व जाती धर्मातील लोकांना शिक्षण मिळालं पाहिजे.

### कोणते प्रश्न विचारता?

त्यानंतर आपण ग्रामसभेला हजर राहिल्यानंतर ग्रामसेवकाला कोणते प्रश्न विचारायचे याबद्दल माहिती दिली. सरपंचाचे मानधन किती आहे? शिपायाचा पगार किती आहे?








लाईट बिल किती आहे? विहीर दुरुस्तीसाठी किती रुपये खर्च केले? शिक्षणासाठी किती रुपये खर्च केले? आरोग्यासाठी किती? टी.सी.एल. पावडर पाण्यात टाकली? महिलांसाठी १० टक्के रक्कम कशी खर्च केली? १५ ऑगस्ट व २६ जानेवारी हे भारताचे स्वातंत्र्य दिन व प्रजासत्ताक दिन साजरे केले जातात. त्यावेळी गोळ्या वाटल्या जातात. त्यांचा खर्च ग्रामपंचायत किती लावणार आहे? अशा प्रकारचे प्रश्न विचारण्याचा प्रत्येक गावातील नागरिकाला अधिकार आहे, असे लहाने म्हणाले. यानंतर विजय म्हात्रे यांनी दोन शब्द बोलायला सुरुवात केली. ते म्हणाले, ग्रामीण विकास म्हणजे समाज परिवर्तन. त्यानंतर त्यांनी माहितीचा अधिकार याविषयी माहिती दिली. माहिती मिळविण्याचा नमुना अर्ज भरुन आपली सही करुन द्यावी आणि कुणाकडून आपल्याला कुठली माहिती पाहिजे ते लिहावे म्हणजे उदा. (ग्रामसेवक, तलाठी, शिक्षक, सरपंच) त्यांच्याकडून जर आपल्याला माहिती हवी असेल तर माहितीचा अधिकार म्हणून नागरिकाला ही माहिती पुरवणे त्यांचे कर्तव्य आहे.

अण्णा हजारे हे एक समाजसेवक आहेत. त्यांचे तत्त्व लक्षात घेऊन त्यांच्याप्रमाणे आपण वागले पाहिजे असे विजय म्हात्रे म्हणाले. याव्यतिरिक्त कितीतरी अवांतर गोष्टींबद्दल म्हात्रे यांनी माहिती दिली. रायगड जिल्ह्यातील एस.ई.झेड. विशेष आर्थिक क्षेत्राच्या प्रश्नाची त्यांनी माहिती दिली.

स्वयंसहायता गट, पंचायत राज संस्था, ग्रामपंचायती व ग्रामसभा या सर्वांची एकजूट झाल्यास गावाची प्रगती होण्यास वेळ लागणार नाही. म्हणून गावातील महिलांनी प पुरुषांनी याचा विचार करुन आपला गाव स्वयंपूर्ण करण्यासाठी झटले पाहिजे.

पहिल्या दोन मीटिंगला महिलांची जास्त उपस्थिती नव्हती. पण ह्या मीटिंगला श्रीयोग बचत गटाने गावोगावी जाऊन महिला गोळा केल्या. महिलांच्या मोठ्या उपस्थितीमुळे मीटिंग अगदी सुशोभित दिसून आली. निर्मिती संस्थेने महिला गटाचे विशेष आभार मानले.



## आंध्रातील आदिवासी महिला आता सरकारला 'वीज' विकणार!

बचत गटांसारख्या आर्थिक उत्पन्नाच्या विवध उपक्रमांतील सहभागामुळे आंध्रातील आदिवासी महिला आता आपल्या कुटुंबाच्या जगण्याला नवी उभारी देत आहेत. राज्याच्या पूर्वेकडील डोंगराळ भागात राहणाऱ्या अशाच आदिवासी महिलांनी नुकताच राज्य सरकारच्या वीज कंपनीशी चक्क वीज वितरणाचा करार केला. डोंगराच्या घाटमाथ्यावरुन अविरत कोसळणाऱ्या धबधब्यापासून जलविद्युत निर्मितीचे प्रकल्प या महिलांनी हाती घेतले आहेत.

"आंध्र प्रदेश आदिवासी ऊर्जा" कंपनीच्या सहकार्याने या महिलांनी आपल्या भागात जलविद्युत निर्मिती सुरु केली असून, तेथे तयार होणारी वीज राज्य सरकारच्या वीज वितरण कंपनीला अडीच रुपये प्रतियुनिट या दराने विकणार आहेत.

पूर्वेकडील भाग, विशेषत: पूर्व गोदावरी जिल्ह्याचा मोठा भाग जंगल आणि डोंगरांनी व्यापलेला आहे. या डोंगरावरुन अखंड कोसळणाऱ्या धबधब्यांच्या पाण्यापासून या आदिवासी महिला वीज उत्पादित करणार आहेत. तंत्रज्ञान नवे असले, तरी या धबधब्याचे पाणी कधी आटणार नाही, त्यामुळे हे प्रकल्प आम्ही निश्चितच यशस्वी करू, असा विश्वास करारावर स्वाक्षरी करणाऱ्या आणि या वीजनिर्मिती प्रकल्पाच्या संचालिका असलेल्या मामिडी वरलक्ष्मी यांनी व्यक्त केला. सरकारला वीज विकत देत असलो, तरी आपल्या भागातील मंदिरे, समाजमंदिरे आणि रस्त्यांवरील दिव्यांसाठी मात्र ती विनामूल्य देण्यात येईल, हेही त्यांनी स्पष्ट केले.

आंध्र प्रदेश आदिवासी ऊर्जा कंपनीने पहिल्या टप्प्यात अशा तीन प्रकल्पांना चालना दिली आहे. त्यासाठी सहा कोटी रुपये खर्च करण्यात येत असून, या प्रकल्पांतून दरवर्षी दीड कोटी रुपयांचे उत्पन्न अपेक्षित आहे. आदिवासी महिलांचा सहभाग आणि जागतिक बँकेच्या सहाय्यातून अशा आणखी ७९ ठिकाणी जलविद्युत निर्मितीचे प्रकल्प उभारुन १४३ मेगावॅट वीज तयार करण्याचे उद्दिष्ट असल्याचे आदिवासी ऊर्जा कंपनीचे व्यवस्थापकीय संचालक आर. रामकृष्णय्या यांनी सांगितले.







अनुक्रमणिका

# लीझ माईट्नर : लेखिका - वीणा गवाणकर
## केवळ स्त्री म्हणून उपेक्षित 'नोबेल' योग्यतेची संशोधिका

'अणुशक्ती' हा जगभरातील कायम विवादाचा प्रश्न आहे. अणुशक्ती म्हणजे वॉशिंग्टनची कुऱ्हाड. जसा उपयोग (किंवा दुरुपयोग) कराल तसा परिणाम. सद्यकाळातही इराकवरचा हल्ला हा (तथाकथित) अणूच्या संदर्भातच अमेरिकेने केला. हिरोशिमा-नागासाकीवर बॉंब टाकून जपानला उद्ध्वस्त करणारा अणू. मात्र हाच अणू अमेरिकेला विजयी करणारा ठरला. थोडक्यात 'अणू तारी किंवा अणू मारी' असे हे अणुशास्त्राचे स्वरूप आहे म्हणूनच 'लीझ माइट्नर' या अणुशास्त्रज्ञ स्त्रीची चरित्रकहाणी वाचलीच पाहिजे अशी आहे. ज्या काळात ऑस्ट्रियात मुलींना वयाच्या फक्त चौदाव्या वर्षापर्यंतच शिक्षण घेता येत असे, त्या काळात व्हिएन्ना येथे जन्मलेली लीझ अणुशास्त्रज्ञ म्हणून गौरविली गेली. तिच्या निधनानंतर कित्येक वर्षांनी जर्मनीने तिला तिच्या संशोधनाचे श्रेय दिले आणि १९९२ मध्ये एका मूलद्रव्याला तिचे नाव दिले. मात्र तिचा शिक्षण-संशोधन-जीवन हा सर्व प्रवास अतिशय संघर्षमय झाला आणि अशा कर्तृत्ववान व्यक्तीची शोकांतिका म्हणजे हयात असताना तिचा जीवनगौरव झालाच नाही. फक्त उपेक्षाच वाट्याला आली. लीझ माइटनर ही स्त्री शास्त्रज्ञ असल्याने इतर अनेक शास्त्रज्ञांनी तिला महत्त्व देण्याचे नाकारले आणि तिला पराभूत करण्याचे मार्गही धरले. शास्त्रज्ञ हीदेखील षडरिपू असणारी व्यक्ती असते, हे गृहीत ठरण्याइतके अनुभव लीझला आले तेही केवळ ती स्त्री-अणुशास्त्रज्ञ होती म्हणून. ऑटो हान या तिच्या सहकारी शास्त्रज्ञाला सतत बढती मिळत असे. पण लीझला कधी बढती किंवा पगारवाढ मिळत नसे. तब्बल पंधरा वेळा लीझचे नाव नोबेलसाठी मानांकित केले गेले. 'हान'ला नोबेल मिळाले. पण लीझला प्रत्यक्षात नोबेल कधीच मिळाले नाही. तिला पुरस्कारांची आस नव्हती; परंतु आपल्या मूलभूत संशोधनाचे श्रेयही (न्यूट्रान्सच्या माऱ्याने युरेनियमच्या अणूचे विभाजन होण्याची प्रक्रिया) पुरतेपणी मिळाले नाही (हानने हे श्रेय देण्याचे नाकारले.) याची खंत तिला जरूर होती. लीझ माइटनरची संघर्षकहाणी सुरु झाली तिच्या वयाच्या अवघ्या चौदाव्या वर्षी. ऑस्ट्रियाच्या नियमानुसार चौदाव्या वर्षी तिचे शिक्षण थांबले आणि नोकरी सुरु झाली.

पुढे ऑस्ट्रियात मुलींना उच्च शिक्षणाचे दार उघडले गेले, तेव्हा तिने उच्च शिक्षण घेण्यास सुरुवात केली. मूळची संकोची स्वाभावाची लीझ एक्सनर आणि लुडविग बोस्टझमन या दोन प्राध्यापकांच्या उत्तेजनाने भौतिक-शास्त्राच्या संशोधनात (फिजिक्स) रुळली, रमली; परंतु व्हिएन्नात यापेक्षा अधिक संशोधनास वाव नाही, हे लक्षात आल्यावर ती बर्लिनला गेली. तिथे ऑटो हान हा रसायन-शास्त्रज्ञ तिचा स्नेही आणि सहकारी झाला. हानचे रसायन-शास्त्र आणि लीझचे भौतिकशास्त्र हे अणुशास्त्राच्या अभ्यास आणि ज्ञानासाठी परस्परपूरक होते. पहिल्या महायुद्धात हान महायुद्धकालीन सेवेसाठी संशोधनापासून दूर झाला; परंतु लीझ मूळच्या संशोधनात व्यस्त होती. पुढे हानने लीझला संशोधन-श्रेय देणे नाकारले तेव्हा स्नेह संपला आणि कटुता आली. जर्मनीला अणुबॉंब बनवण्याचे तंत्र अवगत होते; परंतु नैतिकतेसाठी बॉंब बनवला नाही असा अपयशाला दिलेला फसवा मुखवटा लीझला मानवत नव्हता. शेवटी बर्लिनमधून निघून जाण्याची वेळ लीझवर आली. स्वीडनमध्ये गेल्यावर 'सीगबान'च्या प्रयोगशाळेत संशोधनाचे परिपूर्ण समाधान तिला कधीच मिळाले नाही. आपला भाचा ऑटो फ्रिश याच्याबरोबर अणू विभाजनाचा लावलेला महत्त्वपूर्ण शोध जर्मनीने (आणि हानने) कधीच प्रमाण मानला नाही. पण जगाने विशेषत: अमेरिकेने या शोधाचे महत्त्व जाणले होते. लीझने मात्र अणुबॉंब या (संहारक) प्रकल्पावर काम करण्यास नकार दिला. 'एमजीएम' कंपनीने तिच्या जीवनावर चित्रपट काढण्यास मोठी रक्कम देऊ केली, परंतु तिला पैसा आणि अशी 'ग्लॅमर पब्लिसिटी' अजिबात अपेक्षित नव्हती. आयुष्याच्या प्रत्येक टप्प्यात तिचा संघर्ष होता; परंतु संघर्षाने संशोधनशक्ती अधिकच शक्तिशाली होत गेली. जगाच्या स्त्री-

अनुक्रमणिका

इतिहासाकडे वळून पाहिलं तर स्त्री-शास्त्रज्ञांची संख्या तुलनेने कमी आहे. जागतिक वर्तमानकाळ शास्त्रीय संशोधनाला अनुकूल आहे. परंतु स्त्री-शास्त्रज्ञांना पुढे येऊ न देणारा भूतकाळ तपासला तर लीझ माइटनरचे अणुशास्त्रासारख्या पुरुषी मक्तेदारीला आव्हान देणारे संशोधन महत्त्वाचे ठरते. अणुसंशोधन महत्त्वाचे आणि संघर्षमय जीवन जगलेली संशोधिकाही... ओघवत्या शैलीत आणि वाचकांच्या हृदयाला स्पर्श करणाऱ्या अनुभवातून साकारलेली ही चरितकहाणी वाचल्यास 'बहुश्रुत'तेला एक नवा आयाम नक्कीच लाभेल.

लीझ माईट्नर (राजहंस प्रकाशन २००६)
चरित्रग्रंथ अभिप्राय : डॉ० सुवर्णा दिवेकर
'चतुरा' जानेवारी २००७ च्या सौजन्याने.



## Should HIV testing be mandatory before marriage?

### No
**Jhanavi Goswami**

Any kind of mandatory testing is wrong. It is a violation of human rights. It's almost similar to forced testing, and is discriminatory in nature. How can the government even think of making HIV testing mandatory before marriage? Do we have the required infrastructure? In a country where it's villages and small towns don't even have decent hospitals and laboratories, how does the government expect the people to get themselves tested for HIV? even the expenditure involved, Rs. 5,000, for testing, is very high. How can young couples , especially poor people, afford it?



### Yes
**Dayanand Narvekar**

Mandatory testing of couples planning to tie the knot is the only way we can stall the menace of HIV from spreading in India. Every day, we get new cases of women who test HIV - Positive just months after their wedding, thanks to an HIV - positive husband who passes on the disease to the hapless wife. Nearly 40% of HIV - positive people in India are women. What is their fault? Even today, arranges marriage is most common in the country.

A women is seldom asked about her opinion. It's only after marriage, when she is infected and the damage is done that she finds out about her husband's illness.

The predominance of arranged marriage means that most wives and husbands come together as virtual strangers. As such, there is no communication between them and hence, the woman can never know if her husband is infected. So, mandatory testing of couples for HIV will be the only way to stop such rising incidences. Therefore we decided to make a HIV test mandatory for registration of marriages.

(Times of India, Pune, 26-03-2006)








# सहजीवन : विवाहाशिवाय की...

## भा० ल० महाबळ

विवाहाशिवाय सहजीवन योग्य की अयोग्य याबाबतचे माझे स्पष्ट मत असे आहे की विवाहानंतरचे सहजीवन योग्य; विवाहाशिवाय ते, पूर्णपणे अयोग्य होय कारण विवाहामागील मूळच्या संकल्पना मला आजही शिरोधार्य वाटतात.

विवाहानंतर दोघांनी घर उभारावे, त्या दोघांच्या घराची ती मालकीण असेल, घर दोघांचे असले तरी त्या घरात इतर सर्वांचे प्रेमाने वास्तव्य असावे व घरात मुलं-नातवंडं खेळावीत. वंशवृद्धी हा विवाहाचा हेतू आहे. समाजप्रवाह कुंठित होता कामा नये, तो वाहता राहिला पाहिजे. विवाहानंतरच्या दोघांच्या घरात आईवडील, भाऊबहीण, पुतणेभाचे यांना त्यांच्या गरजेनुसार प्रेमाचा निवारा मिळायला हवा. उपऱ्या वृद्धाश्रमांची व बाजारी जीवनविम्याची क्वचित गरज भासावी!

विवाहाशिवायच्या सहजीवनात वरील संकल्पना कायम राहणार असतील तर सहजीवनाला माझा विरोध नाही. विवाहाच्या आजच्या रूढ पद्धतीत काही अपप्रवृत्ती शिरल्या आहेत. उदा. गृहपत्नीकडून दोन्हीकडच्या लग्नखर्चाची व हुंड्याची मागणी करणं. ज्या मुलीला घराची रक्षणकर्ती म्हणावयाचे तिच्या स्वागतसमारंभाचा खर्च वरपक्षाने करायला हवा, वधूपक्षाने एक पैसाही खर्च करता कामा नये! सहजीवन हे साधले जाणार असेल तर 'विवाह' हा शब्द गाळून 'सहजीवन' हा नवा शब्द व प्रकार स्वीकारायला, माझा पाठिंबा आहे.

मात्र सहजीवन म्हणजे दोघांनी केवळ शरीर-संबंधासाठी एकत्र राहणे असेल तर ते मला स्वार्थमूलक वाटते. म्हणून अयोग्य वाटते. विवाहामागच्या मूळ संकल्पनांशी फारकत घेऊन, करार करून एकत्र राहणे म्हणजे सहजीवन असेल तर या सहजीवनात व पशुपक्ष्यांच्या एकत्र येण्यात काय फरक आहे? विवाहसंस्थेचा जन्म हे संस्कृतीने एक पाऊल पुढे टाकल्याचे द्योतक होते; विवाहाशिवाय एकत्र राहणे म्हणजे पुन्हा मागे जाणे होय!

आजच्या विवाहपद्धतीतील आणखी एक महादोष मला डाचतो. आजचा विवाह हा स्त्रीच्या दृष्टिकोनातून पाहता मला मोठा जुगार दिसतो. माहेर सोडून स्त्री सासरी येते. तिने आपले आईवडील, भाऊबहीण सारे मागे टाकले असतात. सासरी तिला चांगली वागणूक मिळाली, सासरची माणसे सुसंस्कृत असली, तिच्या शिक्षणाला, गुणांना वाव देणारी असली, सासरी तिचे स्वातंत्र्य अबाधित राहिले तर तिला दान अनुकूल पडले व तिने जुगार जिंकला! मात्र नवरा व्यसनी, कर्तव्यशून्य असला, सासरची माणसे तिची शारीरिक व आर्थिक पिळवणूक करणारी आणि तिने माहेराहून पैसे आणावेत यासाठी तिला छळणारी असतील तर स्त्री, तिचा काहीही दोष नसताना, लग्नाचा जुगार हरते. लग्नानंतरच्या काही वर्षांत दोघांनी मिळून संसार जोडलेला असतो, निवारा निर्माण केला असतो, नवरा व त्याचे आप्त, स्त्रीवर पळून जावे, अशी परिस्थिती लादतात. बाहेर पडावे लागलेल्या स्त्रीला तिच्यासाठी व मुलांसाठी नव्याने आसरा शोधावा लागतो, जगण्यासाठी नव्याने जुळवाजुळव करावी लागते.

परस्परांचे बालमित्र असलेले, दोघे-तिघे एकत्र येऊन व्यवसाय चालू करतात त्यावेळी तेही समजा उद्या आपले पटले नाही व धंद्यातून वेगळे व्हावे लागले तर असा व्यावहारिक व योग्य विचार मनात धरतात व कायदेशीर करार करतात. स्त्री विवाह करते तेव्हा अत्यंत विश्वासाने 'अनोळखी' पुरुषाबरोबर जन्माचे नाते जोडते; तेसुद्धा कोणत्याही कराराशिवाय किंवा नवऱ्याला सोयीस्कर असलेल्या विवाहाच्या एकतर्फी करारात स्वतःला गुंतवून घेऊन! विवाह हा स्त्रीच्या दृष्टीने प्रचंड जोखमीचा व्यवहार आहे. मी स्त्री असतो तर कायदेशीर करार करूनच लग्न केले असते, नहून लग्नाविना राहिलो असतो!

विवाहाची मूळ, मंगल व न्याय्य संकल्पना मागे पडून विवाहाला व्यवहाराचे स्वरूप आले आहे. हा व्यवहार कधीकधी, प्रामुख्याने स्त्रीला, आतबट्ट्याचा व क्लेशाचा ठरतो. म्हणून विवाहाचे मूळ हेतू शाबूत ठेवून आणि वरती विवाहाचा जुगार फसला तर स्त्रीच्या राहण्याच्या जागेचा व हितसंबंधांचा रक्षण करणारा करार करून, दोघे विवाहाशिवाय एकत्र राहणार असतील तर अशा सहजीवनाचा, विवाहाच्या पुढची पायरी समजून मी पाठपुरावा करीन.

(मिळून साऱ्याजणी, डिसेंबर २००६ च्या सौजन्याने.)

▣ ▣ ▣

अनुक्रमणिका

# जीर्णोद्धार

# प्रपंचरहस्य : लेखक - विनायक कोंडदेव ओक

श्री० मा० भावे

१

'प्रपंचरहस्या'ची माझ्या हाती असलेली प्रत दुसऱ्या आवृत्तीतली आहे. ही आवृत्ती १९०२ साली निघाली. पहिली आवृत्ती केव्हा प्रसिद्ध झाली ते कळत नाही. दात्यांच्या सूचीतही दुसऱ्या आवृत्तीचाच उल्लेख आहे. सूचिकार दात्यांचा असा दंडक होता की पुस्तक पाहिल्याखेरीज त्याची नोंद सूचीत करावयाची नाही. म्हणजे दात्यांनाही या पुस्तकाची पहिल्या आवृत्तीतील प्रत मिळाली नव्हती. १९०२ साली म्हणजे १०५ वर्षांपूर्वी पुस्तकाची दुसरी आवृत्ती निघाली. त्याअर्थी हे पुस्तक चांगल्यापैकी लोकप्रिय झालेले होते आणि लोकांना आवडावे असेच ते आहे. सोज्वळ, सात्त्विक व प्रसादपूर्ण.

विनायक कोंडदेव ओक (१८४०-१९१५) हे एकोणिसाव्या शतकातील फार प्रसिद्ध ग्रंथकार. त्यांनी लहानमोठी मिळून ४८ पुस्तके लिहिली. चरित्रे लिहिण्यात त्यांचा हातखंडा होता. त्यांच्या काळातील मोठ्या माणसांची म्हणजे इंग्लंडचा पंतप्रधान ग्लॅडस्टन, अमेरिकेचा राष्ट्राध्यक्ष अब्राहम लिंकन, ग्वाल्हेरचे दिवाण दिनकरराव राजवाडे यांची चरित्रे त्यांनी लिहिली. शिरस्तेदार नावाची छोटी पण चटकदार कादंबरी त्यांच्या नावावर आहे. इतिहासाचार्य राजवाडे यांचा 'कादंबरी' हा विख्यात निबंध १९०६ सालचा आहे. त्या निबंधात त्यांनी 'शिरस्तेदार'ची तुलना हरिभाऊ आपट्यांच्या कादंबऱ्यांशी करून 'शिरस्तेदार ही कित्येक बाबतीत सरस असल्याचे' म्हटले आहे. 'ह्या ग्रंथाची सांगोपांग उठावणी झाली असती, तर हिंदुस्थानातील पाच रुपयांपासून पाच हजारापर्यंतच्या कारकुनी पेशाचे हुबेहुब चित्र निघाले असते,' असा राजवाड्यांचा अभिप्राय आहे.

ओक हे फार गरीब घरात जन्मले. थोडेसे मराठी व इंग्रजी तीन इयत्ता एवढेच शिक्षण झाले होते. त्यांनी द.म. ८ रुपये पगारावर शिक्षकाची नोकरी धरली व ते चढत-चढत द.म. १०० रुपये पगाराच्या दिपोटीच्या हुद्द्यापर्यंत पोचले. त्यांची सर्वात मोठी कामगिरी म्हणजे लहान मुलांसाठी त्यांनी 'बाळबोध' मासिक १८८१ साली सुरू केले व मरेपर्यंत म्हणजे ३४ वर्षे चालविले! मुलांवर उत्तम संस्कार व्हावेत यासाठी दर अंकात ते एखादे चरित्र देत असत. त्यांनी एकट्याने एकशेबारा चरित्रे या मासिकात लिहिली.

'प्रपंचरहस्य म्हणजे प्रपंचासंबंधी काही निवडक विचार' या पुस्तकाची दुसरी आवृत्ती मुंबईच्या निर्णयसागर छापखान्याने १९०२ साली काढली. पुस्तकाची पाने २१२ असून किंमत १ रुपया आहे. हे पुस्तक 'डॉक्टर सर भालचंद्र कृष्ण भाटवडेकर यांस नम्र सेवक ग्रंथकर्ता ह्याने अत्यंत पूज्यबुद्धिपूर्वक अर्पण केले आहे.'

ओकांच्या प्रांजळ व रसाळ भाषेची झलक अगदी प्रस्तावनेपासून दिसते. 'पृथ्वीच्या पाठीवर अगदी नवे असे काही नाही. सगळे जुने आहे. त्यातल्यात्यात इकडचे तिकडे आणि तिकडचे इकडे असे ठेवून, आपल्या जिवास करमणूक करून घ्यावी, एवढेच काय ते माणसाच्या हाती आहे. प्रपंचातल्या महत्संकटातले एक संकट आले होते, त्यात वेळ कंठण्याकरिता जे काय लिहिले, त्याचे हे लहानसे फळ आहे.'

२

आपल्या विचारात प्रपंच व परमार्थ यांचे द्वंद्व कायमचेच मानले आहे. परमार्थ साधायचा असेल तर प्रपंच सोडला पाहिजे असे निरनिराळ्या धर्मपीठाधीश शंकराचार्यांनी वेळोवेळी सांगितले आहे. आदिशंकराचार्यांनी एका ओळीत मनुष्यजन्माची इतिकर्तव्यता सांगितली आहे की, 'आत्मेच्छा व्यवसयितां निजगृहातूर्णं विनिर्गम्यताम्।।' म्हणजे आत्मा समजून घेण्यासाठी प्रयत्न करा आणि ताबडतोब घरातून बाहेर पडा. मराठी संतांच्या वाङ्मयातूनही असे उतारे काढून देणे सहज शक्य आहे, की ज्यात संसाराची व त्यातून मिळणाऱ्या सुखाची निर्घृण अवहेलना केलेली आहे. हे सुख क्षणभंगुर आहे, मनुष्याला गुंतवून ठेवणारे आहे, परिणामी अहितकर आहे, जन्म-मृत्यु-जरा-व्याधी यांनी इहलोक नासून टाकला आहे. या सर्वातून बाहेर पडायचे असेल तर एकमेव उपाय म्हणजे या संसाराची लालसा सोडावी. आणि परमार्थमार्गाला

अनुक्रमणिका








लागावे. हा परमार्थ कसा? त्याचेही उत्तर शंकराचार्यांनी एका श्लोकात दिले आहे. विषय, राग, लोभादि षडरिपू यांच्यावर विजय मिळवा. योगाच्या राज्याचे स्वामी व्हा. अमृतपद कसे मिळवावे याचे ज्ञान प्राप्त करून घ्या आणि ब्रह्मविद्यारूपिणी स्त्रीच्या सहवासाचे सुख लुटा. हे ज्यांचे आचरण असते ते धन्य होत.

विनायक कोंडदेव ओक हे पारंपरिक ब्राह्मण कुटुंबात जन्मले व वाढले. त्यांच्यावर प्रापंचिक सुखाची चंचलता व परमार्थाची नित्यता लहानपणापासून बिंबविण्यात आलीच असेल. या विचारांचा पगडा दूर सारून प्रपंच हाच परमार्थ आहे असे घोषित करण्याची धिटाई अंगी येण्यास त्यांना स्वतःशीच केवढा झगडा करावा लागला असेल? ओक सांगतात, 'प्रपंचात जसा परोपकार करावयास सापडतो, तसा परोपकार दुसऱ्या कोणत्याही स्थितीत करावयास सापडत नाही, म्हणून आम्ही असे म्हणतो की, प्रपंच हाच परमार्थ आहे.'

यावर कोणी म्हणेल की, परोपकाराकरताच प्रपंच करावयाचा असेल तर त्यात नवीन काय सांगितले आहे? हा देखील एक निवृत्तिवादच नव्हे काय? पण ओक पुढे सांगतात की आपण खेरीज करून बाकी सगळे पर आहेत असे मानिले म्हणजे प्रपंचात राहून मनुष्य जे काही दुसऱ्याचे बरे करितो, त्या सगळ्याची गणना परोपकारात केली पाहिजे. सावकार आपल्या मुलांस संपत्ती मिळवून ठेवतात. राजे आपल्या मुलांस राज्ये मिळवून ठेवतात. मातापितरे आपल्या मुलांस विद्या शिकवितात, हे सगळे परोपकार आहेत. पुढे ओकांनी म्हटले आहे की, परोपकार होण्यासाठी ज्याने उपकार करायचा त्याच्या ठिकाणी सामर्थ्य हवे व जो उपकार घेणार त्याच्या ठिकाणी पात्रता हवी. असा सामर्थ्याचा व पात्राचा योग जसा प्रपंची माणसास साधतो तसा, वैराग्यशीलास साधत नाही. जो वैराग्यशील असतो, त्याला दुसऱ्याच्या गरजा भागविण्याचे सामर्थ्य नसते. त्यापाशी याचना करावायास येतो कोण? आणि येऊन उपयोग तरी काय? पण प्रपंची माणूस घ्या. त्याला थोडाबहुत परोपकार करायचे सामर्थ्य असते आणि परोपकार करण्याचे प्रसंगही त्याला पहिजे तितके येतात. आजपर्यंत जगात जे काय परोपकार आले आहेत, त्या सर्वांची बेरीज करून वाटणी केली, तर आम्हाला असे वाटते की, वैराग्यशीलांपेक्षा प्रपंची माणसाच्या हातून परोपकार पुष्कळपट अधिक झाले आहेत.

या विचारांचा विस्तार करताना विनायक कोंडदेव लिहितात 'पाच-चार मुलांचे बाप व्हावे, एकदोन भावांचे भाऊ व्हावे, कोणाचे मामा व्हावे, कोणाचे यजमान व्हावे, कोणाचे आश्रयदाते व्हावे, आणि अशाप्रकारे अनेक माणसांच्या उपयोगी अनेक प्रकारे पडावे हे पुण्य सामान्य नाही. हे पुण्य वैराग्यशीलांच्या वाट्यास कधी येत नाही. साधूंचा सत्कार करणे, अनाथांस आश्रय देणे, पुण्यवान् पुरुषांची दर्शने घेणे. स्वस्थ चित्ताने परमेश्वरध्यान करणे ही जर पुण्यस्थाने आहेत, तर ही प्रपंचामध्ये वैराग्यापेक्षा अधिक साधत असतात. नाही कोण म्हणेल? बरे, जर असे खरे आहे, तर प्रपंच हाच परमार्थ नाही काय?'

३

प्रपंच हाच परमार्थ आहे, असे सांगून विनायक कोंडदेव यांनी कितीतरी महत्त्वाच्या गोष्टी साधल्या आहेत. एक म्हणजे, पारंपरिक विचारातील प्रपंच आणि परमार्थ यांच्यातील द्वैत त्यांनी मोडून टाकले. दुसरे, प्रपंच व परमार्थ यांच्या द्वंद्वात प्रपंच हा नेहमीच हिणकस मानला गेला होता. तुम्ही भले कितीही नीतीने संसार करा, विरागी मनुष्यापेक्षा तुमचे, गृहस्थाचे स्थान नेहमीच खालती राहणार, असा सर्व उपदेशांचा रोख होता. तिसरे, संसार कायमच दुःखमय नसला व त्यात 'जवापाडे' का होईना सुख पाहायला मिळत असले, तरी ते सुख तुम्हाला संसारात गुंतवून ठेवायला कारणीभूत असते व अनित्यच राहते. म्हणून ते सुखही अंततः विषवत् आहे असे मानले जात होते. त्यामुळे व्यवहारात कसे वागावे, समाधान कोठून मिळवावे, मनुष्यांची अंतःकरणे कशी ओढून घ्यावी याची शिकवण देण्याचे काहीच कारण नव्हते. आता संसार हाच परमेश्वर झाल्याने, ही द्वैते मिटली, द्वंद्वाचा शेवट झाला, प्रपंचातील सुख हेही महत्त्वाचे ठरले व प्राक्तन ठरले. त्यामुळे प्रपंचाचे रहस्य समजावून घेतले पाहिजे व संसाराला रंगत कशी आणावी याची शिकवण दिली पाहिजे. याला आधार मिळाला.

संसाराचा मूलाधार म्हणजे पत्नी. आमच्या परंपरेने पत्नीचे हे महात्म्य कायमच मान्य केले होते. ओकांनी महाभारतातला श्लोक उद्धृत केला आहे :

अर्धं भार्या मनुष्यस्य भार्या श्रेष्ठतमः सखा
भार्या मूलं त्रिवर्गस्य भार्या मूलं तरिष्यतः।

पत्नी ही मनुष्याचे अर्धांग आहे. ती सर्वात श्रेष्ठ

अशी जिवलग आहे. पत्नी ही धर्म, अर्थ व काम या पुरुषार्थांचा आधार आहे. जो संसारात पोहत आहे त्याला स्त्री हा आसरा आहे.

पतीपत्नी यांच्या तुलनेत पत्नीचा मोठेपणा सांगताना ओक म्हणतात, 'आणखी प्रपंच हे मोठे राज्य आहे. ह्या प्रपंचराज्याचे प्रांत दोन; घर आणि बाजार. ह्यातल्या घर ह्या प्रांतावर स्वामित्व पत्नीचे असते; आणि त्या प्रांतापेक्षा कोट्यवधीपट मोठा प्रांत बाजार आहे, त्यात प्रवेश पुरुषाचा असतो; सत्व आणि स्वामित्व नसते. आणि ह्या मोठ्या प्रांतात नाना प्रकारचे परिश्रम करून, लोकांची मने धरून, प्रसंगी मानहानी सोसून जे काय मिळवायचे, त्याचा उपभोग घेण्याचे खरे आणि पवित्र स्थान म्हणजे घर आहे. तेव्हा घरप्रांताची योग्यता केवढी आहे, ती पहावी... आणखी घर म्हणजे नुसती इमारत नव्हे तर, सुशील पतिव्रतेचा अधिकार उत्तमप्रकारे चालत आहे, असे जे निवासस्थान, ते खरे घर होय.'

अशा या गृहिणीला शाळा-शिक्षण द्यावे असा अनेक सुधारक धुरीणांचा मनसुबा होता. त्याविषयी ओक म्हणतात, 'लेखन, वाचन, गणित, इतिहास, भूगोल, काव्य, वाद्य, गति, इत्यादी विषय प्रपंचामध्ये पुष्कळ उपयोगी पडतात, ही गोष्ट खरी आहे. आणखी आमच्यामध्ये चांगल्या पत्न्या आणि चांगल्या आया तयार होण्यास हे विषय स्त्रियांस यावे, हे आवश्यक आहे.' पण लगेचच ते सांगतात, 'संभावित माहेरी आणि सासरी लहानपणी आमच्या स्त्रियांस, आमच्या रीतीप्रमाणे, गृहशिक्षण मिळते, ते इतके उत्तम असते की, आमच्या सध्याच्या स्थितीमध्ये आमच्या कुटुंबाची व्यवस्था उत्तम राहण्यास व त्यातील माणसांस आनंदाने काळ घालविण्यास बस होते.'

यानंतर विनायक कोंडदेवांनी आपल्या पत्नीचे वर्णन करणारा हृदयंगम उतारा दिला आहे. त्या उताऱ्यावरून हे ओकांच्याच हातचे लिखाण आहे, हे स्पष्ट होते. पण त्यांनी हा उतारा कोणी लिहिला आहे, ते उघड केलेले नाही. 'एका पतीने दिवंगत पत्नीची दिलेली हकीकत' असा मोघम उल्लेख त्यांनी केला आहे. जुन्या कुटुंबातील आदर्श स्त्री कशी होती ह्याचा उत्तम नमुना इथे मिळतो. आम्ही सबंध उतारा न देता काही मजकूर देत आहोत. 'ती जुन्या मतांची बायको होती. शाळेतले शिक्षण न मिळाल्यामुळे आणि बहुतेक सगळे आयुष्य जुन्या मतांच्या बायकांच्या सहवासात गेल्यामुळे, तिला आमच्यातली जुनी मते चांगली वाटत. तरी, समंजसपणाच्या नव्या मतांस ती कधी विरुद्ध नसे. विधवांच्या हातून अनेक पातके घडतात, त्यापेक्षा त्यांचे विवाह झाले तर बरे, असे ती म्हणत असे. आणखी तिचा ग्रह असा होता, की स्त्रियांची चांगली सुधारणा होण्यास उत्तम व खात्रीचा उपाय काय तो एकच आहे. तो उपाय हा की, त्यांस शाळात घालून विद्या शिकवावी. कधी कधी तर आपण काम करीत असावे आणि सुनांस गोष्टी सांगण्यास बसवावे, असे ती करी. असे का करिता असे तिला कोणी म्हटले तर यावर तिचे उत्तर द्यावे की, सुना ह्या दुसऱ्याच्या मुली माझ्या येथे माझ्या दैवाने आल्या आहेत. त्यांना संतुष्ट ठेवणे हे माझे - वडील माणसाचे काम आहे आणि ते भूषण आहे... मी काम करते, ह्यात दोन गोष्टी होतात; त्या सुनांस काम कसे करावे ते कळते. आणि माझ्या हातून काम होऊन त्याने व्यायाम होऊन माझी प्रकृती चांगली राहते.

तिचे आत्मसंयमन फार मोठे होते. खाण्यापिण्यात, वस्त्राप्रावरणात, दागदागिन्यात ती प्राप्ततृप्त असे. दुपारी किंवा सायंकाळी आमची सगळ्यांची, चाकरमाणसांची देखील जेवणे झाल्यावर मग तिने जेवावे. तिचे जेवण दुपारचे बारा वाजल्यावाचून व रात्रीचे अकरा वाजल्यावाचून कधी झाले नाही. आणि ते देखील सगळ्यांना पुरून बाकी राही त्यातले थोडेसे खावयाचे. चोळ्या-लुगडी, दागदागिना, आधी सुनांना झाल्यावर, सवड असल्यास मिळावा अशी तिची इच्छा असे. मुलींनी व सुनांनी भोगावे आणि मी पहावे, हे मला मोठे सुख आहे असे ती म्हणत असे.'

त्यांच्या काळात मिल स्पेन्सर यांची मते महाराष्ट्रात प्रचलित नव्हती. विनायक कोंडदेव हे न्या. रानडे (१८४२-१९०१) यांचे समकालीन होते. त्यातून त्यांनी महाविद्यालयीन शिक्षणही घेतले नव्हते. त्यामुळे स्त्रीस्वातंत्र्य, स्त्रियांचे सबलीकरण इत्यादी ज्या कल्पना मिलच्या ग्रंथावरून पुढे मराठी समाजात प्रसृत झाल्या त्यांच्याशी विनायक कोंडदेवांचा परिचय नव्हता. आणि कदाचित परिचय झाला असता तरी त्यांच्या पचनी त्या कल्पना पडल्या नसत्या. स्त्रियांना जुजबी शालेय शिक्षण मिळावे इथवर त्यांची मजल पोचली होती हे आपण पाहिले. पण स्त्रीने पुरुषांच्या योग्यतेला पोचावे व त्याची सखी म्हणून वावरावे हे त्यांच्या बाळबोध वृत्तीला न मानवणारे होते.

'आज्ञावंदन हे कल्याण आहे' नावाच्या प्रकरणात ओकांनी या प्रश्नाला हात घातला आहे. 'आणखी एका गोष्टीविषयी थोडेसे येथे सांगावेसे वाटते. अलीकडे पंचवीस-



अनुक्रमणिका

चाळीस वर्षात असा एक विषय निघाला आहे की, पुरुष व स्त्रिया यांची योग्यता समान मानावी आणि त्यांच्या अधिकारांमध्ये कोणत्याही प्रकारचे अंतर नसावे. प्रथमदर्शनी असे वाटते की, हे म्हणणे अगदी योग्य आहे. बायकांपेक्षा पुरुषांस श्रेष्ठ मानाचे ह्यास काही कारण वाटत नाही. परंतु आम्ही असे म्हणतो की, हे मानण्यावर नाही. तर पुरुष आणि बायका यांच्या खऱ्या योग्यतेवर आहे.'

उजव्या व डाव्या हातांची तुलना करून डावा हात कमी मानावा हा स्वभाव सर्वत्र आहे; व त्याला कारण त्या हाताचे अधिक उणे कर्तृत्व आहे, असे उदाहरण देऊन विनायक कोंडदेव लिहितात, 'पुरुषांनी कधी एक सभा करून स्त्रियांस आपणापेक्षा कमी मानण्याचा ठराव केला आहे, आणि त्याविषयी शपथा घेतल्या आहेत, असे आढळत नाही. त्याप्रमाणेच आपण पुरुषाधीन राहण्याविषयी स्त्रियांनी स्वसंतोषाने आणा वाहिल्या नाहीत. असे असता जिकडे पहावे तिकडे स्त्रियांस पुरुषांइतकी विद्या शिकवतात त्या देशातही स्त्रिया चांगल्या विद्वान होऊनही त्या पुरुषाधीन राहत आहेत, अथवा पुरुषांस श्रेष्ठ मानीत आहेत, हे कसे? ह्याचे उत्तर एवढेच की, ते ईश्वरनिर्मितच आहे. म्हणजे व्यवहारात पुरुष श्रेष्ठ असावा, स्त्रीने कनिष्ठ असावे अथवा स्त्रिया पुरुषआधीन असाव्यात, अशी ईश्वरी योजना आहे.'

अर्थात, स्त्रिया पुरुषांपेक्षा कमी योग्यतेच्या आहेत, असे म्हणताना ओकांचा रोख असा नाही, की पुरुषांनी स्त्रियांना गुलामाप्रमाणे वागवावे. स्त्री आणि पुरुष यांची कार्यक्षेत्रे वेगवेगळी आहेत व आपापल्या कर्तव्यासाठी दोघे सारख्याच योग्यतेची आहेत. ओकांचे म्हणणे असे दिसते की, गृहकृत्ये करण्यात स्त्री व गृहबाह्य कृत्यात पुरुष ही योग्यतेने सारखीच आहेत. पण एकूण गृहकृत्ये ही बाबच कमी दर्जाची समजली जाते, याला उपाय नाही. समारोप करताना ओक लिहितात, 'आणि स्त्रिया ह्या पुरुषांच्या बरोबरीच्या नाहीत असे स्थापित झाले आहे, ही सगळी लबाडी पुरुषांची आहे, असे जे काही माणसांच्या - काही समजदार माणसांच्या देखील - मनात शिरले आहे, ते त्यांनी सोडून द्यावे. आणखी पुरुषाधीन राहणे, प्रपंचात पुरुषास साह्य करणे हेच आपले भूषण आहे, असे समजून स्त्रियांनी आनंदाने आपली कर्तव्ये करून घर सांभाळावे हे उभयपक्षी हितावह आहे.'

या संबंधात प्रा. जिन्सिवाले यांनी केलेल्या युक्तिवादाची आठवण होते. ते म्हणत असत की गव्हर्नरच्या कौन्सिलमध्ये निर्णय करताना गव्हर्नरला जादा मताचा (कास्टिंग व्होट) अधिकार असतो की नाही? त्याप्रमाणे कुटुंबाविषयी निर्णय घेताना कुटुंबप्रमुखाला जादा मताचा अधिकार असण्यात काहीच गैर नाही. हा कुटुंबप्रमुख बहुधा पुरुष असतो हा भाग अलहिदा.

४

पतीपत्नी ही संसाराची पातळी. दुसरी पातळी म्हणजे मुले. विनायक कोंडदेव अशा काळात जगले की जेव्हा मुले न होणे माणसाच्या हातात नव्हते; आणि झालेली मुले किती जगतील याची शाश्वती नव्हती. खेरीज परंपरा, धर्मकल्पना, रूढी यांचा जो प्रभाव लोकांवर होता, त्याच्या योगाने आपणास पुष्कळ मुले असावीत, ती सन्मार्गी निघून कुळाला भूषण होऊन राहावीत, वृद्धापकाळी आपल्याला त्यांचा आधार मिळावा अशा भावना किंवा अपेक्षा दांपत्याच्या साहजिकच असत. त्याच्या पलीकडे जाऊन ओक सांगतात, 'प्रेम करणे म्हणून जी एक सद्भावना प्राण्यांच्या ठायी असते तिचा उपयोग करण्यास पोटच्या मुलांसारखे उत्तम ठिकाण दुसरे एकही नाही. मुलांवर प्रेम करणे हे एक प्रकारचे मोठेपण आणि भूषण वाटत असते.'

एकोणीसशे साठच्या सुमारास 'पिढीतील अंतर' (जनरेशन गॅप) हा शब्दप्रयोग बोकाळला होता. पण पिढीतील अंतर दर पिढीच्या बाबतीत अनुभवाला येतच असते. ओकांनी या गोष्टीचा उल्लेख अगदी सहजपणे केला आहे. 'मुलांपासून दुःख होण्याचा आणखी एक पर्याय आहे. तो जुनाच आहे. परंतु, तो कालचक्रानुरोधाने, दिवसेंदिवस वाढत चालला आहे. तो हा की, मुलांचे विचार आईबापांच्या विचारांशी मिळेनातसे होतात. तरी, त्या विचारांस नावे ठेवण्यास जागा नसते. म्हणजे, विचार भिन्न म्हणून आवडत नाहीत, आणि आवडत नाहीत तरी वाईट म्हणवत नाहीत अशी आडविहीर होते... अशा स्थितीमध्ये मौनासारखे सुख नाही. त्याप्रमाणे प्रौढ मुले स्वेच्छेप्रमाणे वागू लागली, म्हणजे स्पष्टपणे न झाली तरी गर्भित रीतीने वडिलांची अवज्ञा होत असते. तीही एक मोठी विपत्तीच असते... तीसही मौनच उपाय होय.'

मुले जन्माला आली, त्यांचे शैशव संपले की, प्रश्न येतो त्यांच्या शिक्षणाचा. विनायक कोंडदेवांच्या काळी हा प्रश्न आजच्या इतका बिकट नव्हता. शाळातून प्रवेश मिळवण्या-साठी हल्लीप्रमाणे खटपटी कराव्या लागत नव्हत्या व शाळा

संपल्यावर पुढील अभ्यासक्रमाची निवड करण्यासही फारसा वाव नव्हता. रुळावरून गाडी आखीव पद्धतीने धावते, तसा सगळा मामला सरधोपट होता. पण शिक्षण पुरे झाल्यावर उदरनिर्वाहाच्या साधनाचा, म्हणजे नोकरीचा प्रश्न बिकट होत चालला होता. 'सध्या विद्या विद्या म्हणजे काय ती शब्दज्ञानावर आली आहे. आणखी आमच्या शाळातील विद्यार्थ्यांचा हेतू नोकरी करण्याचा असतो. आणखी सरकारी कामात काय किंवा इतर कामात काय, नौकर पाहिजे आहेत त्याच्या निदान पाचपट तरी लोक नोकऱ्या पत्करण्यास तयार आहेत. आचारी पाच रुपये दरमहावर मिळत नाहीत, पण कारकून पाच रुपयांवर पुष्कळ मिळतात, अशी व्यवस्था प्राप्त झाली आहे, आणि ही अशीच वाढत जाण्याचे चिन्ह दिसत आहे.'

आज आपण पाहतो, नवीन नवीन व्यवसायाभिमुख अभ्यासक्रम तयार होत आहेत व ते पुरे करून तरुणमंडळी नोकरीकडे न फिरकता, आपापल्या व्यवसायातून उपजिविका चालवत आहेत. सुमारे १५-२० वर्षांपूर्वी अशी स्थिती नव्हती. माणसे आपली पदव्या मिळवून कुठे ना कुठे नोकरी धरण्याच्या मागे लागत. आज ही स्थिती आली कारण अर्थव्यवस्था खुली झाली. शंभर वर्षांपूर्वी व्यवसायशिक्षणाची सोय व्हावी अशी सुशिक्षितांकडून जोरदार मागणी होत होती खरी; पण ते शिक्षण घेतलेले तरुण अखेर नोकरीतच शिरत होते. याला कारण इंग्रजी राज्यातील साखळलेली अर्थव्यवस्था हे होते. शिक्षण व अर्थव्यवस्था यांच्यातील हा संबंध पुसटपणे तरी ओकांच्या लक्षात आला होता की नाही हे सांगवत नाही. ते लिहितात, 'आमच्या पुढच्या पिढ्यांस, सगळ्या प्रकारच्या चांगल्या धंद्यांची द्वारे मोकळी करून दिली पाहिजेत. म्हणजे चाकरीच्या द्वारातील गर्दी मोडेल आणि इतर द्वारात आपला प्रवेश होईल. ही गोष्ट, इतरांपेक्षा आमच्या ब्राह्मण जातीत विशेष झाली पाहिजे. का की जी अवस्था आम्ही वर सांगितली आहे, ती त्यांच्यात फार आधी झाली आहे.'

इंग्रजी शिक्षणाची सुरुवात १८४० च्या सुमारास झाली व १८४४ साली इंग्रज सरकारने हुकुम काढला की, जे इंग्रजी शाळातून शिकले आहेत अशा व्यक्तींनाच सरकारी नोकरी मिळू शकेल. इतकेच नव्हे तर सरकारी शाळातून शिष्यवृत्त्या व नादाऱ्या देण्याची उदार सोयीही इंग्रज सरकारने केली होती. मुळातच शिक्षणाचे संस्कार ज्यांच्यावर झाले होते अशी ब्राह्मण, सारस्वत, कायस्थ व काही प्रमाणात सोनार आणि मारवाडी मुलं इंग्रजी शिक्षणाकडे मोठ्या संख्येने वळली. पुढे इंग्रजी अर्थव्यवस्थेच्या रेट्याखाली व्यावसायिक बलुतेदार जातींच्या उत्पन्नात घट येऊ लागली, तेव्हा त्या जातींची मुलेदेखील शिक्षण घेऊन सरकारी नोकरीत जाण्याची आकांक्षा धरू लागली. ओक लिहितात, 'न्हावी, तेली, तांबोळी, कुंभार, कोष्टी, कासार, महार, चांभार इत्यादी सर्व जातींच्या लोकांस आता असे वाटले आहे की आपल्या मुलांनी "ब्राह्मणासारखे लिवणारे" व्हावे. त्याप्रमाणे त्यांचे प्रयत्न चालू आहेत.'

परिस्थिती अशी होती, की सरकारी नोकरीसाठी लोकांची गर्दी होती व नोकऱ्या मात्र नव्हत्या. ओक सुचवितात की, अशा ब्राह्मणांनी नांगराकडे, मागांकडे व हातोड्यांकडे वळले पाहिजे. त्यावेळच्या रानडे, कुंटे, टिळक इत्यादी अनेक विचारवंतांची धारणा अशीच होती. कुंटे (महादेव मोरेश्वर) सांगत असत की 'घिसाडिझम्' वाढला पाहिजे. वस्तुस्थिती अशी होती की, ब्राह्मणांजवळ भांडवल अजिबात नव्हते आणि धंदा काढला तरी तो यशस्वी होण्यासाठी जे सरकारी पाठबळ लागते, ते देण्याची परकीय सरकारची इच्छा नव्हती. बरे, सरकारी नोकरीत तरी ब्राह्मण फार प्रचंड संख्येने होते, असे अजिबात नाही, १९११ साली मुंबई प्रांतात जे गॅझेटेड ऑफिसर्स होते त्यापैकी ३३४ हिंदू होते. त्यांच्यापैकी ब्राह्मण व कायस्थ मिळून फक्त १३८ म्हणजे निम्म्याहूनही कमी होते. उलट ख्रिश्चनांची संख्या ६२७ असून, पारशी १०४ होते. म्हणजे हिंदूंपैकी जे पांढरपेशे लोक होते ते मोठ्या संख्येने असतील तर अगदीच खालच्या पायरीवर होते.

५

इंग्रजी शिक्षणाबरोबर विज्ञानाचा किंवा सृष्टिज्ञानाचा विचार आपल्याकडे आला. हिंदुस्थानच्या परंपरेत सृष्टीचा अभ्यास होत नव्हता असे नाही. आयुर्वेदाच्या अंगाने वनस्पतींचा विचार चाले, किमयेसाठी (म्हणजे हलक्या धातूचे सोन्यात रूपांतर करणे) धातूंवर प्रयोग होत. परंतु हा सर्व अभ्यास त्यापासून काहीतरी मिळवावे या हेतूने होत असे. सृष्टीचे पद्धतशीर ज्ञान हेच प्राप्तव्य आहे, म्हणून तो अभ्यास होत नसे. आठराव्या शतकाच्या अखेरीला युरोपात बूर्झ्वा संस्कृती जोरावर होती. सृष्टी आणि विज्ञान यांचा अभ्यास करावयाचा तो काही अभ्यासबाह्य गोष्टी साध्य करण्यासाठी नसून त्या अभ्यासापासून काही निखळ आनंद मिळतो, यासाठी करावा ही बूर्झ्वा विचाराची देन आहे. हे विचार






आपल्याकडे इंग्रजी शिक्षण व तिकडील क्रमिक पुस्तके आल्यावर प्रसृत झाले.

ओक लिहितात, 'सृष्टी हे देवकृत महापुस्तक आहे. हे वाचावे म्हणून उघडून ठेविले आहे. हे वाचणे फार कठीण आहे. हे जे कोणी बरेच वाचितात - म्हणजे ह्यातील चमत्कार जे कोणी बरेच हुडकून काढितात त्यांस पुष्कळ शाबास म्हटले पाहिजे हे उघड आहे. आणि हे ईश्वरकृत पुस्तक वाचण्यात जो काय आनंद आहे, तो अप्रतिम आहे. आणि प्रपंचामध्ये थोडी सवड करून ज्यास अशा प्रकारचा अल्पस्वल्प तरी आनंद संपादिता येतो, ते प्रपंचातल्या दुःखांची पर्वा करीत नाहीत. ह्यालाच ब्रम्हानंद म्हणावे हे बरे दिसते.' हा विचार त्या काळात किती अभिनव होता. ते उलगडून सांगण्याची गरज नाही.

विज्ञानामुळे निर्माण झालेली उपकरणे देशात फार लवकर पोचत होती. त्यांचे अद्भुत उपयोग पाहून सामान्य मनुष्येच काय, पण सुशिक्षित लोकही चकित होत होते. त्याबद्दल ओकांचा खालील उतारा रोचक आहे. 'शंभर-दीडशे वर्षांमागे, वाफेने राक्षसी कामे होतील असे कोणास वाटले होते काय? विद्युल्लतेच्या योगाने बातम्या पोचविता येतील असे कोणाच्या मनात आले होते काय? सूर्यप्रकाशाच्या योगाने हुबेहूब चित्रे काढता येतील असे कोणाच्या लक्षात आले होते काय? अथवा ध्वनी हा एखाद्या जड पदार्थाप्रमाणे भांड्यात कोंडून धरावा आणि तो पाहिजे तेव्हा जसाच्या तसा ऐकवावा, हे शक्य आहे असे कोणी कबूल केले असते काय? परंतु ह्या सगळ्या गोष्टी खऱ्या झाल्या आहेत व त्या बायकामुलांसही ठाऊक झाल्या आहेत. तेव्हा ह्या सृष्टिग्रंथात आणखी काय काय चमत्कार दृश्यमान होणार आहेत, ह्याचा आजमास कोणी करावा?' आगगाडी, तारायंत्र, कॅमेरा व ग्रामोफोन या यंत्रांची ही वर्णने चटकदार आहेत.

सृष्टिज्ञानाच्या हव्यासाने परमेश्वरभक्तीही साधते, असो ओक आवर्जून सांगतात. 'हे सृष्टीअवलोकन धर्मश्रद्धा-वृद्धी करण्यास उत्तम साधन होते. सृष्टीतील सर्वव्यापक चमत्कार पाहून परमेश्वराच्या सर्वव्यापकत्वाविषयी माणसांची खात्री होते. परमेश्वर सर्वत्र आहे, तो नाही असे स्थान सृष्टीत नाही, अशी त्यांची खात्री होते; जेणेकरून ते कोठे एकटेदुकटे असले तरी पापकर्माविषयी त्यांची पराङ्मुखता असते आणि सत्कर्माविषयी उत्सुकता जागृत असते. त्यांचे अंतःकरणात 'विश्वात्मा' हे सोपे नाव चांगले ठसते. पळून जाण्याची उत्तम संधी मित्रमंडळाने आणून दिली असतानाही, प्राणरक्षणाकरितासुद्धा साक्रेटिस पळाला नाही. ते का, तर आपण हे पाप गुप्तपणे केले तरी देवास कळल्यावाचून राहावयाचे नाही, अशी त्याची निष्ठा होती. म्हणजे सांगावयाचे तात्पर्य एवढेच की, सृष्टीअवलोकन हे मनुष्याच्या आचरणशुद्धीस आणि तद्द्वारा मोक्षप्राप्तीस उत्तम प्रकारचे साधन होते. म्हणून प्रपंचामध्ये, वेळात वेळ करून करवेल तितके सृष्टीअवलोकन करावे, हे सर्वतोपरी कल्याणप्रद आहे.'

६

एकोणिसावे शतक नुसते इंग्रजी राज्यच घेऊन आले नाही तर इंग्रजी भाषा व पाश्चात्त्य विचार घेऊन आले. राज्यकर्त्यांचा असा दावा होता की, रुढी, अंधश्रद्धा, जुनाट व रानटी धर्म, मध्ययुगीन विचारसरणी, कालबाह्य उत्पादन-साधने, निरक्षरता, जातिव्यवस्था अशांनी सडून गेलेला हा समाज आहे. त्याला गर्तेतून उचलून काढून मानवजातीच्या प्रगतीच्या प्रवाहात आणून सोडण्यासाठी आम्ही काहीशा विवशतेने इथली राज्यव्यवस्था हाती घेतली आहे. तुम्ही अज्ञानातून बाहेर येऊन सुधारणेच्या मर्गाला लागलात की आम्ही स्वखुशीने तुमच्या हवाली कारभार सोपवू आणि इथून निघून जाऊ. प्रगतीचा हा विशेष प्रवाह कोणता? युरोपात औद्योगिक क्रांती झाली, त्यातून भांडवलदार वर्ग उदयाला आला, फ्रेंच राज्यक्रांतीने या वर्गाची ताकद सरंजामशाहीचा नाश करून दाखवून दिली आणि भांडवलशाही हा मनुष्याच्या इतिहासातील महत्त्वाचा टप्पा ठरला. नवे यंत्रधारित उद्योग, व्यक्तिस्वातंत्र्य, बाजारपेठेच्या यंत्रणेचा अर्थव्यवस्थेतील पगडा, राष्ट्रवाद, प्रातिनिधिक लोकशाही, संधीची समानता इत्यादी अनेक वैशिष्ट्ये या नव्या भांडवलशाहीची होती. ही वैशिष्ट्ये इंग्रजी पुस्तकातून, शाळा-महाविद्यालयातील शिक्षणातून, वृत्तपत्रातील लिखाणातून, ख्रिस्ती धर्मोपदेश-कांच्या प्रवचनातून आमच्या समाजात पसरत राहिली. मात्र या विचारसरणीचा आर्थिक आधार जो भांडवली उद्योग तो मात्र इथे अवतरला नाही.

साहजिकच १९ व्या शतकाचा अभ्यास करताना येथील समाजातील पुढारी मंडळी जी न्या. रानडे, विष्णुशास्त्री चिपळूणकर, म. फुले, लोकहितवादी व पुढच्या पिढीत टिळक, आगरकर, गोखले यांच्या लिखाणाचा विचार करण्यावर आपला भर असतो. ही जी भांडवलशाही विचारसरणी इकडे आली तिची कोणती ना कोणती बाजू या पुढाऱ्यांना त्यांच्या








त्यांच्या पिंडानुरूप कमी-जास्त प्रमाणात स्वीकारार्ह वाटली व त्या त्या बाजूचा पुरस्कार त्यांनी चालविला. त्यातून अनेक ठिणग्या पडल्या, वाद व वादळे उभी राहिली आणि त्यांच्या तेजोरेषा किंवा भुलावे आपल्या समाजाला अद्याप जाणवत आहेत. परंतु या नेते मंडळींचे हे विचार किती तीव्रतेने तत्कालीन सामान्य पण जाणत्या माणसांपर्यंत पोचत होते; समाजाच्या विचारातील व वर्तनातील हेलकाव्यांकडे ही मंडळी कोणत्या दृष्टीने पाहत होती हे समजावून घेण्यासाठी विनायक कोंडदेव ओक किंवा महादेव शिवराम गोळे अशांसारख्या, नेतृत्वाची इच्छा न धरणाऱ्या, पुढे येणाऱ्या विषयांची व युक्तिवादांची साधकबाधक चिकित्सा करून मत देणाऱ्या व्यक्तींची पुस्तके उपयोगाची ठरतात.

ओकांनी एकोणिसाव्या शतकातील घडामोडी आस्थेने पण स्वस्थ चित्ताने न्याहाळल्या होत्या. ते फार काही शिकलेले नव्हते. त्यामुळे युरोपातून इंग्रजी पुस्तकातून इकडे आलेले विचार त्यांच्यापर्यंत साक्षात् रुपात पोचत नसावेत. कोणत्याही विचारांचा किंवा युक्तिवादाचा हिरीरीने पुरस्कार करावा अशी उमेद त्यांना नव्हती. पण तो समजून घ्यावा व तारतम्याने स्वीकारावा किंवा नाकारावा याचा सुजाणपणा त्यांच्या ठिकाणी नक्कीच होता. हे प्रपंचरहस्यावरून कळते. समाजात कोणते वादळ त्यांच्या देखत घडले, यावरच त्यांनी एक प्रकरण लिहिले आहे.

झालेल्या परिवर्तनाचे एकोणतीस पैलू ओकांनी वर्णिले आहेत. आजच्या आपल्या दृष्टीने त्यातील महत्त्वाचे मुद्दे असे सांगता येतील. अ. वयोवृद्ध व तपोवृद्ध अशा माणसांस पूज्य मानणे, त्यांच्या उत्तरास प्रत्युत्तर न देणे, आपणास न आवडले तरी प्रसंगी त्यांचे ऐकणे, असे वागणे चांगले म्हणत असत. आता त्यांची काही एक परवा न करिता, आपल्या मनाला प्रशस्त वाटेल ते बोलणे आणि करणे हे 'व्यक्तिस्वातंत्र्य' म्हणून, त्यावरून अशा माणसांची मोठी वाहवा करितात. आ) सरकार मायबाप वाटे. सरकारने काही केले तरी त्याविषयी काहीएक बोलू नये. निमूटपणे पहावे, आणि सोसावे असे लोकांस वाटे. आता त्या प्रकरणी सभा कराव्या, सरकारास आणि पार्लमेंटास अर्ज करावे, हे लोकांस कळू लागले आहे. इ) धर्मसंबंधांचे आजचे मूळ वळण आमच्या वडिलात होते. त्यांच्या निम्मे आमच्यात नाही. आमच्यात आहे, त्याच्या चौथ्या हिस्सा आमच्या मुलात नाही; आणि आमच्या मुलात आहे त्याच्या दहावा हिस्सा आमच्या नातवात नाही. ई) महाजन सभा, सार्वजनिक सभा, राष्ट्रीय सभा इत्यादी मंडळ्या राज्यकर्ते आणि प्रजाजन ह्यांच्या मध्यस्थ आहेत. त्यांच्या म्हणण्याचा विचार आमचे राज्यकर्ते करीत आहेत. आणि त्यांचा उपयोग पुष्कळ आहे. ह्याविषयी पूर्वी कोणाला स्वप्न देखील पडले नव्हते. त्या सभा पाश्चात्त्यांच्या नमुन्यावर स्थापिलेल्या आहेत. उ) सत्तावन साली एवढा मोठा बंडाचा धुमाकूळ मांडला होता. तरी त्या प्रसंगी अमुक एक करावे, असे प्रजाजनांनी सरकारास सुचविले नाही. पण आता सरहद्दीवरच्या लढाईच्या प्रसंगी काय करावे हे ते नाना प्रकारी सांगत आहेत. हे सगळे फळ विद्येच्या प्रसाराचे आहे. ऊ) स्वातंत्र्य हे स्त्रियांस नाही, अशी समजूत पूर्वी दृढ होती, परंतु गिरण्यांसारख्या कारखान्यात बायकांस स्वतंत्र कामे मिळू लागल्यामुळे अगदी अजाण बायकादेखील स्वतंत्र झाल्या आहेत. पुरुषांच्या आधाराशिवाय आपले चालेल, असे त्यांस वाटू लागले आहे. त्यामुळे अनीती वाढत चालली आहे. ए) नीच मानिलेल्या जातीचे लोक विद्येने आणि वर्तनाने दिवसेंदिवस अधिक सुधारून ब्राह्मणांची बरोबरी करायचा यत्न करीत आहेत आणि तो काही फुकट जात नाही आहे. परंतु ब्राह्मण लोक, आपले श्रेष्ठत्व कायम राखण्याकरिता अधिकाधिक विद्वान आणि अधिकाधिक पवित्र होण्याचा प्रयत्न करीत नाहीत. ऐ) पूर्वी मंडळ्या मिळवून शेर काढून व्यापार करण्याचा प्रघात इकडे नव्हता. तो आता चांगला चालू झाला आहे. मुंबई शहरात सुमारे शंभर गिरण्या आहेत. त्या सगळ्या अशा प्रकारे उभारलेल्या आहेत.

यावरून दिसून येईल की, ओकांनी समाजस्थितीचे मार्मिक निरीक्षण केले होते व आपल्या लहानपणीच्या सरंजामी व आज्ञाधारक मनोवस्थेतून समाज भांडवलशाही, व्यक्तिस्वातंत्र्य व विचारस्वातंत्र्य यांच्या दिशेने चालला आहे याची जाणीव त्यांना झाली होती. बदलाचे या शब्दात विश्लेषण करणे करणे त्यांचा कदाचित जमले नसते. पण झालेला बदल त्यांनी चपखलपणे सांगितला आहे.

हे सर्व होण्याचे कारण आमचा इंग्लंडसारख्या सूज्ञ देशाशी संबंध आहे हे होय. 'हिंदुस्थानाच्या म्हणण्यास इंग्लंडास मान द्यावा लागतो. बोलणे ऐकावे लागते. सगळे मनोविकार एकीकडे ठेऊन सिव्हिल सर्विसची परीक्षा उतरली की नेटिवास साहेबांच्या बरोबरीने जागा द्याव्या लागतात. परांजपे, कामा, घारपुरे यांचा रँग्लर म्हणून मान करावा लागतो. परीक्षेत पक्षपात करवत नाही. भलतेच करण्याचे व बोलण्याचे धाडस होत नाही. हे सगळे इंग्लंडाच्या विद्यासंपन्नतेचे फल होय. आपण जर योग्यता

अनुक्रमणिका

संपादिली तर तीस योग्य असे पद आपणास केव्हा तरी राज्यात मिळेलच मिळेल.'

७

नवीन युगात निर्माण झालेल्या नवशिक्षितात सर्वप्रथम कोणत्या गोष्टींविषयी अस्वस्थता निर्माण झाली असेल तर ती धर्म आणि परमेश्वर यांच्याविषयी होय. भांडवलशाहीच्या उगमापासून युरोपात धर्माविषयी वाद सुरु झाला आणि धर्माचे संघटित रूप जे चर्च त्याविषयी तीव्र उद्वेग विचारवंतात निर्माण झाला. फ्रेंच राज्यक्रांतीत तर चर्च बरखास्त करण्यात आले व चर्चच्या मालकीची जमीन लिलावात काढण्यात आली. महाराष्ट्रात अव्वल इंग्रजीत - म्हणजे इस्ट इंडिया कंपनीच्या काळात मुंबई-पुण्यात धर्माचे विवेचक जे भिक्षुक त्यांच्यावर लोकहितवादींसारख्या पत्रकारांनी कठोर टीका केली. रूढींपासून व भिक्षुकांपासून हिंदुधर्म सोडवला पाहिजे असा पक्ष मांडण्यात आला. काही ब्राह्मणांनी धर्मांतर करून ख्रिस्ती धर्म स्वीकारला. या सर्व गोष्टी ओकांनी पाहिल्या होत्या, तरी त्यांची वृत्ती मात्र पारंपरिकच राहिली. 'किती एकांचे मत असे पडते की, देव, त्याची सत्ता, धर्म स्वर्ग-नरक हे सगळे थोतांड आहे. ते अजाण माणसांची समजूत घालण्याकरिता धूर्त माणसांनी रचले आहे. ह्यावर विचारणे एवढेच आहे की ह्या थोतांडाच्या जाळ्यात आजपर्यंत सापडले असे पुष्कळ झाले आणि ह्या जाळ्याविषयी संशय घेणारे असे अगदी थोडे ... निघाले हे झाले तरी कसे? जे कोट्यवधी लोक धार्मिक झाले त्यात किती एक अत्यंत चतुर होते त्यांचे ग्रंथ सर्वमान्य आहेत. त्यांना हे थोतांड समजू नये काय? बरे, क्षणभर ते थोतांड आहे, अशी कल्पना केली, तरी ते खरे मानिल्यापासून काही वाईट होते आहे काय? प्राचीन काळच्या धर्मच्छलाच्या गोष्टी एकीकडे असोत. परंतु सध्या सारख्या स्वस्थतेच्या आणि धर्मोदार्याच्या युगात धर्मश्रद्धेने अहित असे काही होत नाही. एवढेच केवळ नव्हे, तर तिच्या योगाने सामाजिक उन्नतीची कितीएक महत्कार्ये होतात.'

धर्मांतर करून ख्रिश्चन होणाऱ्या लोकांविषयी ओक तिटकारा व्यक्त करीत नाहीत त्याप्रमाणे अनुकूलताही दाखवत नाहीत. याविषयी त्यांनी आपल्या विचारांची सूचना मात्र देऊन ठेवली आहे. ते लिहितात, 'मूळ रूपाने सगळे धर्म एकसारखे असता, मनुष्यास धर्मांतर करण्याची इच्छा का व्हावी? परंतु त्यात फारसे काठिण्य नाही. पहा, एका मानसास फार तहान लागली आहे, त्यास पाणी पिण्याविषयी फार इच्छा झाली आहे, आणि तेथे मात्र दोन रुप्याचे गडवे पाण्याने भरले आहेत. त्यातला एक आतून बाहेरून चक्क घासलेला आहे, आणि दुसरा अंमळ जुना असल्यामुळे बाहेरून अमळसा काळसर दिसत आहे. आणखी त्या माणसाची अशी खात्री आहे, त्या दोन्ही भांड्यातले पाणी अगदी एकसारखे एसून, एकाच ठिकाणाहून एकदम आणले आहे. आणि दोन्ही भांडी आतून स्वच्छ घासलेली आहेत. तर, त्याला कोणत्या भांड्यातले पाणी पिण्याची साहजिक इच्छा होईल बरे? स्वच्छ भांड्यातले पाणी तो पिईल ह्यात काही संभ्रम नाही. तोच प्रकार धर्मांचा आहे.'

धर्माच्या संघटनेविषयीचा अविश्वास हा आधुनिकतेचा प्राण होताच; पण त्याच्या पुढची पायरी म्हणजे परमेश्वराच्या अस्तित्वाविषयीचा संशय. आगरकरांनी परमेश्वराच्या अस्तित्वाविषयी निर्णय करण्याचे सामर्थ्य मानवी बुद्धीत नाही, असे मानून अज्ञेयवाद मांडला व परमेश्वराचे अस्तित्व गृहीत धरून ऐहिकवादाविषयीचे नियम ठरविणे चुकीचे होईल असा आग्रह धरला. काही लोक ईश्वर नाहीच, असे सांगू लागले. रँग्लर परांजपे पट्टीचे अनिश्वरवादी होते व त्यांनी ईश्वराला नोटीस देऊन 'असलास तर माझ्या समोर ये' असे बजावले होते. असे नाना वाद त्या काळातील सुशिक्षित लोकांत गाजून राहिले होते. इथेही विनायक कोंडदेव ओकांची भूमिका परंपरेने आलेल्या भागवतधर्माची म्हणजेच बाळबोध व अनाग्रही होती. 'आता आस्तिक आणि नास्तिक ह्यातला खरा पक्ष कोणता, ह्याचा निर्णय प्रत्यक्षत: तर कोणाच्याने करवायचा नाही. सगळा वाद कोटिक्रमावर चालावयाचा आहे. त्यात उभयपक्षी साधक-बाधक प्रमाणे पुष्कळ आहेत. ती असोत. परंतु, त्यातला सुशिक्षित पक्ष कोणता, ह्याचा विचार करताना जे एक भाषण ईश्वरवाद्याने अनिश्वरवाद्याशी केले, ते लक्षात ठेवण्यासारखे आहे. ते हे - "देव मुळी नसला, तर, मृत्यूनंतर तुला नाही, आणि मला काही नाही. पण, जर देव असला, तर तुझी काय गत?" ते ऐकून नास्तिकास वाईट तोंड करून स्वस्थ बसावे लागले.'

पश्चिमेकडून आपल्याकडे जो आधुनिक विचार आला त्यात स्वर्ग-धरा-सारुप्य हा एक महत्त्वाचा विचार होता. ॲरिस्टॉटलचे म्हणणे असे होते, की पृथ्वीपासून चंद्रापर्यंतच्या अवकाशाची घटना व चंद्रापलीकडील अवकाशातील वस्तूंविषयीचे नियम यांच्यात मूलभूत भेद आहे. प्रबोधन-काळातील विज्ञानाने व तत्त्वज्ञानाने हा विचार फोल ठरवला व सर्व

आवकाश एकाच स्वरुपाचा आहे, असे प्रतिपादले. त्यानंतर हा विचार ज्ञानाच्या इतर क्षेत्रातही पसरला, आपल्याकडे तो कसा व केव्हा आला याचा शोध घेणे अगत्याचे आहे. केशवसुतांच्या कवितेत स्वर्ग-धरेच्या एकरुपतेचा किंवा स्वर्गपृथ्वीला भेटायला आल्याचा उल्लेख अनेक ठिकाणी येतो; किंबहुना स्वर्ग व धरती यांना जोडून देणे हे कवीचे आणि कवितेचे प्रयोजन आहे, असे ते म्हणतात. 'पृथ्वीला सुरलोक साम्य आणावया' कवी झटत असतात. कवीला धुंडण्यासाठी 'स्वर्ग सवे धरेस उतरे' असे ते सांगतात. मद्याच्या उष्णतेने द्यावापृथ्वी वेगाने एकमेकात मिसळतात; इतकेच काय पण तरुणीने काढलेल्या रांगोळीत 'स्वर्भूसंग' दाखविला आहे, असे त्यांना वाटते.

विशेष म्हणजे ओकांनी मनुष्यजीवनाची इतिकर्तव्यता सांगतानाही नेमका हाच विचार मांडला आहे. पृथ्वीची उन्नती परमेश्वराने माणसाच्या हाती ठेवली आहे. त्या उन्नतीची मर्यादा अतर्क्य आहे. स्वर्गाविषयी जी कल्पना आहे, त्या कल्पनेप्रमाणे पृथ्वीचे श्रेष्ठत्व वाढावे ही त्या कल्पनेची परमावधी होय. ही करण्यात सगळ्या माणसांनी - मग त्यांची योग्यता कोणत्याही प्रकारची असो - हातभार लाविला पाहिजे. म्हणजे वृक्ष जसा हळूहळू वाढत जातो तशी देशोन्नती हळूहळू वाढत जाईल आणि पृथ्वी हा प्रतिस्वर्ग होईल. आणखी, सगळ्या ज्ञानाचे मुख्य पर्यवसान हेच आहे.

८

एकोणिसाव्या शतकात महाराष्ट्रात नवीन विचारांचे वारे आले हे सांगण्यात नाविन्य काही नाही. इथल्या बंदिस्त सामाजिक व आर्थिक तटबंदीत घुसमटून या वाऱ्याची वावटळ झाली. निरनिराळ्या विचारसरणींच्या मशाली घेऊन हिंडणाऱ्या मशाली भडकल्या आणि आज त्या काळाचा अभ्यास करणारी आपण माणसे त्या भडकल्या ज्वालांकडेच पाहत राहिलो; त्यात काय जळाले व काय राहिले याचा हिशोब मांडत बसलो. आणि बरेचदा या ना त्या मशालजींची बाजू उचलून माथेफोड करण्यात धन्यता मानली. परंतु आता आसमंतात असा भडका उडाला असतानाही त्या तटांच्या खबदाडीत स्वस्थ राहून मशालींच्या प्रकाशात दिसलेल्या तथ्यांची अनाग्रही वृत्तीने नोंद घेणारी काही सुजाण माणसे होती. विनायक कोंडदेव हे त्यापैकीच होते.

'प्रपंचरहस्या'त त्यांनी मांडलेल्या विचारांचा आढावा आपण शक्यतोवर त्यांच्या शब्दातच घेतला आहे. त्यांची भाषा प्रांजळ, विचार स्वच्छ आणि मांडणी लडिवाळ आहे. सबंध पुस्तकावर प्रसन्नतेची पसरण झाली आहे. याचे एक कारण असे की, ओकांना स्वतःच्या आयुष्यक्रमाबद्दल फार समाधान वाटते आहे. आपण अगदी गरिबीतून सुरुवात केली, शिक्षण पूर्ण करणे तर सोडाच पण जेमतेम शिक्षणही घेऊ शकलो नाही. प्राथमिक शिक्षक म्हणून नोकरीची सुरुवात केली व दिपोटी पदावरून निवृत्त झालो. लेखनाचा छंद निरंतर जोपासला व त्यातून एक समृद्ध पोक्तपण आपल्याला लाभले असा भाव त्यांच्या पुस्तकात जागजागी दिसतो. प्रत्येक प्रकरणात त्यांनी रामदास, तुकाराम, नामदेव अशा संतांची व मोरोपंत, वामनादी कवींची वचने उद्धृत केली आहेत. तीही अतिशय रसाळ आणि बोधप्रद आहेत. ओकांच्या प्रासादिक भाषेचा नमुना म्हणून 'प्रपंचरहस्या'तील शेवटचा परिच्छेद इथे देतो.

'असो. तर माणसास मरणे आहे. ते चुकविता येत नाही. तर मग, ते येईपर्यंत, आपल्याच्याने काय चांगले करवेल ते, जेव्हा करवेल तेथे, आणि जितके करवेल तितके करणे हे आपले आवश्यक कर्तव्य आहे. हे चांगले करणे काया, वाचा आणि मन या तीन साधनांनी करता येते. कोणास ओझे उचलावयास लागणे, चालवत नाही त्यास हात देणे, इत्यादी कामे कायेने करिता येतात. सत्य भाषण करणे, गोड बोलणे, दुसऱ्याच्या दुःखाचे सांत्वन करणे, परमेश्वर-प्रार्थना करून इतरांची मने तिजकडे लावणे इत्यादी चांगली कामे वाचेने करिता येतात. आणखी, अंतःकरण शुद्ध ठेवणे, चांगल्या विचारांचा संग्रह करणे, सद्गुणांवर निष्ठा ठेवून त्यांची वृद्धी करून, त्यांचा प्रभाव आपल्या आचरणावर चांगला राहील असा करणे, आणि तद्द्वारा जनांस सन्मार्गगामी करणे, इत्यादी कामे मनाने करिता येतात. अशा प्रकारे आपली काया-वाचा-मन ही लाववतील तेवढी सत्कार्यी लावावी, हीच जीवनाची इतिकर्तव्यता होय.'

▣ ▣ ▣

गृहं तु गृहिणीहीनम्
कान्तारात् अतिरिच्यते।

हे खरे प्रपंचरहस्य.

अनुक्रमणिका

(मुखपृष्ठ क्र० २ वरून)

जी अगतिकता नायिका अनुभवते, ती अगतिकता कोणत्याही संवेदनशील माणसाला अस्वस्थ करून सोडणारी आहे. वास्तवाच्या स्वीकार-नकाराला नायिकेच्या 'मागण्यांची' सापेक्षता आहे. या मागण्या म्हणजे मग तो साधा चहा असो की एखाद्या व्यक्तीबद्दलची चाहत असो, अत्यंत बारीकसारीक मागण्या असतात. मनाच्या अन् त्याहीपेक्षा शरीराच्या! मात्र पुरुषी संस्कारातून या मागण्यांचे अस्तित्वच कायमचे नाकारलेले असते, तेव्हा स्त्रीला (तिला स्वतःची नोकरी आहे, तिचे स्वतःचे घर आहे, तरीही) आयुष्यभर अगतिकतेच्या खांबावर चढण्याउतरण्याची शिक्षा भोगावी लागते. मध्येच एखादा लोभी तिच्या तरल अभिरुचीला साद घालणारा मित्र म्हणून आयुष्यात येतो. पण तिचा घटस्फोटित नवरा तिच्या घरी आला होता, हे कळते आणि लोभी चवताळतो. नात्यांचे असे हवाबंद डबे ती नाकारते. पण तिच्या स्वीकार-नकाराला काही अर्थच नाही. हे खरे वास्तव आहे. मीरा नावाच्या स्त्रीला पुरुष संबंधात हे जे वास्तव नवरा, घटस्फोटित नवरा आणि मित्र या नात्यांच्या निमित्ताने जाणवले, ते तिच्याशिवाय इतरांना जाणवले असेलच, असे नाही. कारण त्याच पुरुषांचे संदर्भ इतरांसाठी वेगळे होते. स्त्री म्हणून मीराच्या वाट्याला आलेले हे काचेचे तुकडे एकंदर स्त्रियांसाठी सार्वत्रिक अनुभवाचे विषय असले तरी मीरा अल्पसंख्यांकच ठरते.

मीराच्या वतीने याचे कारण लेखिका म्हणून मेघना पेठे यांनी कादंबरीपूर्वीच्या मनोगतात दिले आहे. त्या म्हणतात 'वास्तवातले दोन हायड्रोजनचे कण जर कल्पनेतल्या एका ऑक्सिजनच्या कणाला मिळाले, तर त्यांचं जीवनदायी पाणी होतं. पण वास्तवातले तेच दोन हायड्रोजनचे कण जर कल्पनेतल्या एका सल्फरच्या कणाला मिळाले, तर त्याचा जीवघेणा विषारी वायू तयार होतो.'

थोडक्यात साऱ्या आयुष्याला परीक्षानळीचे रूप देऊन तिच्यात वास्तवाच्या मूलद्रव्यावर उराशी बाळगलेल्या मानवी सभ्यतेच्या मूल्यांची क्रिया-प्रतिक्रिया घडवून आणण्यासाठी संवेदनांच्या धगीवर ती परीक्षानळी धरण्याचे धाडसही तिला आहे आणि हे अतिशय दुर्मिळ आहे. पुष्कळांजवळ ऑक्सिजनही नसतो आणि सल्फरही नसतो. ते स्वतःच प्रयोगशाळेतील गिनिपिग असतात. निदान तसे स्वतःला भासवून गूढ कलात्मकता किंवा अगम्य नियतिवादाच्या खोट्या धुक्यात स्वतःचीच फसवणूक करीत राहतात.

मेघना पेठे यांची 'नातिचरामि' मधील मीरा त्यापासून दूर आहे आणि वाचकांनाही ती दूर ठेवू पाहते, म्हणून ती मला महत्त्वाची वाटते.

(राजहंस ग्रंथवेध, सप्टेंबर २००६ च्या सौजन्याने.)

(टीप : हायड्रोजन ज्वालाग्रही, ऑक्सिजनही ज्वलनाला आवश्यक. परंतु या दोहोंचा युक्त संयोग झाला तर त्यातूनच नवजीवनही निर्माण होते. - देवदत्त दाभोलकर.)

◈ ◈ ◈



अनुक्रमणिका

# उत्तर-नव भारत
## विकासाची विविध प्रतिमाने

### पारधी जमातीची महिला होणार सोलापूर जिल्ह्याची पहिली नागरिक !

चोऱ्या, दरोडे, घरफोड्या, मारामारी प्रकरणातील आरोपींना पकडण्यासाठी दररोज पोलिसांना जावे लागणाऱ्या सवतगव्हाणच्या पारधी वसाहतीत आता राजकीय मंडळींना जावे लागत आहे, ते मत मागण्यासाठी नव्हे तर उमेदवार शोधण्यासाठी !

सोलापूर जिल्हा परिषदेचे अध्यक्षपद अनुसूचित जमातीच्या महिलेसाठी आरक्षित झाले आहे. त्यामुळे सर्वच पक्ष अशा दुर्मिळ उमेदवाराच्या शोधात आहेत. सवतगव्हाण (ता० माळशिरस) येथे जुनी आणि मोठी अशी पारधी वसाहत आहे. राष्ट्रवादी काँग्रेसतर्फे त्या वसाहतीत राहणारी महिला अध्यक्षपदासाठी निश्चित करण्यात येत आहे. मात्र या आरक्षणाचा राखीव गट नसल्याने सर्वसाधारण गटातून उमेदवारी देऊन सदर महिलेला विजयी करण्याचे ठरविण्यात आले आहे.

पोलिसांच्या रोजच्या ससेमिरीला आणि कोर्ट कचेरीला तोंड द्याव्या लागणाऱ्या या पारधी समाजात सुशिक्षित महिला शोधत असताना राष्ट्रवादीच्या कार्यकर्त्यांना सातवी व नववी शिकलेल्या दोन महिला आढळून आल्या. परंतु निवडणुकीसाठी लागणारी त्यांची कागदपत्रे जुळविताना कार्यकर्ते मेटाकुटीला आले आहेत. कधी मतदानातही भाग न घेतलेल्या या महिला एकतर निवडणूक लढविण्यास तयार नव्हत्या. त्यांना लाल दिव्याच्या गाडीबद्दल सांगताच त्या कशा तरी तयार झाल्या.

सर्वसाधारण महिलेसाठी राखीव अस-णाऱ्या यशवंतनगर या राष्ट्रवादीच्या बाले-किल्ल्याच्या गटातून त्यांना उमेदवारी देण्याचे निश्चित झाले आहे. त्यामुळे त्यांच्या विजयाची खात्री असली तरी रोज पोलिसांना चुकवत जीवन जगत असताना त्याच पोलिसांचे संरक्षण मिळविणारी व जिल्ह्याच्या प्रतिष्ठेचे स्थान मिळविणारी जिल्ह्याची पहिली नागरिक कोण असेल, याबद्दल प्रचंड उत्सुकता निर्माण झाली आहे.

(सौजन्य : लोकसत्ता वृत्तान्त, २०/०२/२००७.)

हे मासिक घ.वा. जोशी यांनी अक्षरसाहित्य, ३५, गुरुकृपा सो., शाहूनगर, गोडोली, सातारा ४१५००१ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.




